अ.स. पुश्किन



# कॅप्टनची मुलगी

# कॅप्टनची मुलगी

•

: लेखक :

ए. एस. पुश्किन

•

पी. पी. एच. बुकस्टॉल,

मुंबई ४.

" कांहीं व्यक्ती म्हणजे अक्षय चैतन्यानें ओतप्रोत भरलेले अमर आविष्कारच असतात. अशा व्यक्तींचे पार्थीव देह मृत्यूनें हिरावून नेल्यानंतरहि त्यांच्या व्यक्तित्वाचा समाजाच्या हृदयांत सदैव विकास होत राहतो. त्यांच्या-विषयीं प्रत्येक युग आपलें मत व्यक्त करतें. हें मत कितीहि योग्य असलें तरी भावी युगाला पहिल्या युगापेक्षां कांहीं तरी नवें व जास्त यथायोग्य असें सांगावयाचें शिल्लक राहतेंच. पुश्किन हा अशाच व्यक्तींपैकीं एक होय."

—व्ही. बेलिन्स्की

# अनुक्रमणिका

# कॅप्टनची मुलगी

दिन यौवनाचे
सन्मान रक्षिण्याचे
—म्हण



'कॅप्टनची मुलगी' ही कादंबरी पुश्किननें १८३३ ते १८३६ या काळांत लिहिली.

रशियन शेतकऱ्यांनीं १७७३–७५ सालीं एमेल्यान पुगाचेव याच्या नेतृत्वाखालीं रशियांतील भूदास पद्धतीविरुद्ध बंड उभारलें होतें. या बंडाचा सखोल अभ्यास करून पुश्किननें 'पुगाचेवचा इतिहास' हा ग्रंथ लिहिला. रशियन ऐतिहासिक संशोधनाच्या क्षेत्रांत अशा प्रकारचा हा पहिलाच ग्रंथ होता.

पण पुगाचेवच्या बंडाची हकीकत वाचकांसमोर ठेवण्यासाठीं त्या काळच्या सेन्सॉरबाबतच्या अडचणींमुळें पुश्किननें ललित वाङ्मयाच्या एका स्वरूपाची निवड केली. अर्थात् या स्वरूपांत त्या बंडाचें ऐतिहासिक प्रमाणावर चित्र रेखाटणें त्याला शक्य झालें नाहीं. तरीपण या कथेचा नायक ग्रिनेव याच्या 'घरगुती कालक्रमवृत्तांता'च्या मर्यादेंत आणि झारशाहींतील सेन्सॉरचीं अनेक बंधनें असतांनाहि त्या बंडाच्या पुढाऱ्याचीं प्रमुख वैशिष्ट्यें या कथेंत गुंफण्याचा पुश्किननें प्रयत्न केला आहे.

पुश्किनच्या वाङ्मयाचें मूल्यमापन करतांना सुप्रसिद्ध रशियन लेखक गोगोल लिहितो कीं या कादंबरींतील 'पात्रें खऱ्याखुऱ्या अर्थानें रशियन आहेत. एका किल्ल्याचा एक सामान्य कमांडंट, त्याची बायको, एक तरुण लेफ्टेनंट, अशा सामान्य लोकांची सामान्य भव्यता प्रथमच या कादंबरींत दिसून येते.'



# प्रकरण पहिलें

## *गार्डांच्या पथकांतील सार्जंट*



‘ गार्डांच्या पथकांत तो असता, तर लवकरच तो कॅप्टन झाला असता.’

‘ हरकत नाहीं ! सामान्य सैनिकाचा भाकरतुकडा त्याला खाऊं दे.’

‘ आणि सामान्य सैनिकाचीं कामं पण त्याला करूं दे. छान बोललांत.’

‘ठीक ! त्याचा बाप कोण आहे, माहीत आहे ? ”

—कन्याझ्‌निन

आन्द्रे पेत्रोविच ग्रिनेव हे माझे वडील. तरुण वयांत काऊंट मिनिखच्या हाताखालीं त्यांनीं सैन्यांत नोकरी केली होती. आणि इ. स. १७...मध्यें ब्रेवेत-मेजरच्या हुद्यावर असतांना ते रिटायर झाले होते. नंतर सिंबर्स्कमधील आपल्या शेती-वाडींत जाऊन राहण्याचें त्यांनीं ठरविलें. तेथें असतांनाच अवदोत्या वासिलेवनाशीं त्यांचें लग्न झालें. तिकडच्याच एका गरीब गृहस्थाची ही मुलगी. तिला एकूण नऊ मुलें झालीं. पण त्यांतील मी एकटाच तेवढा वांचलों. माझीं सारीं भावंडें लहानपणींच मरण पावलीं. माझ्या वेळीं आई गर्भार होती, तेव्हांच माझ्या वडिलांनीं माझें नांव सेमेनोव रेजिमेंटमध्यें सार्जंट म्हणून नोंदविलें होतें. या कामीं आमचे जवळचे नातेवाईक प्रिन्स ब...यांचा भारी उपयोग झाला. ते सैन्यांत मेजर ऑफ दि गार्डस्‌च्या हुद्यावर होते. आणि त्यांनीं दयाबुद्धीनें आमच्यावर ही मोठी मेहेरबानी केली होती. जर यदाकदाचित् माझ्या मातापितरांची इच्छा पुरी झाली नसती आणि माझ्या आईला माझ्याऐवजीं मुलगी झाली असती, तर माझ्या वडिलांनीं लगेच गैरहजर गुन्हेगार सार्जंटच्या मृत्यूचा रिपोर्ट केला असता. आणि मग हें सर्व प्रकरण तेथेंच मिटलें असतें. माझें सर्व शिक्षण पुरें होईपर्यंत मी जसा कांही रजेवर होतों. आजच्या काळांत जशी शिक्षणाची व्यवस्था आहे, तशी त्या वेळीं नव्हती. माझ्या वयाला पांच वर्षें पुरी झाल्याबरोबर सावेलिच नांवाच्या एका मोतदाराच्या हवालीं मला करण्यांत आलें. हा मोतदार बढती मिळवून मास्तर झाला होता, त्याचें कारण एकच. तो फार पीत नसे. आणि वृत्तीनें तो शांत, गंभीर होता. या शिक्षकाच्या हाताखालीं बारा वर्षांचा होईपर्यंत मी शिकलों, तोंपर्यंत त्यानें मला लिहिण्यावाचण्यास शिकविलें होतें. शिकारी कुत्र्याच्या खाणाखुणाहि मला चांगल्या समजावयास लागल्या होत्या. बाराव्या वर्षीं मला

शिकविण्यासाठीं म्हणून माझ्या वडिलांनीं बोप्रे नांवाच्या एका फ्रेंच शिक्षकाची नेमणूक केली. दर वर्षी मॉस्कोहून मद्य आणि ऑलिव्ह ऑईल आम्हीं मागवीत असूं. या दोन वस्तूंबरोबरच त्या वर्षी एका फ्रेंच शिक्षकाची ऑर्डर नोंदविण्यांत आली. बोप्रेच्या आगमनानें सावेलिच मनस्वी कष्टी झाला. तो म्हणाला,—'आजवर आम्ही या मुलाला न्हाऊं माखूं घातलं, त्याच्या खाण्यापिण्याची नीटपणीं काळजी घेतली. देवाच्या दयेनं आजवर त्याचं सारं कांहीं यथास्थित झालं.'—आणि मग तक्रारीच्या स्वरांत तो गुरगुरला,—'आणि आतां मात्र एका फ्रेंच मास्तरची आम्हांला गरज लागली. आधींच आमच्या घरांत लोक जसे कांहीं कमी आहेत. त्यांत हा आणखी एक खायला काळ!'

बोप्रे आपल्या देशांत न्हाव्याचें काम करीत असे. नंतर त्यानें प्रशियन सैन्यांत कांहीं वर्षे नोकरी केली. आणि शेवटीं रशियामध्यें शिक्षक म्हणून तो येऊन थडकला. 'पोर एत्र औतच्तिल' * म्हणून त्याला म्हणत. पण या पदवीचा अर्थ काय, तें त्याला कधींच नीटसें कळलें नाहीं.

बोप्रे तसा फार चांगला माणूस होता. कसल्या तरी धांदलींत असल्यासारखा तो नेहमी दिसे. बायकांविषयीं त्याच्या मनांत फाजील प्रेम होतें. हीच त्याची मुख्य कमजोरी होती. बायकांशीं लगट करण्यापायीं पुष्कळ वेळां तो मार खात असे. आणि मग त्या मारापायीं किती तरी दिवस तो कण्हत कुंथत बसे. शिवाय त्याच्याच भाषेंत बोलावयाचें, तर बाटलीशीं त्याचें तसें कांहीं शत्रुत्व नव्हतें. दुसऱ्या शब्दांत सांगावयाचें, तर पुष्कळ वेळां तो जादा घेत असे. आणि मग पिऊन तर्र होऊन तो पडे. आमच्या घरांत रीत अशी होती कीं फक्त जेवणाच्या वेळीं तेवढें उंची मद्य वाढण्यांत येई. आणि तें सुद्धां प्रत्येकाला फक्त एक ग्लासभर मिळे. बोप्रेला बहुतकरून मद्य मुळींच देण्यांत येत नसे. त्याचा परिणाम असा झाला कीं थोड्याच अवधींत रशियांतील देशी उत्तेजक पेयांची त्याला चटक लागली. पुढें पुढें तर स्वतःच्या देशांतील उंची मद्यापेक्षां रशियांतील दारू अधिक बरी, असें तो म्हणावयास लागला. कारण काय तर म्हणे, पचायला ती हलकी असते. थोड्याच दिवसांत आमची दोघांची चांगली गट्टी जमली. खरें म्हणजे 'फ्रेंच, जर्मन आणि इतर सर्व विषय' मला शिकविण्यासाठीं त्याची नेमणूक झाली होती. पण माझ्यापासून रशियन शिकणें अधिक सोपें आहे, असें त्याच्या मनानें घेतलें. आणि ज्याला जें आवडेल, तें करावयास तो मोकळा झाला. आमचें एक-मेकांशीं चांगलें पटलें. माझ्या दृष्टीनें त्याच्यापेक्षां चांगला शिक्षक शोधून मिळण्यासारखा नव्हता. पण दैवानें लवकरच आमची ताटातूट केली.

काय झालें, तें आतां सांगतों.

---

* शिक्षक—अनु०

पलाश्का नांवाची एक मोलकरीण आमच्या घरीं होती. खूप लठ्ठ होती ती. आणि तिच्या तोंडावर देवीचे वण होते. अकुल्का नांवाशीं दुसरी एक मोलकरीण होती. ती एकाक्ष होती. आणि ती गोठ्यांत कामाला होती. एक दिवस दोघींनीं मिळून कट केला. आणि माझ्या आईच्या पायां पडून रडत ओरडत कांहीं कागाळ्या केल्या. आपल्या चुका त्यांनीं कबूल केल्या. पण त्या बरोबरच त्यांनीं बोप्रेला गोत्यांत आणलें. असल्या घाणेरड्या कामांत आपल्याला कांहीं कळत नव्हतें आणि त्याचा गैरवाजवी फायदा बोप्रेनें घेतला,—अशी त्यांची तक्रार होती. माझ्या आईनें या बाबतींत लक्ष घालावयाचें ठरविलें. तिच्या लेखीं हें मोठें पाप होतें. बोप्रेच्या दुष्कृत्यांचा पाढा तिनें माझ्या वडिलांसमोर वाचला. वडिलांनीं झटक्यांत या प्रकरणाचा निकाल लावावयाचें ठरविलें. आणि लगेच त्या गलिच्छ फ्रेंच मवाल्यास आपल्यासमोर हजर करण्याचा त्यांनीं हुकूम सोडला. त्या वेळीं माझी शिकवणी चालू आहे, म्हणून त्यांना कोणीं तरी सांगितलें. माझे वडील लगेच रागारागानें माझ्या खोलींत आले. तेथें त्यांनीं पाहिलें, तर बोप्रे बिछान्यावर गाढ झोंपलेला होता. मी आपला माझ्या कामांत गर्क होतों. हो. एक गोष्ट सांगावयाची राहून गेली. मॉस्कोहून माझ्या उपयोगासाठीं म्हणून एक भला मोठा रंगीत नकाशा खास मागविण्यांत आला होता. अर्थात् त्याचा उपयोग मी कधींच कांहीं केला नव्हता. नकाशाचा कागद चांगला लांब रुंद आणि गुळगुळीत होता. त्याचा कांहीं तरी उपयोग करण्याचा मोह मला नेहमी होत असे. माझ्या मनांतून त्या कागदाचा सुरेखसा पतंग बनवावा, असें होतें. बोप्रे गाढ झोपलेला आहे, ही संधि साधून मी भिंतीवरचा नकाशा काढला व आपल्या कामाला लागलों. झाडाची झिरझिरित साल घेऊन तिला नकाशांतील केप ऑफ गुड होपच्या जागेवर पतंगाचें शेपूट म्हणून लावणार, तोंच माझे वडील खोलींत आले. भूगोलाचा माझा अभ्यास त्यांना फारसा पसंत पडला नाहीं, असें दिसलें, कारण आंत येतां क्षणीं त्यांनीं माझा कान धरून करकचून पिळला. आणि मग बोप्रेचा समाचार घेण्यासाठीं ते पुढें सरसावले. त्याची झोंपमोड होईल, याची फारशी क्षिति त्यांनीं बाळगली नाहीं. बिछान्यावरून खसूदिशीं खेंचून त्यांनीं बोप्रेवर शिव्यांचा वर्षाव केला. तो बिचारा गोंधळला होता आणि काय करावें, तें त्याला सुचत नव्हतें. उठून उभे राहण्याचा त्यानें यत्न केला. पण तें सुद्धां त्याला धड जमलें नाहीं; कारण पिऊन तो तर्र झाला होता. त्यानें जीं कांहीं पापें आमच्या घरांत केलीं होतीं, त्या सर्वांचें मिळून त्याला एकच एक प्रायश्चित देण्यांत आलें. त्याच्या कोटाची कॉलर पकडून माझ्या वडिलांनीं त्याला खाटेवरून खालीं खेंचलें. तसेंच फरफटत ओढीत माझ्या खोलीबाहेर काढलें. आणि लगेच त्याची आमच्या घराबाहेर कायमची हकालपट्टी करण्यांत आली.

हा सर्व प्रकार पाहून सावेलिच मात्र मनांतल्या मनांत खदखदून हंसत होता. तात्पर्य काय, तर अशा रीतीनें अस्मादिकांचें शिक्षण संपुष्टांत आलें.

आमचें ज्ञान काय विचारतां ? भल्या मोठ्या भोपळ्याएवढें होतें. दिवसाचा सारा वेळ कबुतरें उडविण्यांत आणि वाडींतील मुलांबरोबर बेडुकउड्या मारण्यांत मी घालवीत असे. अशा रीतीनें उनाडक्या करण्यांत आयुष्यांतील पंधरा वर्षें हां हां म्हणतां निघून गेलीं. सोळावें वर्ष लागण्याच्या सुमारास मात्र माझ्या आयुष्याला एक वेगळेंच वळण मिळालें.

त्या दिवशीं पाऊस धूमधार पडत होता. आणि माझी आई माजघरांत बसून बेऱ्या मधांत उकळीत होती. जवळच मी उभा होतों. उकळत्या मधावरचे तवंग पाहून जिभल्या चाटीत होतों. माझे वडील एका खिडकींत बसून कोर्ट कॅलेंडर चाळीत होते. दर वर्षीं हें कॅलेंडर आमच्या घरीं नेमानें येई. माझे वडील हा ग्रंथ अथपासून इतिपर्यंत काळजीपूर्वक वाचून काढीत. आणि वाचतां वाचतां त्यांच्या रागाचा पारा वर वर चढावयास लागे. माझ्या आईला वडिलांच्या साऱ्या आवडी निवडी तोंडपाठ होत्या. म्हणून त्यांच्या रागास कारण होणारा हा ग्रंथराज दिसला रे दिसला कीं लगेच दूर कोठें तरी एखाद्या वळचणींत ती तो लपवून ठेवीत असे. कधीं कधीं महिनो न् महिने त्यांच्या दृष्टीस तो पडत नसे. पण एकदां का त्यांच्या नजरेस तो पडला कीं मग मात्र तास न् तास ते तो हातावेगळा करीत नसत. ही वेळ अशांतीलच एक होती. वडील कोर्ट कॅलेंडर वाचण्यांत गढून गेले होते. मधून मधून खांदे उडवीत होते. आणि स्वतःशींच असेच कांहींतरी पुटपुटत होते;—'हं...लेफ्टनंट जनरल ? अस्सं. अरे, तो तर माझ्या रेजिमेंटमध्ये साधा सार्जंट होता. आणि आतां रशियांतला सर्वांत मोठा लष्करी सन्मान त्याला मिळालेला दिसतो आहे...अरे, कालच तो आणि मी'—शेवटीं हातांतील कोर्ट कॅलेंडर त्यांनीं कोचावर भिरकावून दिलें. मग कांहीं वेळ ते विचारांत गढून गेल्यासारखे दिसले. विचारांत गढून जाण्याची त्यांना फारशी संवय नव्हती. आणि असें कांहीं झालें कीं घरांतील शांततेला तें बाधक होतें, असा नित्याचा अनुभव आईच्या गाठीं होता.

एकाएकीं आईकडे वळून ते म्हणाले,—'अवदोत्या वासिलेवना, पेत्रुशाचं वय काय आहे ?'

'कां बरं ? नुकतंच सोळावं लागलं त्याला.'—आई म्हणाली,—'त्याच्या मावशीचे डोळे गेले, त्याच सालीं पेत्रुशा झाला.'

'असं काय...ठीक ..ठीक'—वडील मध्येंच म्हणाले,—'म्हणजे त्याला आतां नोकरी करायला हवी. अलिकडे मी बघतों आहे. बायकांच्या अवतींभंवतीं तो सदा धुटमळत असतो. नाहीं तर कबुतरांच्या खुराड्यांत. पुष्कळ झालं हें आतां.'

आपला मुलगा आपल्यापासून लवकरच दूर जाणार आहे, या विचारानें आई मनस्वी कष्टी झाली. त्या दुःखाची कल्पनासुद्धां तिला इतकी असह्य झाली कीं तिच्या हातांतील चमचा गळून भांड्यांत पडला. आणि डोळ्यांत दाटलेलीं आंसवें

गालांवरून वहावयास लागलीं. आतां माझें विचाराल, तर माझा आनंद गगनांत मावेनासा होता. लष्कराची चाकरी म्हणजे घरांतील बंधनांतून मुक्त होणें, असा समज मी मनाशीं करून घेतला होता. आणि शिवाय पीटर्सबर्गमधील सुखविलासांची चित्रें माझ्या डोळ्यांसमोर तरळत होतीं. एका क्षणांत मी जसा कांहीं गार्डचा ऑफिसर झालों होतों. त्या वेळीं माझ्या लेखीं मोक्ष मोक्ष म्हणतात, तो हाच होता.

माझ्या वडिलांच्या डोक्यांत एखादी गोष्ट आली रे आली कीं लगेच ती अंमलांत आणावयाची, असा त्यांचा खाक्या होता. बेत कधीं बदलत नसत, कीं लांबणीवर पडत नसत. लगेच माझ्या जाण्याचा दिवस पण ठरला. निघावयाच्या आदल्या दिवशीं संध्याकाळीं त्यांनीं मला जवळ बोलावून घेतलें. आणि ते म्हणाले कीं तुझ्या रेजिमेंटच्या ऑफिसरला मी एक चिठ्ठी देतों. दौत टाक घेऊन ये बघूं.

'आणि हें बघा, मी पण त्यांना विचारलं आहे, म्हणून लिहा.'—आई म्हणाली.—'आणखी असं पण लिहा, कीं पेत्रुशावर तुमची नजर असूं द्या. फार दयाळू आहेत ते प्रिन्स ब...'

'काय, वेड लागलं आहे कीं काय तुला?'—वडील संतापून म्हणाले,—'प्रिन्स ब...हं. त्याला मी लिहिणार आहे, म्हणून कोणीं सांगितलं तुला?'

'अहो, असं काय करतां? आत्तांच तुम्ही म्हणालांत ना कीं पेत्रुशाच्या ऑफिसरला तुम्ही चिठ्ठी लिहिणार आहांत म्हणून?'

'बर मग? म्हणालों असेन.'

'म्हणजे काय? प्रिन्स ब...च त्याचा ऑफिसर नाहीं कां? सेमेनोव्ह रेजिमेंटमध्येंच पेत्रुशाचं नांव घातलं आहे ना?'

'बरं मग? मला काय त्याचं? पेत्रुशा कांहीं पीटर्सबर्गला जात नाहीं आहे. तिथें राहून तो काय शिकणार आहे? नुसती चैनचमन आणि उधळपट्टी. तें कांहीं नाहीं. तो सरळ सैन्यांत नोकरी करील. नॅपसॅक पाठीवर वाहील. लढाई पाहील. सैनिकाचा पेशा चांगला. हं. म्हणे गार्डसमधें त्याचं नांव नोंदलं आहे. काय चेष्टा आहे कीं काय? अशानं तो बिघडून जाईल...हं. त्याचा पासपोर्ट कुठें आहे? आण बघूं तो इकडे.'

माझ्या आईनें माझा पासपोर्ट नीट जतन करून ठेवला होता. मला बाप्तिस्मा दिला, त्या वेळचा माझा अंगरखा आणि पासपोर्ट, दोन्ही वस्तू नीट घड्या करून तिनें तिच्या पेटींत व्यवस्थित ठेवल्या होत्या. तिच्या थरथरत्या हातांत माझा पासपोर्ट होता, तो माझ्या वडिलांनीं लगेच काढून घेतला. पासपोर्टवरून त्यांनीं एकदां नजर टाकली. मग तो पुढ्यांतील टेबलावर ठेवून त्यांनीं पत्र लिहावयास सुरुवात केली.

इकडे जिज्ञासेनें मी जळत होतों. एकूण पीटर्सबर्गला मी जाणार नव्हतों तर! मग मी कोठें जाणार होतों? मला कांहींच समजेना. माझे वडील विचार करून

पुढ्यांतील कागदावर हळूं हळूं कांहीं तरी लिहीत होते. त्यांच्या हातांतील पिसाच्या टाकाबरोबर माझी नजर खालीं खालीं सरकत होती. शेवटीं त्यांनीं सही केली. पत्राची नीट घडी केली. पासपोर्ट, पत्र दोन्ही कागद एकाच लिफाफ्यांत घालून लिफाफा बंद केला. आणि मग डोळ्यांवरील चष्मा काढून ते मला म्हणाले,—' हं, हें तुझं पत्र. आन्द्रे कार्लोविच्‌ला हें द्यायचं. माझा जुना दोस्त आहे तो. हें बघ, कुठें जायचं तें तुला माहीत आहे ना ? ओरेनबर्गला. कळलं ? '

कळलें काय, कपाळ ? माझ्या साऱ्या सुखस्वप्नांचा चुराडा झाला होता. पीटर्सबर्गमधील चैनबाजी कोठें ? आणि साऱ्या जगापासून दूर कोणत्या तरी एका कोपऱ्यांतील ही कंटाळवाणी गांजणूक कोठें ? लष्करांतील चाकरीला मी लालचावलों होतों. कारण लष्करांत फार मजा असते, गंमत असते, सुखविलासांची चंगळ असते, असें मी ऐकलें होतें. आणि आतां बघतों, तर हा लष्करीपेशाचा खडतर मामला डोळ्यांसमोर आ वासून उभा होता. पण वडिलांच्या इच्छेविरुद्ध ब्र काढण्याची माझी हिम्मत नव्हती. तक्रार करून कांहीं फायदा नव्हता. वडिलांची आज्ञा चूपचाप मानण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं पोर्चमध्यें गाडी येऊन उभी राहिली. माझ्याजवळ सामान असें फारसें नव्हतेंच, एक ट्रंक आणि एक खोका. त्या खोक्यांत चहाची भांडींकुंडीं, लोणचीं, मुरंब्याच्या बरण्या आणि ताजे पाव, एवढ्याच वस्तू होत्या. घराची नित्य आठवण करून देणाऱ्या त्या वस्तू बरोबर घेऊन मी माझ्या घराचा निरोप घेतला. आईवडिलांनीं मला आशीर्वाद दिला. वडील म्हणाले,— ' हें बघ प्योत्र, ज्याच्या हाताखालीं तूं काम करणार आहेस, त्याचे सारे हुकुम बिन तक्रार ऐक. पण तुझ्या वरच्या अधिकाऱ्यासमोर उगाच हांजी हांजी करूं नकोस. कोणी सांगितल्याशिवाय तुझ्या मनानं कांहीं एक करूं नकोस. पण सांगितलेलं काम मात्र काळजीपूर्वक कर. आपली एक जुनी म्हण आहे. अंगरखा नवा आहे, तोंपर्यंत तो स्वच्छ ठेवावा आणि वय तरुण आहे तोंपर्यंत माणसानें आपली अब्रू निर्मळ ठेवावी. '—डोळ्यांत पाणी आणून माझ्या आईनें मला सांगितलं कीं प्रकृतीला जप. आणि सावेलिचला पण पुन्हां पुन्हां तेंच तें ती सांगत होती, कीं पेत्रुशा अजून लहान आहे. त्याच्या तब्येतीची नीट काळजी घे. निघतेवेळीं ससाच्या कमावलेल्या कातडीचा कोट त्यांनीं मला घालावयास दिला. कोल्ह्याच्या लोकरीचें अस्तर लावलेला कापडाचा एक ओव्हरकोट पण त्यांनीं माझ्या अंगावर टाकला. त्या वेळीं मी एकसारखा ओक्साबोक्शीं रडत होतों. शेवटीं सावेलिचनें माझा हात धरून मला गाडींत बसविलें. अशा रीतीनें आमचा प्रवास सुरू झाला.

संध्याकाळच्या वेळीं आम्हीं सिंबर्स्कला पोंचलों. या ठिकाणीं एक दिवस मुक्काम करून आम्ही राहणार होतों. जरूरीच्या कांहीं वस्तूंची खरेदी करावयाची

होती. आणि सावेलिचवर तें काम सोपविण्यांत आलें होतें. एका खाणावळींत आम्हीं मुक्काम ठोकला. दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे उठून सावेलिच आपल्या कामासाठीं चालता झाला. मी एकटाच मागें राहिलों. उठल्यावर कांहीं वेळ मी खिडकींत बसून राहिलों. बाहेरचा रस्ता अगदीं घाणेरडा होता. बाकी बाहेर कांहीं बघण्यासारखें नव्हतें. शेवटीं कंटाळून मी तेथून उठलों. आणि खाणावळींतील इतर सर्व खोल्यांचा शोध घ्यावयास लागलों. बिलिअर्डच्या खोलींत एक भला दांडगा मनुष्य दिसला. पस्तीस एक वर्षाचा तो असावा. त्याच्या मिशांचे आकडे खालीं वळविलेले होते. अंगांत त्यानें ड्रेसिंग गाऊन घातला होता. त्याच्या हातांत बिलिअर्ड स्टिक होती. आणि ओंठांत पाइप होता. मार्कर बरोबर तो खेळत होता. पैज लावून ते खेळत असावेत. कारण मार्करची सरशी झाली कीं लगेच वोदकाचा एक ग्लास तो पित असे. आणि हरला कीं दोन्ही हात खालीं टेकून जनावरासारखा टेबलाखालून तो फिरे. त्यांचा खेळ बघत मी बाजूला उभा राहिलों. शेवटीं मला असें दिसून आलें कीं मार्कर बिचारा एकसारखा सरपटत होता. आणि शेवटीं तर तो टेबलाखालींच बसून राहिला. शेवटीं त्या दांडग्या माणसानें चार शिव्या हासडून खेळ बंद केला, म्हणून बरें झालें. नाहीं तर मार्करचें मरण ओढवलें होतें. थोड्या वेळानें त्यानें मला 'खेळतोस कां?' म्हणून विचारलें. मला खेळतां येत नव्हतें, म्हणून मी 'नाहीं'—म्हटलें माझ्या नकाराचें त्याला फार नवल वाटलेंसें दिसलें. चांगला तरुण जवान पोरगा आणि बिलिअर्ड खेळत नाहीं म्हणतो, म्हणजे काय गोष्ट आहे? पण काय करणार? शेवटीं आम्ही उगीचच इकडच्या तिकडच्या गप्पा करावयास लागलों. बोलतां बोलतां त्याचें नांव सहज समजलें,—इवान इवानोविच झूरिन. घोडेस्वाराच्या एका पथकाचा तो कॅप्टन होता. सिंबर्स्कमध्यें रिक्रूट भरती करण्यासाठीं म्हणून त्यानें मुक्काम केला होता. माझ्याच खाणावळींत तो उतरला होता. शेवटीं 'पिणार काय?'—म्हणून त्यानें मला विचारलें. तेव्हां मोठ्या खुषीनें मी 'होय' म्हणालों. त्यानें पुष्कळच झोकली. माझ्या पुढ्यांतील ग्लास तो एकसारखा भरून ठेवीत होता. सैन्यांतील नोकरीची मला चांगलीच संवय व्हावयास हवी होती, म्हणून त्याचा हा उद्योग चालला होता. आम्ही पीत बसलों असतांना बराकींतील आयुष्यासंबंधीं किती तरी गंमतीच्या गोष्टी त्यानें मला सांगितल्या. त्याच्या त्या गोष्टी ऐकून हंसतां हंसतां माझी पुरेवाट झाली. आम्हीं बरोबरच जेवण घेतलें. तोंपर्यंत आमची चांगली गट्टी जमली होती. 'मी तुला बिलिअर्ड शिकवतों.' तो म्हणाला.—'सैन्यांतल्या शिपायांना बिलिअर्ड खेळतां यायला हवंच. असं पहा, समज, दौड चालू आहे आणि एखाद्या खेडेगांवांत सैन्याचा तळ पडला आहे. आतां वेळ कसा घालवणार? सारा वेळ तर कांहीं ज्यू लोकांना मारतां येत नाहीं. मग अशा वेळीं शिपाईगडी काय करतो? तो गांवांतल्या खाणावळींत जातो.

आणि बिलिअर्ड खेळतो. अशा वेळीं अशा ठिकाणीं दुसरं कांहीं करतां येत नाहीं. म्हणून तुला सुद्धां बिलिअर्डचे धडे घ्यायला हवेत. खरं म्हणजे एव्हांना तुला चांगलं खेळतां यायला हवं होतं. ठीक आहे. अजून कांहीं वेळ गेली नाहीं. '— त्यानें जें कांहीं सांगितलें, त्यावरून माझी खात्री पटली कीं आपल्याला बिलिअर्ड खेळतां येत नाहीं, म्हणजे मोठी शरमेची गोष्ट आहे. आणि लगेच बिलिअर्डचा खेळ शिकण्याच्या उद्योगास मी लागलों. झूरिन आरडाओरडा करून मला शिकवीत होता. उत्तेजन देत होता. खेळांतील माझी प्रगति पाहून तो जसा आश्चर्यानें स्तिमित झाल्यासारखा दिसत होता. थोडेंसें खेळून झाल्यावर--' आतां पैसे लावून खेळूं या. त्याशिवाय मजा नाहीं.-' असें तो म्हणाला.-' पैसे लावून खेळायचं, म्हणजे कांहीं पैशासाठीं म्हणून नाहीं. सहज गंमत म्हणून. '—त्यांचें मत तर असें दिसलें कीं पैसे लावून खेळलें नाहीं, तर तो जसा खेळच नव्हे. अर्थात् आतां पैसे लावून खेळणें भाग होतें. खेळावयास सुरवात करण्यापूर्वी त्यानें पंच मागविली. यापूर्वी मी कधीं पंचला शिवलों सुद्धां नव्हतों. पण त्यानें मला भारी आग्रह केला.-' तुला सैन्यांत नोकरी करायची आहे ना ? मग पंचसारख्या स्ट्रॉंग ड्रिंकची आधीं संवय करून घ्यायला हवी. '—त्याचा आग्रह मोडणें आतां शक्यच नव्हतें. तो म्हणेल, तसा मी बिनतक्रार वागत होतों. एकीकडे आमचा खेळ चालूच होता. आणि अधून मधून आम्ही पंचचे पेग्ज घेत होतां. त्यामुळें मला चेव चढल्यासारखा झाला होता. टेबलावरून माझे बॉल्स तडातड खालीं उड्या घेत होते. तें पाहून मी चिडलों होतों.—' तुला मार्क मोजतां येत नाहींत,'—म्हणून मार्करला शिव्या घालीत होतों. थोडक्यांत म्हणजे आईबापांच्या गुलामगिरींतून सुटून आलेल्या एखाद्या व्रात्य मुलासारखें माझें वर्तन होतें. आम्ही खेळण्यांत असे रंगून गेलों होतों कीं नकळत तासांमागून तास कसे निघून चालले होते, त्याची सुद्धां आम्हांला शुद्ध नव्हती. शेवटी झूरिननें खिशांतून घड्याळ काढलें. किती वाजले, तें बघून हातांतील बिलिअर्ड स्टिक टेबलावर टाकून दिली. आणि एकूण शंभर रुबल्स मी हरलों, म्हणून मला सांगितलें. तें ऐकल्यावर मात्र मी अस्वस्थ झालों, कारण माझे पैसे सावेलिचजवळ होते.— ' माफ करा. मागाहून थोड्या वेळानें मी तुमचे पैसे देतों.'— म्हणून मी त्याला सांगितलें. पण त्या बाबतींत त्याची तशी कांहीं घाई दिसली नाहीं.—' अरे यार, छोड दे. उसमें क्या है ? तुझ्या सवडीनं तूं पैसे दे. आतां आपण असं करूं. मादमोझेल अरिनुश्काच्या घरीं जाऊं. '

आतां यावर काय बोलणार ? सकाळपासून सारा दिवसभर मी खुळ्यासारखा वागत होतों. त्याच खुळेपणानें रात्रींसुद्धां माझी पाठराखण केली. रात्रीचें आमचें जेवणसुद्धां ह्या बाईच्या घरींच झालें. खाणें झाल्यावर पिण्याचा कार्यक्रम बराच वेळ चालू होता. माझ्या पुढ्यांतील ग्लास रिकामा होण्याचा अवकाश, कीं लगेच

थ्नरिन मोठ्या तत्परतेनें तो भरून ठेवी. मधून मधून—'लष्करच्या चाकरीची तुला संवय व्हायला हवी,'–म्हणून त्याचें पालूपद चालूंच होतें. शेवटीं उठावयाची वेळ आली, तेव्हां माझ्या लक्षांत आलें कीं मला धड उभे सुद्धां राहतां येईना. थ्नरिननें मला खाणावळींत पोंचविलें. तेव्हां मध्यरात्र उलटून गेली होती.

सावेलिच दारांतच उभा होता. लष्करच्या चाकरीचा माझा वाढता उत्साह माझ्या चालीवरून बहुतकरून त्यानें ओळखला असावा. माझी ती अवस्था बघून लगेच त्यानें माझा ताबा घेतला. माझ्या वर्तनानें तो आश्चर्यचकित झालेला दिसला. 'तुम्हीं कुठें गेला होतांत ? एवढा वेळ काय करीत होतांत ?'—दयेनें त्याचा ऊर जसा भरून आला होता.—'काय हें धनी ? तुम्हांला धड चालतां सुद्धां येत नाहीं. कोणाकडे बसून तुम्हीं इतकी झोकलींत ? अरे देवा, जगांत अशी दुष्ट माणसं असतात, हें आजच कळलं मला.'

'उगीच वटवट करूं नकोस.'—मी अडखळत म्हणालों,—'तुला फारच चढलेली दिसते आहे. जा. मुकाट्यानं जाऊन झोंप बघू ! आणि मलाहि झोंपव.'

दुसऱ्या दिवशी सकाळीं मला जाग आली, त्या वेळीं माझें डोकें ठणकत होतें. आणि आदल्या दिवशींच्या साऱ्या आठवणी माझ्या मनांत घोटाळत होत्या. साऱ्या आठवणी अंधुक होत्या. आठवणींच्या जंजाळांत मी गुरफटून गेलों होतों. तेवढ्यांत सावेलिच येऊन थडकला. त्याच्या हातांत चहाचा कप होता. मलाच देण्यासाठीं आणलेला. माझ्याकडे बघून दुःखभरानें त्यानें मान हलवली,—'फार लवकर प्यायला लागलांत तुम्हीं, धनी. पण हें बरं नव्हे. धनी, तुमच्या घरांतलीं सारीं माणसं कशीं आहेत ? तुमचे बापजादे कांहीं दारुडे नव्हते. आणि आईनं तर दारूच्या थेंबाला कधीं स्पर्श केला नाहीं. आणि इतक्यांत तुम्हांला अशी संवय तरी कशी झाली ?.. हं. बरोबर. तुमचा गुरू कोण, तें आतां माझ्या ध्यानांत आलं. तुमचा तो फ्रेंच मास्तर असेल बहुतेक. सारा वेळ सैपाकघरांतच त्याचा मुक्काम असायचा. सैपाकीण बाईकडे त्याचा सदा तगादा असायचा कीं मला वोदका हवी म्हणून. बरंच शिकवून तरबेज केलेलं दिसतं आहे त्यानं तुम्हांला. कुत्तरडा लेकाचा. अशा हलकट माणसाला त्यांनीं घरांत तरी कसं घेतलं, तेंच मला समजत नाहीं. घरांत नोकर-चाकर काय कमी होते ?'

माझी मलाच लाज वाटली. भिंतीकडे तोंड करून मी म्हणालों,—'जा तूं आतां. चहा वगैरे मला मुळींच नको आहे.'—पण तो कांहीं जागचा हलला नाहीं. विनाकारण उपदेश करीत बसण्याची त्याची खोड फार जुनी होती. आणि आतां त्याच्या तडाख्यांतून सुटका करून घेणें तसें सोपें नाहीं, हें लगेच माझ्या लक्षांत आलें.—'दारूचे परिणाम फार वाईट होतात, धनी. दारू ढोसल्यावर काय होतं, तें आतां तरी कळलं कां तुम्हांला ? डोक्यांत सणका मारतात. अन्नावरची

वासनाच उडून जाते. प्योत्र आंद्रेइच, फार पिणारा माणूस अगदीं कुचकामाचा असतो...मीठमधाऱ्या गुळण्या करा. कां वोदका घेतां ? त्यानं बरं वाटेल तुम्हांला. आणूं कां वोदका ? '

पण तेवढ्यांत झूरिनची चिठ्ठी घेऊन एक पोऱ्या आला. चिठ्ठींत त्यानें लिहीलें होतें :

प्रिय प्योत्र आंद्रेइच, काल शंभर रुबल्स तूं हरला होतास. ती रक्कम या पोराबरोबर पाठवून द्यावी. पैशाची मला भारी निकड आहे.

तुमचा विश्वासू नोकर,
**इवान झूरिन**

ती चिठ्ठी पाहून मी चाट झालों. पण पैसे काढून देणें तर भागच होतें. जसें कांहीं घडलेंच नाहीं, अशा निष्काळजी स्वरांत मी सावेलिचला सांगितलें कीं त्या पोराला शंभर रुबल्स दे.—' कां ? कशासाठीं ? काय म्हणून ?'—त्या धक्क्यानें खचलेल्या सावेलिचनें विचारलें.—' मुकाट्यानं दे म्हणतों ना ? '—' कशाचे पैसे ? '—म्हणून लांब जीभ करून त्यानें मला विचारलें.—' मी त्याचं देणं लागतों.' —मी शांतपणानें म्हणालों. आतां तर सावेलिच हतबुद्ध झालेला दिसला.— ' म्हणजे काय ? देणं कसलं ? कर्ज काढायची पाळी आणलींत कां एवढ्यांत ? छेः यांत कांहीं तरी काळंबेरं दिसत आहे. मी मुळींच पैसे देणार नाहीं. '

हीच एक वेळ होती. या वेळीं जर कां या हट्टी थेरड्याचा वरचष्मा चालूं दिला, तर पुढें कधींच तो मला बधणार नाहीं, हें मला कळून चुकलें. सध्यां तरी निदान त्याच्या हातीं माझ्या पैशाच्या नाड्या होत्या. करडेपणाचा आव आणून मोठ्या तोऱ्यांत मी त्यालां सांगितलें,—' हें बघ. तूं माझा चाकर आहेस. पैसा माझा आहे. माझ्या पैशाचं मी काय वाटेल तें करीन. मी पैसे गमावलें, तर ते पैसे माझेच आहेत ना ? चल नीघ इथून. जादा शहाणपणा करूं नकोस. मुकाट्यानं आधीं पैसे आणून दे बघूं.'

माझा तो अवतार बघून सावेलिचची पांचावर धारण बसली. हातवारे करून उगीचच त्यानें आरडा ओरडा केला. पण मी त्याच्याकडे लक्षच दिलें नाहीं. आवाज चढवून मी जोरांत ओरडलों,—' चल चालता हो इथून.'—त्या सरशीं तो एकदम रडावयास लागला.—' काय हें प्योत्र आंद्रेइच ? तुम्हांला हें शोभत नाहीं. अशानं मी मरून जाईन. माझं म्हाताऱ्याचं ऐका; त्या बदमाष माणसाला एकदां अखेरचं सांगून टाका कीं आमच्याजवळ एवढे पैसे नाहींत.'—रडत रडत सावेलिच बोलत होता,—' हे शंभर रुबल्स म्हणजे काय चेष्टा आहे ?

त्याला स्वच्छ सांगून टाका कीं मी खेळलों तें थट्टेंत. पैसे लावून जुगार खेळायची मला संवय नाहीं. माझ्या आईबापांनीं मला असं शिकवलं नाहीं.'

'फार वेळ ऐकून घेतलं तुझं.'—मी एकदम तोडून म्हणालों,—'आधीं पैसे आण बघूं. नाहीं तर धक्के मारून तुला घालवून देईन.'

बिचारा सावेलिच. यावर तो तरी काय बोलणार ? दुःखभरानें त्यानें एकदां माझ्याकडे वळून पाहिलें आणि मग मुकाट्यानें पैसे आणण्यासाठीं तो निघून गेला. मला फार वाईट वाटलें त्याचें. पण या वेळीं मी निश्चयच केला होता कीं त्याला चांगला धडा शिकवायचा म्हणून. मी कांहीं आतां लहान नव्हतों. झूरिनचे पैसे मी पाठवून दिले. छोट्या धनी साहेबांना त्या खाणावळींतून शक्य तितक्या लवकर बाहेर काढण्याची सावेलिचनें धडपड चालविली. थोड्या वेळानें घोडे तयार आहेत, म्हणून त्यानें वर्दी दिली. माझी सदसद्विवेकबुद्धि मला टोंचीत होती. जें कांहीं घडलें, त्याचा मला पश्चात्ताप झाला. मी सिंबर्स्क सोडलें, तेव्हां झूरिनचा निरोपसुद्धां घेतला नाहीं. त्याची माझी फिरून कधीं भेट होईल, अशी फारशी शक्यता नव्हती. त्याला खाणावळींत तसाच सोडून मी माझ्या मार्गाला लागलों.

---

# प्रकरण दुसरें

## वाटसरू



दूर देश हा माहित नव्हता।
शोध तयाचा नव्हतों वांछित
वारू अबलख नव्हतों दौडत—
याच दिशेनें,—तरिहि अभावित
आलों येथें कारण नसतां!
पोर वयांतिल हूडपणानें
तरुणपणाच्या बेफिकिरीनें
मद्यार्काच्या बेहोषीनें
खेंचुन नेलें बघतां बघतां!
—जुनें गाणें

प्रवासास सुरुवात झाली खरी. पण रस्ता कापीत असतांना माझ्या मनांत जे कांहीं विचार येत होते, ते कांहीं फारसे बरे नव्हते. एक तर पैशाचा म्हणून मी जो कांहीं फटका खाल्ला होता, तो त्या दिवसांच्या मानानें एकंदरींत काळजी करण्यासारखा होता. सिंबर्स्कच्या खाणावळींत मी जें वर्तन केलें होतें, तें कांहीं शहाणपणाचें खचित नव्हतें. आणि मनांतल्या मनांत मी तशी कबूली देऊन सुद्धां टाकली. दुसरी एक गोष्ट माझ्या मनाला खात होती. सावेलिचशीं मी ज्या तऱ्हेनें वागलों होतों, तिचें आतां मला मनस्वी दुःख होत होतें. घोडागाडींत तो गाडीत्रानाशेजारीं बसला होता. माझ्याकडे पाठ करून. मुळींसुद्धां बोलत नव्हता तो. मधूनच तो सुस्कारा सोडी. त्याची समजूत काढण्याचा मी निश्चय केला होता. पण त्या साठीं मी काय करावयास हवें, तेंच मला समजत नव्हतें. शेवटी मी म्हणालों,—'हें बघ सावेलिच, पुरें झालं आतां. अरे, किती वेळ फुरगटून बसशील? मी चुकलों. कबूल आहे मला. तुझ्याशीं इतक्या कठोरपणानं मी वागायला नको होतं. खरंच सांगतों, यापुढें मी नीटपणानं वागेन. तुझं ऐकेन. रुसतोस काय असा? जरा बोलशील कीं नाहीं?'

'प्योत्र आंद्रेइच, छोटे मालक,'—निश्वास सोडून तो म्हणाला,—'मी माझ्यावरच रागावलों आहे. चूक माझीसुद्धां आहे. खाणावळींत तुम्हांला असे एकटे सोडून मीच जायला नको होतं. खरं सांगूं? मी एकटाच गेलों तुम्हांला टाकून, त्याला कांहीं कारण होतं. माझ्या ओळखीची एक बाई गांवांत रहात होती. आणि तिला भेटायचा मोह मला कांहीं आवरतां आला नाहीं. मैत्रीची

ही गांठभेट आणि तुरुंगांत शेवट, असं होतं बघा कधीं कधीं. माझ्या मनाला पण गोष्ट भारी लागून राहिली होती. तिकडे मालकांना हें माझं काळं तोंड कसं दाखवूं आतां ?: त्यांना एकदां कळलं कीं आपला मुलगा दारू पितो आणि जुगारांत पैसे घालवतो कीं मग काय वाटेल त्यांना ?'

बिचारा सावेलिच ! त्याला मनस्वी दुःख झालेलें दिसलें. त्याला बरें वाटावें, म्हणून मी त्याला शपथेवर सांगितलें कीं यापुढें तुझ्या संमतीशिवाय मी एक कोपेक सुद्धां खर्च करणार नाहीं. थोड्या वेळानें त्याचा मनस्ताप शांत झाल्यासारखा दिसला. पण तरीसुद्धां तोंडें वेडींवाकडीं करून मधून मधून तो पुटपुटत होताच,— ' शंभर रुबल्स म्हणजे कांहीं थट्टा नाहीं.'

हळूं हळूं माझें मुक्कामाचें ठिकाण जवळ येत होतें. भोंवतालीं सगळीकडे कंटाळवाणीं गवताळ माळरानें पसरलेलीं होतीं. मधूनच एखादा उंचवटा दिसेल तेवढाच. या भागांतील टेकड्या लहानखुऱ्या होत्या. सगळीकडे बर्फ पसरलेलं होतें. पश्चिमेला सूर्य बुडत होता. एका अरुंद रस्त्यावरून गाडी घरंगळत होती. बाकी रस्ता तरी कसला म्हणा. शेतकऱ्यांचे खटारे आधीं केव्हां तरी तेथून गेले होते. त्यांच्या चाकोऱ्या बर्फात उमटलेल्या दिसत होत्या, तोच आमचा रस्ता. मध्येंच एकदां अचानक एका बाजूला वळून गाडीवान काळजीभरल्या नजरेनें एकसारखा बघावयास लागला. शेवटीं टोपी हातांत घेऊन माझ्याकडे वळून अदबीनें तो म्हणाला,—' मला वाटतं, इथूनच आपण परतावं, हें बरं.'

' कां रे, काय झालं ? '

' हवेचा कांहीं भरवसा देतां येत नाहीं. वारा सुटला आहे. रस्त्यावरचं बर्फ वारा कसा उधळीत चालला आहे, बघा.'

' बरं मग ? त्याचं काय मोठंसं ?'

' तिकडे बघा एकदां.'—पूर्व दिशेच्या रोखानें चाबूक उडवीत तो म्हणाला.

' तिकडे काय आहे ? नुसतं गवताळ मैदान आहे. आणि आभाळ तर स्वच्छ आहे.'

' पलिकडे बघा. तो ढग दिसला कां ? '

मी बघितलें, तर खरेंच क्षितिजाच्या कडेला एक लहानसा पांढुरका ढग तरंगत होता. दूरवरच्या एखाद्या लहानशा टेकडीसारखा तो दिसत होता. गाडीवान म्हणाला कीं तो ढग वादळ आणणार आहे.

आतां मला आठवण झाली. मीं ऐकलें होतें कीं या भागांत बर्फाचीं वादळें बघतां बघतां एकदम कोठून तरी उमटत. आणि रस्त्यांतील सर्व गाड्या बर्फात डुबवून टाकीत. सावेलिचनें गाडीवानाचें म्हणणें उचलून धरलें. तेथूनच परतावें, असें त्याचें पण मत दिसलें. मला वाटलें कीं वाऱ्यांत तसा कांहीं फारसा जोर

नाहीं आणि पुढील मुक्काम सहज वेळेवर आपण गाठूं. म्हणून गाडीवानास मी सांगितलें कीं हाण चाबूक.

गाडीवान काय, बिचारा हुकुमाचा ताबेदार. त्यानें गाडी पुढें काढली. पण मधून मधून भेडसावणाऱ्या पूर्वेकडे त्याची नजर वळत होती. पण आतां घोडे चौखूर उधळले होते. वाऱ्याचा वेग आणखी वाढला होता. बघतां बघतां त्या चिमुकल्या ढगानें अक्राळ विक्राळ रूप धारण केलेलें दिसलें. आणि थोड्या अवकाशांत आभाळभर तो ढग पसरला. पहिल्यांदा बर्फ नुसता भुरुभुरू कणकण पडत होता. आणि थोड्याच वेळांत सर्व वातावरण बर्फमय झालें. वारा मोकाट सुटला. आणि बर्फाच्या वादळांत घुसून मिसळून गेला. क्षणभरांत काळेंकुट्ट आभाळ पांढऱ्या शुभ्र बर्फराशींत जसें एकरूप झालें. रस्त्याचा मागमूस कोठें दिसेना.–' बघा आतां मालक, '—गाडीवान ओरडून सांगत होता,—' घ्या आतां, हें आलं बर्फाचं वादळ. आतां आपली धडगत नाहीं. '

गाडीच्या टपाआडून मी बाहेर पाहिलें, तर सगळीकडे काळोख दाटला होता. वादळवारा असा कांहीं भयंकर सोसाट्यानें घुमत होता कीं कानांत दडे बसले. एखाद्या अजस्त्र हिंस्र श्वापदासारखी चहूंबाजूंनीं त्याची चाहूल लागत होती. त्याच्या फुसकारण्यानें दाही दिशा जशा धुंद झाल्या होत्या. आमच्या अंगावर बर्फाचे थर सांठले होते. घोडे कसेबसे रडत खडत चालले होते. त्यांची चाल पण क्षणभरानें खुंटली.

' कां रे, थांबलास कां ? हाकल गाडी.'—गाडीवानाला मी ओरडून सांगितलें. खरें म्हणजे माझाच धीर सुटला होता.—' कशाला ? त्याचा आतां कांहीं उपयोग नाहीं नाहीं.—' बसल्या जागेवरून खालीं उतरून गाडीवान म्हणाला,–' आपण कुठें आहोंत, त्याची पण याद नाहीं. रस्ता पार गाडला गेला आहे. काळोखांत कांहीं दिसत पण नाहीं. '—मी त्याची चांगली खरडपट्टी काढणार होतों. पण सावेलिचनें त्याचीच कड घेतली—' तो बिचारा वेळींच सांगत होता. त्याचं कां ऐकलं नाहीं तुम्ही ? '—रागारागानें तो बोलत होता,—' खरं म्हणजे आपण लगेच परत फिरायला हवं होतं. वेळींच मागे फिरलों असतों, तर खाणावळींत सुखरूप पोंचलों असतों. गरम गरम चहा पोटांत रिचवला असता. रात्रभर पांघरुणांत झोपून राहिलों असतों. तोंपर्यंत वादळ निघून गेलं असतं. उद्यां सकाळीं पुन्हां निघालों असतों. त्याचं काय मोठंसं ? आपल्याला घाई थोडीच होती ? कांहीं लग्नाचा मुहूर्त साधायचा होता, असं तर नाहीं ना ?'—त्याचें म्हणणें मला पटलें. आतां विनाकारण आम्हीं संकटांत सांपडलों होतों. शत्धारांनीं बर्फ कोसळत होतें. गाडीच्या भोंवतीं बर्फाचे डोंगर उभे राहिले होते. खालीं माना घालून घोडे जागच्या जागीं थंड उभे होते. मधून मधून त्यांचीं अंगें शहारत होतीं. गाडीवान उगीचच गाडीच्या भोंवतीं चकरा मारीत होता. मधूनच खोगीर सारखें करीत होता.

सावेलिचचें रडगाणें चालूच होतें. मी इकडे तिकडे बघत होतों. आशाळभूत नजरेनें वादळांतून वेध घेत होतों. उजेडाचा एखादा किरण, रस्त्याची कांहीं निशाणी कुठें अंधुक दिसते कां, म्हणून विनाकारण बघत होतों. पण वादळाच्या अवसानांत कांहीं गवसत नव्हतें. आणि मग एकाएकी कांहीं तरी काळी वस्तू दिसल्याचा मला भास झाला. लगेच मी ओरडून उठलों,—'अरे ए, ते तिकडे काय दिसतं आहे, बघ जरा. तें काळं काय आहे? अरे खुळ्या, तिकडे नाहीं. हं तिकडे. तें काळं काय आहे?'—मी दाखविलेल्या खाणाखुणांच्या दिशेनें गाडीवानानें पाहिलें. 'आहे खरं. काय आहे, भगवान जाणें.'—तो म्हणाला. आणि उडी मारून परत एकदां आपल्या जागेवर चढून बसला.—'ती कांहीं गाडी नाहीं. झाड नाहीं, हें तर नक्की. तें हलतं आहे. बघितलंत? असेल एखादा लांडगा, नाहीं तर माणूस.'

'त्या काळ्या वस्तूच्या रोखानं गाडी चालव'—म्हणून मी त्याला सांगितलें. मी बघितलें, तर ती काळी वस्तू आमच्याच रोखानें चाल करीत होती, असें दिसलें. चार दोन मिनिटांत आम्हीं त्या वस्तूजवळ येऊन थडकलों. वस्तू कसली म्हणा. तो माणूसच होता. त्याच्याकडे वळून गाडीवान ओरडला,—'भल्या गृहस्था, रस्ता कुठें आहे, तुला माहीत आहे कीं?'

'हा काय? रस्ताच आहे कीं; माझ्या पायाखालीं चांगली जमीन आहे.' तो माणूस म्हणाला,—'पण या वादळांत रस्त्याचा कांही उपयोग नाहीं.'

मग मी त्याच्याशीं बोलावयास लागलों. त्याला विचारलें,—'भल्या माणसा, अरे, या भागाची तुला कांहीं माहिती आहे कां? रात्रीचा निवारा कुठें मिळेल, तें सांगशील, तर फार उपकार होती बघ.'

'मला या भागाची चांगली माहिती आहे.'—तो वाटसरू म्हणाला.—'मला नाहीं, तर कोणाला माहिती असणार? शंभर वेळां मी हे सारे रस्ते पायांखालीं तुडवले आहेत. पण ही हवा बघा. अशा हवेंत रस्ता मिळून कांहीं उपयोग नाहीं. मी सांगतों, असं करा तुम्हीं आतां. इथेंच थोडी कळ काढा. थोड्या वेळानं वादळ ओसरेल. ढग पांगतील. आभाळ स्वच्छ झालं कीं चांदण्या दिशा दाखवतील. मग पुन्हां वाटचाल करायला हरकत नाहीं.'

हा माणूस शांत होता. जरा सुद्धां गोंधळलेला दिसत नव्हता. त्याच्या शांतपणानें माझ्या मनांतील आशा पालवली. खरें म्हणजे देवाच्या दयेवर हवाला ठेवून या गवताळ जंगलांत सारी रात्र काढावयाची, असें मी मनाशीं ठरविलें होतें. पण क्षणभरानें तो रस्त्यावरचा माणूस टुण्दिशी उडी मारून गाडीवानाजवळ बसला. त्याच्या त्या चपळाईनें मी थक्कच झालों. त्यानें गाडीवानाला सांगितलें,—'हें बघ, इथून जवळच एक घर आहे. उजव्या बाजूला गाडी वळव. आणि नाका समोरचा रस्ता धर.'

' उजव्या बाजूला काय म्हणून वळायचं ? '—गाडीवान चिडलेला दिसला. ' मला तर रस्ता कुठेंच दिसत नाहीं. गाडी हांक, म्हणून सांगायला काय लागतं ? घोडे दुसऱ्याचे. गाडी दुसऱ्याची. पण तूं मला हुकूम करणार ? दिडक्या थोड्याच देणार आहेस ? ' गाडीवान सांगत होता, तेंच बरोबर आहे, असें मला वाटलें—' जवळच घर आहे, असं तूं म्हणतोस, तें कशावरून ? '—मी त्याला विचारलें.—' कारण वारा त्या दिशेकडून वाहतो आहे. तिकडून धुराचा वास येतो आहे. '—तो वाटसरू म्हणाला.—' म्हणजे जवळच कुठें तरी एखादं गांव असलं पाहिजे. '—त्याच्या हुशारीनें मी चकित झालों. त्याला धुराचा वास आला होता. म्हणजे आमचीं नाकें जागच्या जागीं असून नसल्यासारखींच होतीं. मी गाडी हाकलायला सांगितलें. वाटेंत बर्फाचे थर एकावर एक सांचले होते. घोड्यांची चाल मुष्किलीची होती. गाडी हळूं हळूं कशीबशी बर्फाच्या ढिगाऱ्यांतून पुढें चालली होती. मध्येंच एखाद्या झाडाला अडखळत होती. खड्डयांत घरंगळून पडत होती. वादळी दर्यात सांपडलेल्या पडावासारखी वर खालीं हेलकावत होती. सावेलिच मधून मधून माझ्या अंगावर लगटून पडत होता. मी खिडकीचे पडदे खालीं सोडले. लोकरीचा कोट अंगावर घट्ट लपेटून घेतला. आणि डोळे मिटले. वादळ-वाऱ्याची शीळ मला अंगाई गीतासारखी वाटली. आणि गाडीच्या हिंदकळणाऱ्या गतींत मला सहज झोप लागली.

झोपेंत मला एक स्वप्न पडलें. स्वप्न असें होतें कीं तें मी जन्मांत कधीं विसरणार नाहीं. पुढें जें कांहीं अघटित घडून येणार होतें, त्याचें भविष्यच जणुं त्या स्वप्नानें वर्तविलें. स्वप्नादिकांवर माणसाचा विश्वास असो वा नसो, अशा परिस्थितींत माणूस क्षणार्धांत कोणत्याहि स्वप्नावर चटदिशीं विश्वास ठेवावयास तयार होतो; हा तर नित्याचा अनुभव आहे. तेव्हां माझें स्वप्न मीं जर थोड्या विस्तारानें वर्णन करून सांगितलें, तर त्याबद्दल वाचकांनीं मला क्षमा करावी.

त्या वेळीं माझ्या शरीराची आणि मनाची अशी कांही अवस्था होती कीं जें कांहीं साक्षात घडत होतें, त्यांतील कांहीं अंश स्वप्नांत सहज मिसळून गेला. झोपेची चाहूल नुकतीच लागत असली कीं चालूं घटकेचे अनुभव स्वप्नांत कांहीं विचित्र प्रतिमांचे आकार धारण करतात. स्वप्नांत मला असें दिसलें कीं वादळ अजून घोंघावत होतें. आणि बर्फ पांघरलेल्या गवताळ मैदानांतून आम्ही असेंच भटकत होतों...आणि मग एकदम समोरच एक दार दिसलें. दारांतून आंत शिरतां क्षणीं एका मोठ्या जुनाट वाड्याच्या प्रशस्त अंगणांत आम्हीं आहोंत, असें मला वाटलें. आणि मग पहिला विचार माझ्या मनांत जो आला, तो हा कीं माझे वडील मी घरीं परत आलों, म्हणून माझ्यावर भयंकर रागावतील. त्यांना वाटेल कीं आपल्या इच्छेस न जुमानतां आपला हा उनाड मुलगा लष्करांत नोकरी करावयाचें सोडून मुद्दाम घरीं परत आला आहे. मनाच्या संत्रस्त अवस्थेंत मी चालत्या गाडींतून

खालीं उडी टाकली. आणि समोर पाहिलें, तर माझी आई दुःखभरानें ऊर पिटून आक्रोश करीत धांवत येत होती. तिनें मला जवळ घेतलें. आणि हुंदके देत सांगितलें कीं तुझे वडील फार आजारी आहेत. ही त्यांची अखेरची घटका आहे. तुझा निरोप घेण्यासाठींच ते थांबले आहेत.—ती दुष्ट बातमी ऐकतांच भयानें माझ्या अंगावर कांटा उभा राहिला. पण तरी सुद्धां तिच्या मागोमाग मी मुकाट्यानें चालावयास लागलों. एका काळोखभरल्या खोलींत आम्हीं शिरलों. मधोमध भला मोठा पलंग होता. आणि त्याच्या भोंवतालीं चारी बाजूंनीं सुतकी चेहऱ्याचीं माणसें उभीं होतीं. मी हळूंच त्या घोळक्यांत शिरलों. आईनें मच्छरदाणीचा एक कोपरा जरा वर उचलला. आणि अगदीं हळू आवाजांत ती म्हणाली,—'आंद्रे पेत्रोविच, पेत्रुशा आला आहे. त्याला तुमच्या आजाराची बातमी कळली. आणि म्हणून तुम्हांला भेटण्यासाठीं तो तसाच परत आला आहे. त्याला जवळ घ्या आणि आशीर्वाद द्या.'—गुडघे टेकून मी पलंगाजवळ बसलों. आणि त्या आजारी माणसाकडे बघतों, तो काय आश्चर्य ? माझ्या वडिलांच्या जागीं तेथें पलंगावर एक शेतकरी पांघरूण लपेटून झोपलेला दिसला. त्याची दाढी काळीभोर होती. तो हंसत हंसत माझ्याकडे बघत होता. मी गोंधळून गेलों. आईकडे वळून मी विचारलें,—'म्हणजे ? याचा अर्थ काय ? हे कांहीं माझे वडील नाहींत. या शेतकऱ्याजवळ मी काय म्हणून आशीर्वाद मागूं ?'—'हरकत नाहीं, पेत्रुशा,'—आई म्हणाली,—'तुझ्या लग्नाच्या वेळीं तुझ्या वडिलांच्या ठिकाणीं हेच असतील. त्यांना नमस्कार कर. आणि त्यांचा आशीर्वाद माग.'—पण कांहीं केल्या माझ्या आईचें म्हणणें मला पटेना. तेवढ्यांत त्या आजारी माणसानें पलंगावरून खालीं उडी मारली. पांघरुणांतच लपवून ठेविलेली कुऱ्हाड बाहेर काढली. आणि ती कुऱ्हाड हातांत घेऊन तो भोंवतालच्या माणसांवर तुटून पडला. मी पळून जाण्याचा यत्न केला. पण मला पळतां सुद्धां येईना. जमिनीला माझे पाय जसे चिकटले होते. खिळल्यागत जागच्या जागींच मी उभा होतों. थोड्याच वेळांत ती खोली मुडद्यांनीं भरून गेली. वाटेंतील प्रेतें ओलांडून मला धड चालतां सुद्धां येईना. जमिनीवर जागोजाग रक्ताचीं थारोळीं सांचलीं होतीं. आणि रक्ताळलेल्या, निसरड्या जमिनीवरून माझे पाय घसरत होते. हातांतील धारदार कुऱ्हाड परजीत तो माणूस माझ्याजवळ आला. आणि माझ्या अंगावरून आपले हात फिरवून कुरवाळीत मला म्हणाला,—'अरे, असा भितोस काय ? जवळ ये. माझा आशीर्वाद हवा आहे ना तुला ?'—भयानें माझी बोबडी वळली होती....त्याच क्षणाला मला जाग आली. घोडे उभे होते. गाडी थांबली होती. सावेलिच माझी बाही धरून ओढीत होता. आणि म्हणत होता,—'उठा मालक, जागे व्हा. आपलं ठिकाण आलं.'

'ठिकाण ?—कोणतं ठिकाण ?'—डोळे चोळीत मी विचारलें.—'डोळे उघडून नीट बघा. समोर खाणावळ आहे पहा. देवाच्या दयेनं या कुंपणावर आपली गाडी आदळली बघा. उतरा आतां. आपल्याला आंत जायचं आहे.'

मी गाडींतून उतरलों. भोंवतालीं वादळ अजून सुद्धां घोंघावत होतें. पण वादळाचा जोर आतां बराच कमी झालेला दिसला. भोंवतालीं सगळीकडे मिट्ट काळोख होता. खाणावळवाला दारांत उभा होता. आपल्या कोटाच्या आड हातांतील कंदील त्यानें जसा दडवून ठेवला होता. त्याच्या मागोमाग आम्हीं आंत गेलों. खोली लहानशीच होती. खोलींत नाहीं नाहीं तें सामान दाटीवाटीनें कोंबलेलें दिसत होतें. पण तरी सुद्धां खोली झाडलेली दिसत होती. स्वच्छ होती. आंत अंधुकसा उजेड होता. भिंतीवर एक बंदूक होती. एका खुंटीवर कझाक टोपी होती.

खाणावळवाला एक म्हातारा याइक कझाक होता. त्याची साठी उलटून गेलेली दिसली. पण तरी सुद्धां एखाद्या तगड्या जवानासारखा तो दिसत होता. त्याच्या हालचाली चपळाईच्या होत्या. चहाचा सारा सरंजाम घेऊन सावेलिच माझ्या मागोमाग आंत आला. त्याला विस्तव हवा होता. चहा करण्यासाठीं. क्षणभरानें गरम गरम चहा मिळणार, ही नुसती कल्पना सुद्धां त्या वेळीं किती सुखदायक वाटली. खाणावळवाला सारी व्यवस्था लावण्यासाठीं तेथून निघून गेला.

'आपल्या बरोबरचा तो माणूस कुठें आहे ?'—मी विचारलें.

'या इथें आहे, मालक.'—वरून कोठून तरी आवाज आला. मान वर करून मी बघितलें, छतासरशीं एक फळी टांगलेली होती. आणि त्या फळीवर स्वारी आडवारली होती. पोटावर रुळणारी त्याची काळीभोर दाढी बसल्या जागेवरून मला दिसली. मांजराच्या डोळ्यांसारखे त्याचे डोळे काळोखांत लखलखत होते.—'थंडी वाजते आहे, नाहीं ?'—मी विचारलें.—'थंडी तर वाजतेच आहे. माझा कोट पण फाटका आहे.'—तो म्हणाला,—'आणि तो सुद्धां लोकरीचा नाहीं. मेंढराच्या कातडीचा ओव्हर कोट माझ्याजवळ होता. पण कालच दुसऱ्या एका खाणावळींत मी तो गहाण टाकला. आज अशी हुडहुडी भरण्यासारखी थंडी पडेल, अशी मला काल कल्पना नव्हती.'—तेवढ्यांत उकळता सामोवार हातांत घेऊन खाणावळवाला आंत आला. चहा झाल्यावर आमच्या त्या नवीन दोस्ताला मी हांक मारली. लगेच उडी मारून तो खालीं आला. आतां या अशा वेळीं गरम चहा पिण्यांत ब्रह्मानंद होता. या माणसाचा सारा रुबाब और दिसला. चाळिशीच्या घरांत तो असावा. तसा विशेष उंच नव्हता. पण खुजा देखील नव्हता. त्याची चण लहान होती. पण छाती मात्र चांगली भरदार, रुंद होती. त्याची दाढी दुरून काळीभोर दिसत होती. पण तो जवळ आल्यावर मी पाहिलें, तर दाढीचे कांहीं केस करड्या रंगाचे दिसले. त्याचे डोळे चैतन्यानें भारलेले होते. आणि बुबुळें कशाचा तरी वेध घेत इकडून तिकडे एकसारखीं नाचत होतीं. त्याच्या मुद्रेवरील आविर्भाव आकर्षक होता. पण एक गोष्ट मात्र खरी. साधा सीधा, भोळा भाबडा असा कांहीं हा माणूस नव्हता. लबाडीची चमक त्याच्या घाऱ्या डोळ्यांत होती. कझाक कापतात, तसेच त्याचे केस

कापलेले दिसत होते. त्याच्या अंगांतील कुडता जागोजाग फाटलेला होता. पण तो मात्र मेंढराच्या कातडीचा होता. पायांतील तुमान तातार फॅशनची होती. चहाचा कप मी त्याच्यापुढें केला. त्यानें चहाचा एक घुटका घेतला. आणि चेहरा वेडावाकडा करून मोठ्या अजीजीनें तो म्हणाला,—' हें बघा मालक, माफ करा. मी कझाक आहे. चहाची मला चव नाहीं. वोदका आणायला सांगतां कां जरा? फार उपकार होतील.—' त्याची मागणी मी एकदम मान्य केली. बाजूच्या एक कपाटांतून खाणावळवाल्यानें एक बाटली काढली. दुसऱ्या हातांत ग्लास घेऊन तो आमच्या पाहुण्याजवळ गेला. आणि मग एकदम जशी त्याची ओळख त्याला पटलेली दिसली.—' ओ हो, या आमच्या भागांत आलांत कां तुम्हीं फिरून?'—खाणावळवाल्यानें विचारलें,—' आतां कशापायीं येणं केलंत?'—पाहुण्यानें खाणावळवाल्याला डोळा घातला, हें माझ्या लक्षांत आलें. मिष्किलपणानें कोड्याच्या भाषेंत त्यानें जें उत्तर दिलें, त्याचा अर्थ मात्र माझ्या ध्यानांत आला नाहीं. तो म्हणाला,—' भाजीपाल्याच्या वावरांतून मी पुष्कळ भटकून आलों. धोग्याची चव घेतली. आजीबाईनं एक धोंडा फेकला. पण तो मला लागला नाहीं...हं... काय म्हणताहेत तुमचे लोक?'

' ते काय म्हणणार?'—नवलाची गोष्ट म्हणजे भाबडा दिसणारा हा खाणावळवाला त्याच्याच भाषेंत बोलत होता. त्याचा अर्थ पण मला समजला नाहीं. तो म्हणाला,—' रात्रीच्या प्रार्थनेची वेळ झाली आहे. पण पाद्याची बायको आम्हांला प्रार्थना करूं देत नाहीं. पाद्री इथें नाहीं. म्हणून सैतान मोकाट सुटला आहे.'— ' गप बस थेरड्या,'—पाहुणा म्हणाला,—' पाऊस आला, तर कावळ्याच्या छत्र्या पुष्कळ उगवतील. आणि कावळ्याच्या छत्र्या खंडीभर झाल्या, तर छत्र्यांसाठीं हव्या तितक्या टोपल्या मिळतील. ....आणि हें बघ,'—पुन्हां त्यानें डोळा घातला. —'कंबरेला कुऱ्हाड खोंचून ठेव. जंगलांतला राक्षस जवळपास फिरतो आहे. बरं आहे महाराज, तुम्हांला दुवा देतों.'—असें कांहीं तरी म्हणून त्यानें ग्लास हातांत घेतला. हातानें क्रॉसची खूण केली. आणि एकाच घोटांत ग्लास रिकामा केला. मग लगेच त्यानें माझा निरोप घेतला. आणि झटक्यांत उडी मारून त्यानें आपली फळी गांठली. तीं वाह्यात माणसें त्या वेळीं जें कांहीं बोललीं, त्याचा अर्थ मला मुळींच समजला नाहीं. पण नंतर वाटलें कीं ते दोघेजण याइक लष्कराच्या हालचालींसंबंधीं कांहीं तरी बोलत होते. १७७२ सालीं या लष्करानें बंड केलें होतें व तें नुकतेंच चिरडून टाकण्यांत आलें होतें. सावेलिच शांतपणानें हें सारें संभाषण एकत होता. पण तें ऐकून त्याला बरें वाटलें, असें दिसलें नाहीं. त्या दोघांकडेहि संशयखोर मुद्रेनें तो बघत होता. ही खाणावळ मोठ्या रस्त्यापासून बरीच दूर होती. गवताळ जंगलांत दडलेली होती. आणि एखाद्या चोराच्या गुहेसारखी ती दिसत होती. पण त्या वेळीं तिथें वस्ती करण्याखेरीज दुसरा उपायच नव्हता. वादळानें

आमच्या प्रवासांत अडथळा आणला होता, तो कांहीं अजून दूर झाला नव्हता. निदान रात्रीचा मुक्काम तरी तेथेंच करणें भाग होतें. सावेलिच त्रासलेला होता. आणि आतां तर चिडलेला दिसत होता. त्याची मला मोठी गंमत वाटली. आतां माझें म्हणाल, तर रात्रभर या निवाऱ्याच्या ठिकाणींच मी मुक्काम ठोकणार होतों. मुकाट्यानें कोपऱ्यांतील फळकुटांवर मी पसरलों. आणि दिली ताणून. सावेलिचला मात्र उडी मारून वरची फळी गांठावी लागली. खाणावळवाला जमिनीवरच झोपला. थोड्याच वेळांत ती काळोख भरली खोली घोरण्याच्या आवाजानें भरून गेली. लगेच मला झोपेनें घेरलें. आणि मी निपचित पडून राहिलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मला जाग आली, ती बऱ्याच उशीरा. मी खिडकींतून बाहेर पाहिलें, तर वादळ आतां शांत झालेलें दिसलें. बाहेर मैदानावर बर्फाची पांढरी शुभ्र, चमकदार चादर अंथरलेली होती. घोडे जीनबंद केलेले होते. आणि गाडी जय्यत तयार होती. निघण्यापूर्वीं खाणावळवाल्याला मी हिशोब विचारला. त्यानें रात्रीच्या मुक्कामाचे जे कांहीं पैसे सांगितले, त्यावरून सावेलिचला सुद्धां त्याच्याशीं कांहीं घासाघीस करावी, असें वाटलें नाहीं. नाहीं तर तो तसें करावयास सोडता ना. एवढेंच केवळ नाहीं, तर आदल्या दिवशी रात्रीं त्याच्या मनांत जे नाहीं नाहीं ते संशय आले होते, तें सुद्धां आतां आपोआप हद्दपार झाले. आमच्या त्या वाटसरू पाहुण्याला मी मुद्दाम बोलावून घेतलें. ऐन संकटाच्या वेळीं त्यानें केलेल्या मदतीबद्दल त्याचे मनःपूर्वक आभार मानले. आणि त्याचा निरोप घेतांना सावेलिचला सांगितलें कीं पिण्यासाठीं म्हणून त्याला पन्नास कोपेक्सची बक्षिसी दे. सावेलिचला माझ्या सांगण्याचा राग आलेला दिसला.—'वोदकासाठीं पन्नास कोपेक्स म्हणजे काय गोष्ट आहे ? आणि ते कशासाठीं ?'—त्यानें विचारलें.—'आपल्या गाडींत घालून त्याला खाणावळीपर्यंत वाहून आणण्याची त्यानें आपल्याला परवानगी दिली म्हणून ? पैसे तुमचे आहेत, मालक. पण तरी सुद्धां पैशाची अशी उधळपट्टी करणं बरं नाहीं. जातां येतां वाटेवरच्या वाटसराला खाण्यापिण्यासाठीं जर तुम्हीं असे पैसे द्यायला लागलांत, तर कांहीं दिवसांनीं तुमच्याबरोबर भीक मागायची पाळी येईल या गरीब नोकरावर.'—आतां त्याच्याशीं आणखी भांडण उकरून काढण्याची मला इच्छा नव्हती. शिवाय त्यानें जें कांहीं सांगितलें, तें खरेंच होतें. मी कबूल केल्याप्रमाणें माझ्याजवळचा सारा पैसा त्याच्या हातांत होता. पण माझ्या उपकारकर्त्याचें ऋण मी फेडूं शकत नव्हतों, याचेंच मला वाईट वाटत होतें.—'ठीक आहे.'—मी शांतपणानें म्हणालों—'तूं त्याला पैसे देणार नसशील, तर निदान माझा एखादा कपडा देऊन टाक. बिचाऱ्याजवळ पुरेसे कपडे सुद्धां नाहींत. ससांच्या कातडीचा माझा कोट आहे ना, तो देऊन टाक त्याला.'

'प्योत्र अंद्रेइच, काय सांगतांहांत तुम्ही, मालक ?'—सावेलिच म्हणाला.—'तुमच्या कोटाचं तो काय करील, माहीत आहे ? पुढच्या मुक्कामाला दारूसाठीं तो तुमचा कोट विकून टाकील. माणूस कां आहे तो ?'

त्याचे ते शब्द पाहुण्याच्या कानांवर गेले असावेत. कारण लगेच तो उसळून म्हणाला,—' तुला रे काय करायचं आहे, थेरड्या ? मी तो कोट विकून दारू ढोशीन, नाहीं तर आणखी कांहीं करीन. मालक मोठ्या खुषीनं आपला कोट मला देताहेत. ते जें काय म्हणतील, तें तुला मुकाट्यानं ऐकायला हवं. गुलाम तो गुलाम. पण मिजास केवढी ? '

' थांब कुत्तरड्या, तुझं चांगलं कांडात काढतों. अरे, तुला कांहीं लाजलज्जा आहे कीं नाहीं ? '—आतां मात्र सावेलिच रागावलेला दिसला,—' मालक झाले म्हणून काय झालं ? त्यांचं वय तें काय ? आणि तूं आपला खुशाल त्यांच्या अंगांतला कोट चोरायला निघाला आहेस. त्यांना कांहीं एक कळत नाहीं. पण तुला तरी कांहीं अक्कल आहे कीं नाहीं ? आणि काय रे, सभ्य माणसाचा कोट तुझ्यासारख्या मवाल्याला रे कशाला हवा ? शिवाय तो कोट तुझ्या अंगाला तरी येईल कां ? कां तो कोट अंगांत घालण्यासाठीं तूं आपलं सारं अंग चोरणार आहेस ?'

' उगीच वटवट करूं नकोस. '—एका काळीं सावेलिच मला शिकवीत असे, तें सारें विसरून मी त्याच्यावर ओरडलों,—' जा. आणि मुकाट्यानं माझा कोट घेऊन ये पाहूं. '

' अरे देवा, ही काय अवदसा तुम्हांला आठवली आहे ? अहो, तुम्ही म्हणतां, तो कोट अजून नवा आहे,'—रडवेला चेहरा करून सावेलिच म्हणाला,—' आणि तो या दारुड्या, उनाड माणसाला तुम्हीं देऊन टाकणार ? '

' कोट माझा आहे. मी त्याचं काय वाटेल तें करीन. आतां मुकाट्यानं माझा कोट आणतोस कीं नाहीं ? '—असें एकदां खडसावून सांगितल्यावर त्यानें मुकाट्यानें कोट आणून दिला. आणि त्या अडाणी शेतकऱ्यांनें तो तेथल्या तेथें आमच्या डोळ्यांदेखत अंगांत घालून पाहिला. खरें सांगावयाचें, तर तो कोट मलाच लहान होत होता. आणि त्याला तो घट्ट होणार, हें उघड दिसत होतें. पण तरी सुद्धां कसेबसें त्यानें आपलें अंग त्या कोटांत कोंबलें. शिवणीचे कांहीं धागे उचकटले आणि माझा कोट टराटर फाटतो आहे, हें बघून सावेलिचच्या अंगाची लाही झाली.

माझ्या बक्षिसीनें पाहुणा खुशालला. तो गाडीपर्यंत मला पोंचवायला आला. आणि मोठ्या अदबीनें मला सलाम करून म्हणाला,—' फार उपकार झाले, मालक. तुमच्या भलेपणाचं बक्षीस देव तुम्हांला देईल. देव तुम्हांला काय द्यायचं तें देईलच. पण मी मात्र तुमचे उपकार कधीं विसरणार नाहीं.'—असें म्हणून तों तेथून निघून गेला. गाडी चालू झाली. सावेलिचची कुरकूर चालूच होती. पण त्याच्या बडबडीकडे मीं लक्षच दिलें नाहीं. थोड्याच वेळांत काल रात्रीचें वादळ, तो पाहुणा, त्याला दिलेला माझा कोट, सारें कांहीं मी विसरून गेलों.

ओरेनबुर्गला पोंचल्यावर मी सरळ जनरल साहेबांना भेटावयास गेलों. तो धिप्पाड माणूस म्हातारपणीं थोडा वांकलेला दिसला. त्याच्या डोक्यावरचे लांब केस

पांढरे शुभ्र झाले होते. त्याच्या अंगांतील जुनाट युनिफॉर्मचा रंग आतां पार उडून गेला होता. आना इओहानोवनाच्या काळांतील प्राचीन योद्धयासारखा तो दिसत होता. आणि त्याच्या उच्चारांत जर्मन भाषेची झांक होती. माझ्या वडिलांचें पत्र मीं त्याच्या हातीं दिलें. त्यांचें नांव ऐकतांक्षणीं म्हातारा एकदम चमकला.—' माइन गॉट,'—तो म्हणाला,—' अरे, काल तुझा बाप तुझ्यासारखाच पोर सवदा होता. आणि आज तर तूंच केवढा मोठा झालेला दिसतो आहेस. वेळ काय भराभर जातो पहा.'—हातांतील पाकीट त्यानें फोडलें. आणि पत्रांतील मजकुरावरून त्यानें नजर फिरवली. वाचतां वाचतां एकीकडे त्याची धांवती टीका चालूंच होती.—' प्रिय आंद्रे कार्लोविच,...महाराज...हुजरांचे सेवेशी,...अरे, काय हें ? अशा पत्रांत ही दरबारी भाषा कशाला ? छे...असं लिहीणं त्याला शोभत नाहीं. माणसाला शिस्त हवी. पण एका जुन्या कामरादला आपण लिहीतों आहोंत, हें त्यानं विसरूं नये.... आपण मला विसरलां नसाल. हं...अरे, माणूस असा कधीं विसरतो काय ?... फील्ड मार्शल मिन्...हं, त्याचं काय ? बरं बरं...आणि कारोलिंका...लेकाची आठवण थड आहे....बरं, बरं असं आहे काय ?...आतां माझ्या कामाकडे वळतों. माझ्या मुलाला आपल्या सेवेंत सादर करीत आहे...वाः वाः काय भाषा आहे ? सेवेंत सादर करीत आहे म्हणे ! ...पोरगा अजून रुळलेला नाहीं....अरे, एवढ्यांत रुळेल कसा ?...माझा मुलगा, म्हणून त्याला दयामाया दाखवूं नका. चांगला धारेवर धरा...आणि हें काय लिहीलं आहे त्यानं ? ...साळूच्या काट्यांचे मोजे हातांत घालून त्याला चांगलं वळण लावा. साळूच्या काट्यांचे मोजे...म्हणजे काय ? ही काय रशियन म्हण आहे ? मला कांहींच समजत नाहीं'...

मी तें समजावून सांगितलें,—'त्याचा अर्थ असा कीं तुम्ही माझ्यावर दया करावी. कठोरपणानं वागवूं नये. हवं तसं वागण्याची मला सवड द्यावी. याला म्हणतात साळूच्या काट्यांचे मोजे...'

' असं काय ? बरं...बरं...हवं तसं वागायची त्याला सवड द्यावी...छेः छेः तूं म्हणतोस, तसा याचा अर्थ दिसत नाहीं. मुळींच नाहीं. बरं...बरं... ...सोबत त्याचा पासपोर्ट आहे...कुठें आहे ? हं. सांपडला...आहे...सेमेनोव्ह रेजिमेंटमध्यें त्याची रवानगी करावी...बरं, बरं, तसं करूं या. हरकत नाहीं... आपण आतां फार मोठें झालां आहांत. जनरलच्या हुद्यावर आहांत. पण तें सारं विसरून आणि जुना मित्रभाव स्मरून मी आपणांस ओळख देत आहे. तसदीची माफी असावी...अरे, काय हें ? जुन्या दोस्ताची ओळख माणूस जन्मांत कधीं विसरतो काय ? ...अखेरीस हातांतील पत्र आणि माझा पासपोर्ट बाजूला ठेवून जनरल साहेब म्हणाले,—' ठीक आहे. तुझ्या बापानं पत्रांत लिहिलं आहे, तें सारं मी करतों. क्ष रेजिमेंटमध्यें ऑफिसरच्या हुद्यावर मी तुझी नेमणूक करतों. तूं आतां

मुळींच वेळ घालवूं नकोस. उद्यांच्या उद्यां तातडीनं तूं बेलोगोर्स्कला जा. तिथें कॅप्टन मिरोनोव आहे. फार चांगला माणूस आहे. त्याच्यासारखा चांगला माणूस लष्करांत मिळायचा नाहीं. त्याच्या हाताखालीं तुला चांगली शिस्त लागेल. तुझ्या कामाची पण तुला चांगली माहिती होईल. इथें तुला कांहींच काम नाहीं. तुझ्यासारख्या टग्या पोरांना आळस बरा नव्हे. ठीक आहे. जेवायच्या वेळीं आपली भेट होईलच.'—असें म्हणून जनरल साहेबांनीं मला निरोप दिला.

म्हणजे आगींतून फोफाट्यांत,—मीं मनाशीं म्हणालों. माझा जन्मसुद्धां झाला नव्हता, तेव्हां मी गार्डांचा सार्जंट होतों. आणि आतां हें काय झालें ? आतां मला जसें हद्दपार करून टाकण्यांत येत होतें. किरगीझ–कैसाच्या गवताळ जंगलांत कोणत्या तरी दुसऱ्या किल्ल्यांत मला दिवस काढावे लागणार होते.—जनरल साहेबांबरोबर जेवण्याचा बहुमान मला मिळाला. ते स्वतः, त्यांचा ए. डी. सी. आणि मी तिघांनीं मिळून जेवण घेतलें. आणि त्या वेळीं जर्मन कंजूषपणाचा मला पुरेपूर अनुभव आला. दूरवरच्या त्या कंगाल मुलुखांत ताबडतोब माझी रवानगी झाली. याचें एक कारण कदाचित माझ्या जेवणाचा जादा खर्च नको, हें असण्याचा संभव आहे. कारण काय असेल तें असो, दुसऱ्या दिवशीं मी जनरल साहेबांचा निरोप घेतला. आणि माझा अखेरचा मुक्काम गांठण्यासाठीं म्हणून निघालों.

---

# प्रकरण तिसरें

*किल्ला*



किल्ला अमुचा घोर भयानक दगडाधोंड्यांचा
गरीब आहे खुराक अमुचा भाकरपाण्याचा
आले जर कां शत्रू येथें मौजेच्या शोधांत
मेजवानिचा बेत तयांना मिळेल निश्चित.
बंदुकगोळ्यांसगें देऊं खुराक दारूचा
मेजवानिचा बेत योजिला खासा तृप्तीचा !

—**शिपायांचें गाणें**

'महाराज, जुन्या पेशाचीं हीं माणसें !'

—**'डन्स' मधून**

बेलोगोर्स्कचा किल्ला ओरेनबुर्ग पासून चाळीस वेर्स्त अंतरावर आहे. आणि रस्ता सगळा याइक नदीच्या बाजूबाजूनें आहे. नदी खालाटींत आहे. रस्ता उंच डगरीवरून गेलेला आहे. अजूनपर्यंत नदी थिजलेली नव्हती. आणि बर्फानें झाकलेल्या शुभ्र तीरांमधून नदीचा शिशासारखा काळाभोर प्रवाह वाहत होता. नदीच्या दोन्हीं बाजूंनीं किरगीझचीं गवताळ रानें होतीं. मी विचारांत गढून गेलों होतों. आणि माझ्या मनांतील विचार उदासवाणे होते. छावणींतील आयुष्याचें मला विशेष आकर्षण वाटत नव्हतें. ज्या कॅप्टन मिरोनोवच्या हाताखालीं मी कामास लागणार होतों, तो कसा असेल, त्याचें चित्र मी कल्पनेनें काढूं बघत होतों. माझ्या कल्पनेंतील मिरोनोव कठोर, दुष्ट स्वभावाचा, तापट म्हातारा ऑफिसर होता. आपल्या चाकरींतच त्याचें अवघें लक्ष गुंतलेलें होतें. त्या पलीकडच्या जगाविषयीं तो सर्वस्वीं उदासीन होता. आणि मला आपलें उगीचच वाटलें कीं अगदीं किरकोळ अपराधाबद्दल मला तुरुंगांत डांबण्याची आणि शिधापाण्यावर ठेवण्याची तो जशी वाटच बघत होता. आतां संध्याकाळ झाली होती. गाडी वेगानें चालली होती.— 'काय रे, इथून किल्ला किती लांब आहे ?'—मी गाडीवानाला विचारलें.—'फार दूर नाहीं.'—तो म्हणाला,—'तो बघा, तो पलीकडे दिसतो आहे ना, तोच किल्ला.' —'कुठें ?'—म्हणून मी सभोंवार, सगळीकडे पाहिलें. मला वाटलें होतें कीं किल्ल्याची भक्कम तटबंदी, बुरूज, मिनार वगैरे दुरून दिसतील. पण डोळे ताणून मी पाहिलें, तेव्हां कांहीं लाकडी झोंपड्या मला दिसल्या. त्यांच्या भोंवतालीं लाकडाचेंच कुंपण होतें. रस्त्याच्या एका बाजूला गवताच्या तीन चार गंज्या दिसल्या. त्यांच्या

झापांवर बर्फाचे थर साचले होते. रस्त्याच्या दुसऱ्या बाजूला मोडकळीस आलेली एक चक्की होती. पण तिचीं पाखें फिरत नव्हतीं.—' किल्ला कुठें आहे ? '—मी चकित होऊन विचारलें.—' तो बघा, '—गाडीवान म्हणाला. ज्या दिशेनें तो चाबूक उडवीत होता, तेथें एक छोटेंसें गांवठाण होतें. थोड्यांच वेळांत गाडीनें गांवठाण गांठलें. बाहेरच्या बाजूला दिंडी दरवाजा होता. तेथें एक जुनाट तोफ गंजत पडलेली दिसली. गांवांतले रस्ते सारे अरुंद आणि वाकडे तिकडे होते. बहुतेक घरें बैठीं होतीं. आणि बहुतेक सारीं घरें गवतानें शाकारलेलीं दिसत होतीं. मी गाडीवानाला सांगितलें कीं मला किल्लेदाराकडे घेऊन चल. मिनिटभरानें एका छोट्याशा लाकडी घरासमोर गाडी थांबली. तें घर उंच चौथऱ्यावर होतें. आणि पलीकडेच चर्चची लाकडी इमारत दिसत होती.

गाडी थांबल्यावर कोणी कुत्रासुद्धां माझी चौकशी करावयास आला नाहीं. क्षणभर वाट पाहून मग मीच गाडींतून उतरलों. पोर्चमध्यें गेलों. दरवाजा उघडला. आणि आंतमध्यें डोकावलें. एक अपंग शिपाई टेबलावर खुरमांडी घालून बसला होता. त्याच्या पुढ्यांत एक हिरवा युनिफॉर्म होता. त्या हिरव्या युनिफॉर्मावर जांभळ्या चिंधोटीचें ठिगळ जोडीत तो बसला होता. माझ्याकडे वळून तो म्हणाला,—' आपण खुशाल आंत जा. मंडळी घरींच आहेत. '—त्या काळोखभरल्या पडवींतून मी आंत गेलों. आंतील खोली लहानशीच पण स्वच्छ दिसत होती. खोलींतील फर्निचर जुनाट होतें. एका कोपऱ्यांत कपबशांचें कपाट होतें. भिंतीवर ऑफिसरचा डिप्लोमा लटकत होता. डिप्लोमाची फ्रेम आणि कांच चकचकीत होती. फ्रेमच्या बाजूला तीन जुनाट चित्रें टांगलेलीं होतीं.—' किस्त्रिन आणि ओचाकोवचा वेढा, ' ' वधूची निवड, ' आणि ' मांजराची स्मशान यात्रा. ' खिडकी जवळ एक म्हातारी बाई बसली होती. तिच्या अंगांत लठ्ठ, गरम जाकीट होतें. आणि डोक्यावर रुमाल बांधलेला होता. हातांतील चातीवर लोकरीचे धागे ती गुंडाळीत होती. तिच्या समोरच धाग्यांची गुंजडी हातांत धरून एक एकाक्ष म्हातारा अदबीनें उभा होता. त्याच्या अंगावर ऑफिसरचा युनिफॉर्म होता.—' आपल्याला काय हवं आहे ? '—म्हातारीनें विचारलें. तिचें काम चालूंच होतें.—' सैन्यांत चाकरी करायला म्हणून मी आलों आहे. मी येऊन पोंचल्याची वर्दी कॅप्टनसाहेबांना द्यायला हवी, म्हणून मी आलों होतों, '—अर्धवट म्हातारीला उद्देशून मी बोलत होतों, ही गोष्ट खरी. पण माझें सारें लक्ष त्या एकाक्ष म्हाताऱ्यावर खिळलें होतें. तोच कमांडर आहे, अशी माझी समजूत झाली होती. त्यानंतर मनांतल्या मनांत आधींपासून जुळवून ठेवलेलें भाषण करण्याचें मी योजिलें होतें. पण तिनें मला तशी सवडच दिली नाहीं.—' इवान कुझमिच बाहेर गेले आहेत. '—ती म्हणाली,—' फादर गेरासिमकडे गेले आहेत ते. पण कांहीं हरकत नाहीं. ते घरीं नाहींत, तरी आपलं स्वागत मी करूं शकतें. इथें बसा आपण. '—मला असें

सांगून तिनें मोलकरणीला हांक मारली. आणि सार्जेटच्या शोधांत तिला पिटाळलें. मधल्या वेळांत त्या एकाक्ष म्हाताऱ्यानें चौकसपणानें मला नीट न्याहाळून घेतलें. —'आपण कोणत्या रेजिमेंटमधें यापूर्वी होतांत ?'—त्यानें विचारलें. मी लगेच त्याच्या शंकेचें समाधान केलें. त्यावर त्यानें पुन्हां विचारलें,—'आपण चांगले गार्ड होतांत, तर इथें छावणींत कशाला आलांत ?'—त्यावर मी सांगितलें कीं माझ्या वरिष्ठ अधिकाऱ्यांची तशीच इच्छा होती.—'असं. असं. म्हणजे गार्ड ऑफिसरला न शोभणारं असं कांहीं तरी वर्तन आपल्या हातून घडलेलं दिसतं आहे.'—त्या विलक्षण एकाक्षानें जणुं माझी उलट तपासणीच आरंभली होती. पण मालकिणीनें त्याला मध्येंच चापलें.—'तुझी वटवट बंद कर.'—ती म्हणाली,—'तरुण पाहुणा घरीं आला आहे. प्रवासाच्या दगदगीनं तो थकला भागला आहे. एवढी साधी गोष्ट तुला समजत नाहीं ? आणि हें बघ, हात जरा वर धर.'—मग माझ्याकडे वळून ती म्हणाली,—'हें बघा, आपल्याला या अशा एकाकी दूरवरच्या ठिकाणीं पाठवलं, म्हणून आपण कष्टी होऊं नका. इथें असे येणारे आपण पहिलेच आहांत, असं नाहीं. कीं शेवटचे पण नाहीं. एकदां कां इथली आपल्याला चांगली संवय झाली कीं मग त्याचं विशेष कांहीं वाटणार नाहीं. मला आठवतं, अलेक्सेइ इवानोविच श्वाब्रिन इथें आला, तो कोणाचा खून केला म्हणून. त्या गोष्टीला आतां चार वर्षे झालीं. त्यानं असं कां केलं, तें एक देवाला माहित. त्याचं असं झालं. तो आणि एक लेफ्टनंट एकदां गांवाबाहेर गेले. तिथें एकमेकांशीं ते लढले बिढले वाटतं. बरोबर तलवारी नेल्या होत्या त्यांनीं. त्या चकमकींत श्वाब्रिननं लेफ्टनंटला भोसकून ठार मारलं. आणि तें सुद्धां दोघांना साक्षी ठेवून. त्याला कांहीं इलाज नाहीं. वाटेल त्या माणसाच्या हातून अशी गोष्ट घडूं शकते. नेहमींचंच आहे तें. त्यांत विशेष कांहींच नाहीं.'

तेवढ्यांत एक धट्टाकट्टा तरुण कझाक तेथें येऊन थडकला. हाच बहुतेक तो सार्जेट असावा, असें मला वाटलें. माझा अंदाज बरोबर होता.—'हें बघ मक्सिमिच,'—म्हातारीनें हुकूम सोडला,—'हा नवा ऑफिसर इथें आला आहे. त्याच्यासाठीं एखादी फक्कड जागा शोधून दे. आणि जागा चांगली स्वच्छ हवी हं.'—'ठीक आहे, वासिलिसा येगोरोवना;'—सार्जेट म्हणाला,—'इवान पोलेझायेवकडे यांना घेऊन जातों. चालेल ?'—'छेः छेः त्याच्याकडे तर मुळींच नको.'—म्हातारी म्हणाली.—'अगोदरच तिथें गर्दी आहे. शिवाय तो माझा मित्र आहे......मग काय ? कुठें घेऊन जाशील बरं यांना ?... आपलं नांव काय म्हणालांत ?...प्योत्र आंद्रेइच.—हें बघ, मक्सिमिच, प्योत्र आंद्रेइचला सेमेन कुझोवकडे घेऊन जा. कुझोवनं माझ्या बागेंत परवां आपलं घोडं घातलं होतं. पाजी माणूस आहे...बाकी काय ?...मक्सिमिच, सारं कांहीं ठीक आहे ना ?'

‘ हं. देवाच्या दयेनं तसं सारं कांहीं ठीक आहे.’—तो कझाक सार्जेंट म्हणाला. मग आठवल्यासारखें करून त्यानें सांगितलें,—‘ प्रखोरोवनं आज सकाळीं स्नानगृहांत भांडण केलं. युस्तिन्या नेगुलिनाशीं.’

‘ कां रे, काय झालं ? अरे, नीट सारं सांगशील कीं नाहीं ?’ —म्हातारीनें दरडावून विचारलें.

‘ त्याला कारण थोडंच लागतं ? आंघोळीला पाणी थंड मिळालं, अशी त्याची तक्रार होती.’—सार्जेंटनें सांगितलें.

त्यानंतर एकाक्ष म्हाताऱ्याकडे वळून म्हातारी म्हणाली,—‘ इवान इग्नातिच, हें बघ, या प्रकरणाचा तपास तुला करायला हवा. प्रखोरोवची तूं गांठ घे. युस्तिन्याशीं पण बोल. आणि चूक कोणाची होती, तें आधीं शोधून काढ. शिक्षा मात्र दोघांनाहि कर. विसरूं नकोस. मक्सिमिच, तूं जा आतां. प्योत्र आंद्रेइच, मक्सिमिच तुम्हांला तुमची राहण्याची जागा दाखवील.’

मी म्हातारीचा निरोप घेतला. आणि सार्जेंटच्या मागोमाग चालावयास लागलों. नदीकांठीं उंचवट्यावर एक झोपडी होती, तिथें तो मला घेऊन गेला. ती झोपडी किल्ल्याच्या एका टोकाशीं होती. अर्धें घर सेमेन कुझोवच्या ताब्यांत होतें. आणि उरलेल्या रिकाम्या घरांत माझी सोय करण्यांत आली. घर म्हणजे काय, फक्त एकच खोली होती. पार्टिशन घालून तिचे दोन भाग केले होते. एका भागांत कुझोव सहकुटुंब राहात होता. खोली मात्र स्वच्छ दिसत होती. जागेचा ताबा मिळाल्यावर सावेलिचनें घर लावावयास सुरवात केली. आणि मी बाहेरची गंमत बघत एका खिडकीजवळ उभा राहिलों. एका म्हणजे खिडकीसुद्धां एकच होती. आणि ती सुद्धां अगदीं लहान, निरुंद अशी होती. खिडकीबाहेर काय दिसणार ? गवताळलेलीं मैदानें दूर क्षितिजाच्या कडे-पर्यंत पसरलेलीं दिसत होतीं. आणि तो एकच एक देखावा भयंकर कंटाळवाणा होता. खिडकीसमोर जवळच चार दोन झोपड्या दिसत होत्या. आणि मधल्या निरुंद रस्त्यांतून कोंबड्या इकडून तिकडे भटकत होत्या. एक म्हातारी बाई कांहीं वेडेवाकडे आवाज काढून कोणाला तरी बोलावीत होती. कोणाला, तें क्षणभरानें तिच्या भोंवतीं दहा वीस डुकरें धांवत पळत आलीं, तेव्हां माझ्या लक्षांत आलें. आणि अशा या जागेंत यापुढें मला दिवस काढावयाचे होते. दिवस म्हणजे तरी किती ? आयुष्याचा वसंत काळ म्हणून ज्याला म्हणतात, ते तरुण-पणाचे दिवस ! हा विचार मोठा तापदायक होता. माझा ऊर दुःखानें भरून आला. त्या खिडकीपासून मी दूर झालों. अन्नपाण्याची वासना सुद्धां आतां माझ्या मनांतून पार नाहींशी झाली होती. मी जेवणार नाहीं,—म्हणून सावेलिचला सांगितलें. तेव्हां त्याचा राग अगदीं अनावर झाला. आणि अर्धवट दुःखानें, अर्धवट संतापानें

किती वेळ तरी तो पुटपुटत होता.—'अरे देवा, छोटे धनी खाणार नाहीं म्हणतात. आतां ते जर आजारी पडले, तर त्यांच्या आईबापांना मी काय सांगूं ?' —पण मी जेवलों मात्र मुळींच नाहीं. तसाच झोपीं गेलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चहापाण्याचा कार्यक्रम उरकून कपडे करीत होतों. तेवढ्यांत बाहेरचें दार लोटून एक ऑफिसर आंत आला. तो तरुण होता. त्याची चण लहानसरच दिसत होती. म्हणजे तो अगदीं खुजा नव्हता. पण उंचहि नव्हता. वर्णानें काळसर आणि दिसावयास कुरूप, अशा या माणसाच्या मुद्रेवर मात्र उत्साह ओसंडत होता. आंत आल्याबरोबर हंसत हंसत तो म्हणाला,—'माफ करा हं, कांहीं न सांगतां सवरतां असं एकदम मी तुमच्या घरांत घुसलों.'— तो बोलत होता, तें फ्रेंच भाषेमध्यें.—'पण मला तुमची ओळख करून घ्यायची होती. तुम्ही इथें आल्याचं कालच कळलं. तुम्हांला बघायची उत्कंठा मनांत अशी अनावर झाली होती कीं मला धीर धरवला नाहीं. अहो, इथें माणसाचा चेहरा दिसणं म्हणजे मोठ्या मुष्किलीची गोष्ट आहे. काय, खरं नाहीं वाटत हें तुम्हांला ? मग बघाल तुम्ही. थोडे दिवस वाट पहा, म्हणजे मग तुमचं तुम्हांलाच कळेल.'—काल किल्लेदाराच्या घरीं ज्या तरुण ऑफिसरची गोष्ट निघाली होती, तोच बहुकरून हा असावा; असा मी अंदाज केला. बघतां क्षणीं आमची एकमेकाशीं गट्टी झाली. हा स्वाब्रिन मोठा हुशार माणूस दिसला. कोटीबाज बोलावयाची त्याची खोड लगेच माझ्या लक्षांत आली. एकंदरींत मोठा उमदा माणूस दिसला मला तो. कमांडंटसाहेब, त्यांचें कुटुंब, त्यांचा परिवार आणि त्या ठिकाणचीं माणसें व एकंदरींत तेथील वातावरण, यांविषयीं बराच वेळ मोठ्या गंमतीगंमतीनें तो बोलत होता. त्याचें बोलणें मोठें मजेदार होतें. आणि मी पोट धरधरून हंसत होतों. तेवढ्यांत एक शिपाई आंत आला. कमांडंटसाहेबांच्या घरीं ओटीवर बसून हिरव्या युनिफॉर्मला जांभळें ठिगळ जोडीत होता, तो हाच माणूस, हें लगेच माझ्या लक्षांत आलें. कमांडंटच्या बायकोकडून त्यानें कांहीं निरोप आणला होता. तिनें मला जेवावयास बोलावलें होतें. तोंपर्यंत जेवणाची वेळ झालीच होती. स्वाब्रिन म्हणाला कीं कमांडंटच्या घरीं मी तुला नेऊन सोडतों. मला तरी दुसरें काय हवें होतें ?

बोलत बोलत आम्हीं दोघेजण कमांडंटच्या घराजवळ येऊन पोंचलों. घराबाहेर पांचपंचवीस माणसें एका ओळींत रांगेनें उभीं होतीं. रांगेंत उभे असलेले सर्वजण म्हातारे कोतारे होते. त्या सर्वांनीं पाठीवर रुळणाऱ्या लांबसडक केसांच्या वेण्या घातल्या होत्या. त्यांच्या डोक्यांवर तिकोनी टोप्या होत्या. त्यांच्या समोर कमांडंट उभा होता. तो मात्र चांगला उंचनिंच, ताठ माणून दिसला. त्याच्या साऱ्या हालचाली मोठ्या चपळाईनें होत होत्या. त्याच्या डोक्यावर माकडटोपी होती. आणि अंगांत नाइट सूट होता. हा म्हातारा कमांडंट त्या थेरड्यांची कवायत घेत होता. आम्ही पुढें झालों, तसा तो माझ्या जवळ आला. मोठ्या आपुलकीनें त्यानें

माझी विचारपूस केली. आणि मग लगेच करड्या भाषेंत हुकुम सोडावयास त्यानें सुरुवात केली. ती कवायत बघण्याची आमची इच्छा होती. पण त्यानें आम्हांला घरांत जावयास सांगितलें—' आम्ही आलोंच, तुम्ही पुढें व्हा....आतां इथे बघण्यासारखं कांहीं नाहीं. '— तो म्हणाला.

घरांत वासिलिसा येगोरोवना आमची वाटच बघत होती. मोठ्या जिव्हाळ्यानें तिनें आमचें स्वागत केलें. मी म्हणजे जसा कांहीं जुन्या ओळखीचा आहे, अशा थाटांत ती बोलत होती. तो एकाक्ष म्हातारा मोलकरणीला तिच्या कामांत मदत करीत होता. —' इवान कुझमिचची ड्रिल आज फार लांबलेली दिसते. '— कमांडंटची बायको म्हणाली,—' पलाशा, त्यांना बोलावून आण पाहूं. म्हणावं, चला आतां. पुरे झाली ड्रिल. जेवायची वेळ झाली. आणि काय ग, माशा कुठे आहे ? '—माशाचें नांव काढल्याबरोबर एक तरुण मुलगी आंतून बाहेर आली. तिची मुद्रा चंद्रासारखी होती. वर्ण गुलाबाचा होता. तिचे लांब-सडक केस मानेवर रुळत होते. तिचें वय अठराहून अधिक नसावें. खरें सांगावयाचें तर दिसतांक्षणी कांहीं ती माझ्या मनांत भरली नाहीं. मी तिच्याकडे पूर्वदूषित दृष्टीनें पहात होतों. श्वाब्रिननें या मुलीविषयीं अगोदर मला पुष्कळच सांगितलें होतें. त्याचा मथितार्थ एवढाच कीं ही माशा म्हणजे एक अर्धवट, वेडसर पोरगी आहे. आंतमध्यें आल्यावर तिनें एक कोपरा गांठला. आणि मुकाट्यानें शिवणकाम सुरू केलें. मधल्या वेळांत कोबीच्या सूपचें पसरट भांडें मोलकरणीनें टेबलावर आणून ठेवलें होतें. वासिलिसा येगोरोवनानें पुन्हा एकदां पलाशाला हांक मारली,—' काय ग, अजून कसे आले नाहींत हे ? जा, त्यांना जाऊन सांग कीं पाहुणे वाट बघताहेत. सूप निवून चाललं आहे. ड्रिलचं काय मोठंसं ? जेवल्यावर मग पुष्कळ वेळ आहे त्यासाठीं. ड्रिल म्हणजे काय ? तर यांनीं आवाज चढवून ओरडायचं. आणि त्या थेरड्यानीं उगीचच धांवपळ करायची. '—क्षणभरानें कॅप्टनसाहेब आंत आले. त्यांच्याबरोबर तो एकाक्ष म्हातारा होता. लगेच कॅप्टनची बायको कडाडली,— ' याचा अर्थ काय ? केव्हांपासून जेवण तयार आहे. आणि तरी तुम्हीं बाहेरच ? ' —' हें बघ, वासिलिसा येगोरोवना ',—इवान कुझमिच म्हणाला,—' मी कामांत होतों. बाहेर परेड चालली होती.'

' वाः वाः काय पण परेड ? माहित आहे तुमची परेड ! '—त्याची बायको म्हणाली,—' या अशा थेरड्यांना का कधीं परेड करतां येणार आहे ? एक तर ते कधीं कांहीं शिकायचे नाहींत. आणि तुम्हांला तरी परेडमधें काय कळतं हो मोठंसं ? त्यापेक्षां माणसानं घरांत बसावं. आणि देवाला आळवावं...चला मंडळी, जेवायला चला. अन्न निवून चाललं आहे.'

आम्ही सर्वजण जेवावयास बसलों. वासिलिसा येगोरोवना एकसारखी बोलतच होती. एकामागून एक अनेक प्रश्नांचा तिनें माझ्यावर नुसता भडिमार केला.

—माझे आईबाप कोण आहेत ? ते अजून जिवंत आहेत काय ? ते कोठें राहतात ? त्यांचा उद्योग काय ? पैसेवाले आहेत काय ? असा किती पैसा आहे त्यांच्याजवळ ? —वगैरे वगैरे. नम्रपणानें सान्या प्रश्नांचीं मी उत्तरें दिलीं. शेवटीं मी सांगितलें कीं माझ्या बापाच्या इस्टेटीवर तीनशें भूदास आहेत. त्यासरशीं कॅप्टनची बायको म्हणाली,—

'बघा आतां. कांहीं माणसांजवळ काय पैसा असतो ? तिकडे तीनशें भूदास एका इस्टेटीवर राबताहेत. आणि इकडे आमच्या घरीं फक्त एक मोलकरीण. ही पलाशा तेवढी. पण तरी सुद्धां देवाच्या दयेनं आमचं सारं कांहीं ठीक चाललं आहे. मला काळजी वाटते ती फक्त आमच्या माशाची. लग्नाचं वय झालं आहे तिचं. पण हुंडा कुठून आणायचा ? आम्हीं काय देणार ? एक फणी. एक केरसुणी. आणि फार तर एखादं चांदीचं नाणं. एखाद्या भल्या माणसानं तिला मागणी घातली, तर देव त्याचं भलं करील. नाहीं तर माझ्या या मुलीचं जन्मांत कधीं लग्न म्हणून व्हायचं नाहीं. जन्मभर कुंवार राहील बिचारी.'—म्हातारीची बडबड अखंड चालूच होती. मी मरीया इवानोवनाकडे वळून पाहिलें. तिचा चेहरा लाजून लाल झाला होता. आणि तिच्या डोळ्यांतून ओघळणारीं आंसवें तिच्या पुढ्यांतील बशींत पडत होतीं. तिची ती अवस्था पाहून मला फार वाईट वाटलें. आणि तिला मनस्ताप देणारा तो विषय बदलण्याची मी घाई केली. मध्येंच एकदम मी विचारलें,— 'काय हो, हे बाष्किर लोक तुमच्या या किल्ल्यावर हल्ला करणार आहेत, अशी गुणगुण मी ऐकली. तुम्हांला कांहीं पत्ता आहे कां याचा ?'—'काय म्हणतां आपण ?'—इवान कुझमिचनें विचारलें,—'ही बातमी कुठून पैदा केलीत आपण ?'—'ओरेनबुर्गमध्यें मी असं कांहीं तरी ऐकलं खरं.'—मी सांगितलें.— 'लोक तरी काय मूर्ख आहेत ? काय वाटेल ती बातमी उठवून देतात झालं.'— कमांडंट म्हणाला,—'या आमच्या भागांत सारं कसं शांत आहे. कुठें दंगल म्हणून नाहीं. किरगिझांना आम्ही चांगला चोप दिला आहे. आणि बाष्किरांचं म्हणाल, तर हल्ला करायची त्यांची ताकद नाहीं. काय बिशाद आहे, हल्ला करतील ? ठोकून काढीन एकेकांना. कोणीं कांहीं गडबड केलीच, तर अशी दहशत बसवीन कीं मग दहा वर्षं कोणी तोंड वर काढणार नाहीं.'

'काय हो, या तुमच्या किल्ल्याला ना तटबंदी, ना खंदक.'—वासिलिसा येगोरोवनाकडे वळून मी विचारलें,—'अशा या किल्ल्यांत तुम्ही लोक रहातां. तुम्हांला भीति नाहीं वाटत ?'—'त्यांत कसली आली आहे भीति ? आम्हांला संवय झाली आहे आतां.'—ती म्हणाली,—'वीस वर्षांपूर्वीं जेव्हां रेजिमेंटमधून आमची बदली इथें झाली, त्या वेळीं मला या काफर लोकांची अशी म्हणून भीति वाटायची, विचारूं नका. त्यांच्या त्या लिंक्सफरच्या टोप्या बघितल्या किंवा त्यांच्या आरोळ्या ऐकल्या कीं माझ्या पोटांत भयानं गोळा उठायचा. पण आतां गेलीं

तीस वर्षं आम्ही इथें राहतों आहोंत ना ? आतां कांहीं भीति वाटत नाहीं कोणाची. त्या लोकांची मला आतां इतकी संवय झाली आहे कीं ते काफर लोक आसपास टेहळणी करताहेत, म्हणून कोणी उद्यां येऊन सांगितलं, तर मी जागची हलणार सुद्धां नाहीं. '

' वासिलिसा येगोरोवना तशा फार शूर आहे.'—श्वाब्रिन म्हणाला,—' इवान कुझमिच त्याला साक्ष आहेत. '

' ओ ! हो ! आपण म्हणतां, तें खरंच आहे. '—इवान कुझमिच म्हणाला,—' इतर बायकांसारखी ती कांहीं भित्री नाहीं. तिला कशाची म्हणून भीति वाटत नाहीं. '

' आणि मरीया इवानोवना ? '—मी विचारलें,—' ती तुमच्या सारखीच धीट आहे काय ? '

' कोण ? आमची माशा कां ? चांगलं विचारलंत.'—तिची आई म्हणाली,—' अहो, साऱ्या मुलुखाची भित्री आहे ती. साध्या बंदुकीचा आवाज सुद्धां तिला सहन होत नाहीं. त्या आवाजानं नुसता थरकांप होतो तिचा. एकदां काय झालं, माझा वाढदिवस होता. म्हणून इवान कुझमिचनं तोफांची सलामी दिली. झालीं दोन वर्षं आतां त्या गोष्टीला. पण त्या वेळीं तिनं असा कांहीं आकांत केला कीं विचारूं नका. तेव्हांपासून पुन्हां कधीं तोफेला बत्ती लावली नाहीं अजून. '

बोलतां बोलतां आमचें जेवण झालें. मग वामकुक्षीसाठीं म्हणून इवान कुझमिच आपल्या खोलींत गेला. त्याच्या पाठोपाठ त्याची बायको पण गेली. मग मी तिथून उठलों. आणि श्वाब्रिनच्या खोलीवर गेलों. त्यानंतरचा सारा वेळ आम्हीं तिथेंच काढला.

---

# प्रकरण चौथें

## द्वंद्वयुद्ध



उठा महाशय, सावध आतां, छातीला मी भिडणार
अधीर आहे रक्तप्राशना विश्वासू ही तलवार.

—क्न्याझ्निन

असेच कांहीं आठवडे लोटले. आणि हळूं हळूं बेलोगोर्क्समधील ज़ीवन पहिल्यांदा वाटलें होतें, तसें अगदींच असह्य नाहीं, असें मला आढळून आलें. एवढेंच केवळ नाहीं, तर मला त्याचीच गोडी लागत होती. कमांडंटच्या घरीं मला मुक्तद्वार होतें. आणि जसा त्या घरचाच मी एक आहे, अशी वागणूक मला तेथें मिळत होती. कमांडंट आणि त्याची बायको दोघेहि फार चांगलीं माणसें होतीं. इवान कुझमिच हा एका साध्या शिपायाचा मुलगा आतां ऑफिसर झाला होता. त्याला शिक्षणाचा गंध नव्हता. भाबडा पण सचोटीनें वागणारा माणूस होता तो. सर्वांशीं त्याची वागणूक प्रेमाची होती. तो बाईलबद्धीचा होता आणि त्याची बायको त्याला हुकूम सोडीत असे, ही गोष्ट अगदीं खरी. पण त्याचा स्वभावच तसा होता, त्याला कोण काय करणार ? पण त्यामुळें त्याच्या घरीं दारीं सगळीकडे आनंद होता. नवऱ्याची सरकारी नोकरी म्हणजे आपल्या गृहखात्याचीच एक लहानशी शाखा आहे, अशीच जणुं तिची समजूत होती. आपल्या घरावर जसा तिचा ताबा होता, तसाच किल्ल्यावर पण होता. मरीया इवानोवना आतां मला बघून लाजून पळून जात नसे. आतां आमची मैत्री जमली होती. ती मुलगी विचारी आहे, शहाणी आहे, तिची समजूत चांगली आहे, हें हळूं हळूं आमचा सहवास वाढल्यावर माझ्या ध्यानांत आलें होतें. स्वतःला नकळत त्या घरंदाज कुटुंबानें मला आपलासा केलें होतें. कमांडंटच्या कुटुंबियांची माझ्यावर माया जडली होती. फार काय, तो एकाक्ष म्हातारा इवान इग्नातिच, तो सुद्धां संवयीनें मला आवडावयास लागला होता. श्वाब्रिनच्या मनांत त्याच्याबद्दल अढी होती. आणि या एकाक्ष लेफ्टनंटचें कॅप्टनच्या बायकोशीं सूत जमलें आहे, असें मला तो वारंवार सांगत असे. हा गलिच्छ प्रेमसंबंध सिद्ध करणारा पुरावा मुळींच कोठें मिळण्यासारखा नव्हता. पण श्वाब्रिनला त्याची चिंता नव्हती. काय बोलावयाचें, तें तो दडपून बोलत असे.

योग्य वेळीं मला ऑफिसरचा हुद्दा मिळाला. माझी बढती झाली खरी, पण माझ्या कामांत मात्र तशी मुळींच कांहीं वाढ झाली नाहीं. जगापासून तुटलेल्या त्या एकाकी शिबंदींत ड्रिल, परेड, पहारे वगैरे कांहीं भानगडी नव्हत्या. आतां एक गोष्ट खरी. मधूनच केव्हां तरी कमांडंटच्या मनांत शिपायांना कवायत शिकविण्याचें येई. पण तो त्यांना काय शिकविणार ? त्यांच्यापैकीं एकाला सुद्धां राइट आणि लेफ्ट यांतील फरक म्हणून कधीं कळला नाहीं. कॅप्टनच्या हुकुमाची तामिली करतांना त्यांच्यापैकीं प्रत्येकाला आपण चुकत असल्याचा संशय येई. आणि तसें झालें कीं सर्वजण आधीं हातानें क्रूसाची खूण करीत. श्वाब्रिनच्या संग्रहीं थोडीं फ्रेंच पुस्तकें होतीं, तीं मी वाचावयास लागलों. आणि कधीं नव्हेत, त्या कविता जुळविण्याच्या कल्पना माझ्या मनांत यावयास लागल्या. सकाळीं मी वाचीत बसे. कधीं कधीं हाताला संवय व्हावी, म्हणून मी भाषांतराचा उद्योग करीं. कविता करण्याचें खूळ अलीकडेच माझ्या डोक्यांत शिरलें होतें. माझें दुपारचें जेवण बहुत करून कमांडंटच्या घरींच होई. आणि मग दिवसाचा सारा वेळ मी तेथेंच काढी. फादर गेरासिम आणि त्याची बायको अकुलिना पांफिलोवना कधीं कधीं संध्याकाळच्या वेळीं कमांडंटच्या घरीं येत असत. ही बाई म्हणजे साऱ्या मुलुखाची गप्पिष्ट होती. श्वाब्रिनची भेट झाली नाहीं, असा एक दिवस कांहीं मला आठवत नाहीं. पण पुढें पुढें त्याचा सहवास जसा वाढला, तसा त्याच्या बोलण्याचा मला कंटाळा यावयास लागला. कमांडंटच्या कुटुंबाविषयीं तो नेहमींच कुत्सितपणानें बोले. आणि मरीया इवानोवनासंबंधीं उपरोधिकपणानें तो जें कांहीं बोले, तें ऐकून माझे कान किटले होते. त्या गांवठाणांत दुसरी कांहीं करमणूक म्हणून नव्हतीच. पण आतां दुसऱ्या कोणत्या करमणुकीची मला जरूर पण नव्हती.

बाष्किरांचा उठाव होईल आणि किल्ला धोक्यांत येईल, अशा अफवा पसरल्या होत्या खऱ्या. पण त्यांत कांहीं तथ्य नसावें. खरोखरच आमच्या या भागांत सगळीकडे शांतता होती. पण लढाईला तोंड लागलें, तें घरच्या घरीं. आणि तें सुद्धां अगदीं अनपेक्षित.

कविता करण्याचा मला नाद लागला होता, म्हणून मी नुकतेंच सांगितलें आहे. त्या काळाचा विचार केला, तर माझें लेखन तसें बरेंच चांगलें होतें. आणि कांहीं वर्षांनंतर अलेक्झांडर पेत्रोविच सुमारोकोवसारख्या नामांकित लेखकानें माझ्या त्या वेळच्या लिखाणाची मोठ्या उत्साहानें स्तुति केली होती. लेखक नव्यानेंच लिहावयास लागला कीं प्रथम एखाद्या रसिक माणसाचा तो शोध घेतो. आणि आपल्या लिखाणावर त्याचा अभिप्राय मागण्याच्या मिषानें त्याला आपलें लिखाण तो वाचून दाखवितो. एकदां काय झालें, मी एक कविता केली. कवितेचें मर्म जाणणारा असा एकच एक श्रोता तेथें उपलब्ध होता. तो म्हणजे श्वाब्रिन. त्याच्याकडे माझी नवी कविता दाखविण्यासाठीं म्हणून मी गेलों. थोडीशी प्रस्तावना

केल्यावर खिशांतून मी माझी वही काढली. आणि ही कविता त्याला वाचून दाखविली :

माझे प्रीतिविचार गे जिवलगे टाळावया पाहतों,
माशा, दूर तुझ्याविना प्रियतमे राहावया वांछितों.
जेव्हां जाशिल तूं निघून सरले, ती मुक्तता मानिन;
माझे मुक्त विचार स्वैर फिरतां मी धन्यता भोगिन.
डोळे ते तव लाडके सुखवितां जाळीत रात्रंदिन,
केव्हांही नच शांतता मिळतसे माझ्या मनालागुन.
केव्हांही बघतां समीप दिसती डोळे तुझे बोलके,
त्यांचा क्रूर प्रकाश दाहक जिवा गे जाळतो लाडके.
माशा, साक्ष तुझीच दुःख कसलें मी सर्वदा साहतों,
देवी, प्रार्थितसे, अनुग्रह करी, मी मुक्तता मागतों.
प्रीतीबंधन हें जिवास जडलें, वेडावलें जीवन,
माशा, जाणुन बंधमुक्त कर, दे दासास संजीवन.

'काय महाराज, कशी काय वाटली कविता?'—मी श्वाब्रिनला विचारलें. अर्थातच स्तुतीचा माझा कर अशा रीतीनें मी वसूल करणार होतों. माझी खात्री होती कीं माझ्या कवितेला तो चांगलीच म्हणणार. नेहमीं बहुतेक तो माझे लाड पुरवीत असे. पण या खेपेस मात्र त्यानें मला आश्चर्याचा धक्काच दिला. त्यानें मला चक्क सांगितलें कीं तुझी ही कविता अगदी भिकार आहे. त्याचा शेरा ऐकून मी सर्दच झालों.

'पण कां?'—माझा संताप उघड न दाखवितां मी विचारलें.

त्यावर तो म्हणाला,—'असल्या कविता माझे एक गुरुजी आहेत, ते पुष्कळ लिहितात. वासिली किरिलिच त्रेद्याकोवस्कीच्या कविता कधीं वाचल्या आहेस तूं? त्यांचीं प्रेमाचीं रडगाणीं बहुतकरून अशींच असतात.'

माझ्या हातांतील कवितांची वही त्यानें हिसकावून घेतली. आणि माझ्या कवितेंतील शब्दांशब्दांवर त्यानें टीकेची झोड उठविली. उपहासानें तो बोलत होता, तें मला सहन झालें नाहीं. त्याच्या हातांतून मी माझी वही हिसकावून घेतली. आणि—'पुन्हां म्हणून कधीं मी तुला माझी कविता दाखवणार नाहीं'—असें मी त्याला चिडून सांगितलें. माझ्या त्या धमकीचें त्याला हंसूं आलें. आणि खांदे उडवून तो म्हणाला,—'बघूं या. किती दिवस तूं शब्द पाळतोस, तें तरी बघूं या. त्याचं असं आहे, कवीला नेहमीं श्रोता लागतो. इवान कुझमिचला जेवायच्या पूर्वी वोदकाचे दोन ग्लास तरी हटकून लागतात. तसाच कवीला सुद्धां श्रोता लागतो.

आणि काय रे, जिच्याबद्दल तूं असं तळतळून लिहिलं आहेस, ती माशा कोण? ती मरीया इवानोवनाच ना?'

'कोणी कां असे ना, तिच्याशीं तुला काय करायचं आहे?'—मी चिडून ओरडलों,—'तुझं मत पण मला नको. आणि तुझे घाणेरडे तर्क पण नकोत.'

'अरेच्या, म्हणजे हा हळवा कवि छुपा आशक पण आहे तर!'—श्वाब्रिन म्हणाला. आतां मात्र माझ्या रागाचा पारा खूपच वर चढला होता. मला खिजविण्यासाठींच जणुं तो बोलत होता.—'ऐक जरा. माझा दोस्ताचा सल्ला घे. तुझं काम साधायला हवं असेल, तर मी सांगतों, असल्या रडगाण्यांनीं कांहीं साधणार नाहीं.'

'म्हणजे? तूं काय बोलतो आहेस, मला कांहींच समजत नाहीं. काय, म्हणायचं तरी काय आहे तुला? जरा स्पष्ट बोल कीं.'

'जरूर. संध्याकाळच्या वेळीं माशानं तुला भेटायला यावं, असं तुला वाटतं ना? मग असल्या नाजुक नाजुक कवितांचा कांहीं उपयोग व्हायचा नाहीं. तिला ईअरिंग्ज दे. आणि मग बघ मजा.'

त्याचे ते जळते शब्द ऐकून माझें रक्त तापलें.—'आणि काय रे, ती अशी बदचालीची मुलगी आहे, असं कां वाटतं तुला?'

'कारण हवं आहे तुला?'—छद्मीपणानें हंसून तो म्हणाला,—'कारण अनुभव. दुसरं काय? तिला काय हवं नको, तें चांगलं माहित आहे मला.'

'तूं खोटं बोलतोस...बदमाष...'—संतापानें बेभान होऊन मी ओरडलों,—'अशा बेशरम थापा मारायला तुला लाज कशी वाटत नाहीं?'

श्वाब्रिनचा चेहरा एकदम पडला.—'मी हें चालूं देणार नाहीं.'—माझा हात पकडून तो म्हणाला,—'आपले शब्द मागें घे. नाहींतर लढायला तयार हो.'

'ठीक आहे. कुठें? आणि केव्हां?'—मी विचारलें; आतां माझ्या मनाचें समाधान झालें होतें. माशाबद्दल हलकटपणानें तो जें बोलला होता, त्याबद्दल त्याला शिक्षा करण्यासाठीं माझे हात शिवशिवत होते.

तिथून मी उठलों. आणि तडक इवान इग्नातिचच्या शोधांत निघालों. त्याच्या हातांत सुई होता व मालकिणीच्या सांगण्यावरून तो कावळ्याच्या छत्र्यांची माळ करीत होता. हिंवाळ्यासाठीं ही तरतूद होती. मला पाहतांच तो म्हणाला,—'कोण, प्योत्र आंद्रेइच? अरे, आंत ये असा. कां आलास? हं बोल, काय काम आहे तुझं?'—श्वाब्रिनच्या आणि माझ्या भांडणाची सारी हकीगत मी त्याला थोडक्यांत सांगितली. शेवटीं मी त्याला म्हणालों कीं तुला तेथें यावयास लागेल,—साक्षी म्हणून. त्यानें माझें सारें बोलणें शांतपणानें ऐकून घेतलें. आणि मग आपला एकुलता एक डोळा मिचकावून तो म्हणाला,—'काय रे, तुझ्या

तलवारीला श्वाब्रिनच्या रक्ताची तहान लागलेली दिसते. तुझ्या मनांतून त्याचा कांटा काढायचा आहे. आणि मला साक्ष ठेवून हें करायचा तुझा इरादा आहे, असंच कीं नाहीं ? '

' बरोबर. असंच.'

' असंच काय ? प्योत्र आंद्रेइच, तुझ्या मनांत तरी काय आहे ? श्वाब्रिनशीं तूं भांडलास. ठीक आहे. शब्दांनीं कांहीं हाडं तुटत नसतात. त्यानं तुला शिव्या घातल्या. बदल्यांत तूं त्याला शिव्या घातल्यास. मग तूं त्याच्या थोबाडींत मारायची. त्यानं तुझ्या कानशिलांत द्यायची. तुम्ही एकामेकांपासून दूर व्हा. आणि आम्ही तुमचं भांडण मिटवूं. कारण शेजाऱ्याला ठार केल्यानं तुझा कांहींच फायदा होणार नाहीं. तूं श्वाब्रिनला ठार केलंस, तर ठीकच होईल म्हणा. मला त्याची मुळींच पर्वा नाहीं. तो मला डोळ्यांसमोर देखील नकोसा वाटतो. पण समज, तुझ्या छातींतून त्यानं आपली तलवार आरपार नेली, मग ? शेवटीं गाढव कोण ठरेल ? '

त्या समजूतदार लेफ्टनंटच्या सांगण्याचा माझ्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं. माझा निश्चय ठरला होता. आणि तसें मी त्याला स्पष्टपणें सांगितलें.— ' ठीक आहे.'—इवान इग्नातिच म्हणाला,—' तुला बरं दिसेल, तसं कर. पण तुमची मारामारी बघायला मला कशाला बोलावतोस ? तुला काय वाटतं, लोक बेभान होऊन लढलेले मी कधीं पाहिलेले नाहींत ? मी तुर्कांशीं लढलों आहे. स्वीडिश लोकांशीं लढलों आहे. पुष्कळ लढाया पाहिल्या आहेत मी. '

पण द्वंद्वयुद्ध करावयाचें, तर साक्षीदार हवाच. म्हणून मी त्याला समजावून सांगितलें. पण माझ्या बोलण्याचा त्याच्यावर कांहींच परिणाम झालेला दिसला नाहीं. शेवटीं तो म्हणाला,—' तुम्हांला काय करायचं असेल, तें खुशाल करा. मी काय करणार आहे, तें पण सांगतों. इथून उठून मी सरळ इवान कुझमिचकडे जाणार आहे. आणि रिपोर्ट करणार आहे. माझं कर्तव्यच आहे तं. मी सांगणार आहे कीं आपले शिपायी एकमेकांचा गळा कापणार आहेत. देशाचा यांत कांहीं फायदा नाहीं. तेव्हां कमांडंटनं या गोष्टीचा नीट विचार करावा. आणि आपसांत लढूं पाहणाऱ्या ऑफिसर लोकांना चांगला धडा शिकवावा.'

तो जें कांहीं सांगत होता, तें तर फारच भयंकर होतें. कमांडंटकडे त्यानें जाऊं नये, अशी माझी इच्छा होती. मोठ्या कष्टानें मी त्याचें मन वळविलें. अखेरीस तो कबूल झाला. आणि मग त्याला तेथेंच सोडून मी घरीं परत आलों.

नेहमींप्रमाणें ती संध्याकाळ सुद्धां मी कमांडंटच्या घरीं घालविली. कोणाला कांहीं कसला संशय येऊं नये, कोणीं कांहीं प्रश्न विचारूं नयेत, म्हणून मी आनंदी व शांत राहण्याचा प्रयत्न केला. मी होतों त्या स्थितींत असलेले लोक अशा वेळीं

बेछूटपणानें वागल्याची बढाई मारतात. तसा बेछूटपणा माझ्या अंगीं नव्हता, हें मी मोकळेपणानें कबूल करतों. त्या दिवशीं संध्याकाळीं माझें मन जास्तच हळवें झालें होतें. त्यावेळीं माशा जशी सुंदर दिसली, तशी पूर्वी कधीं दिसली नव्हती. याचें कारण एकच. कदाचित तिचें सुंदर रूप डोळ्यांत सांठविण्याची ही अखेरचीच वेळ असेल. आणि पुन्हां म्हणून कधीं ती दृष्टीस पडणार नाहीं. हें सारें मला चांगलें माहित होतें. आणि म्हणून एकदां अखेरचें डोळे भरून मी तिचें दर्शन घेत होतों. श्वाब्रिनसुद्धां त्या वेळीं तेथेंच होता. मी त्याला बाजूला नेलें. आणि इवान इग्नातिचशीं माझें जें कांहीं संभाषण झालें होतें, तें सारें त्याला सांगितलें.—' अरे, आपल्याला साक्षीदार हवेतच कशाला ? '—तो थंडपणें म्हणाला,—' आपल्याला साक्षीदारांची जरूरच नाहीं. '—मग तेथल्या तेथेंच पुढील साऱ्या गोष्टी आम्हीं ठरविल्या. गांवाबाहेर गवताच्या गंज्या होत्या, तेथें जाऊन लढावयाचें, असें ठरलें. वेळ सकाळची ठरली; सात वाजतांची. आम्ही असें मजेंत बोलत होतों कीं इवान इग्नातिच सुद्धां फसला. आणि मोठ्या खुशींत येऊन म्हणाला,—' प्राणांतिक युद्धापेक्षां अपमानकारक तह परवडला. कातडी शाबूत राहणार असेल, तर अब्रू गेली खड्ड्यांत. '—

तो जें कांहीं बोलला, त्यामुळें कमांडंटच्या बायकोच्या मनांत संशय आला. खरें म्हणजे खोलीच्या एका कोपऱ्यांत बसून पत्त्यावरून भविष्य सांगण्यांत ती गढून गेली होती.—'काय रे, काय बडबडतो आहेस तूं हें ? '—ती म्हणाली,—' नीट सांग बघूं सगळं. मला कांहींच समजत नाहीं. कशाविषयीं बोलतो आहेस तूं ? '

तिच्या मनांत संशय आलेला पाहून मी चांगलाच चपापलों. इवान इग्नातिचला सुद्धां काय बोलावें, तें क्षणभर समजेना. क्षणभर तो गोंधळलेला दिसला. पण मला दिलेल्या वचनाची आठवण त्याच्या मनांत होती. म्हणून तो कांहींच बोलला नाहीं. या आणीबाणीच्या वेळीं श्वाब्रिन त्याच्या मदतीला देवासारखा धांवला.

तो म्हणाला,—' आमची मैत्री पुन्हां जुळलेली पाहून इवान इग्नातिचला फार आनंद झाला आहे.'

' म्हणजे काय ? तूं कोणाशीं भांडला होतास वाटतं ? '

' हो. प्योत्र आंद्रेइचशीं माझं भांडण झालं होतं. '

' कशावरून ? '

' तसं विशेष कांहीं नाहीं. वासिलिसा येगोरोवना, आम्हीं भांडलों तें एका गाण्यावरून.'

' गाण्यावरून ? गाण्यावरून कोणीं भांडतं वाटतं ? काय झालं ? सगळं एकदां नीट सांग पाहूं.'

' त्याचं असं झालं. प्योत्र आंद्रेइचनं एक गाणं लिहिलं आणि मला म्हणून दाखवलं. त्या गाण्यावरून मला माझ्या एका आवडत्या गाण्याची आठवण झाली,—

कॅप्टनच्या मुली, रहा घरांत
हिंडूं नकोस चांदण्यांत.

त्यावरून आमच्यांत झगडा झाला. प्योत्र आंद्रेइच माझ्यावर एकदम भडकला. खरं म्हणजे, आपलं आवडतं गाणं म्हणायचा कोणालाहि हक्कच आहे. फार उशीरानं तें ध्यानांत आलं त्याच्या. आणि तिथंच संपलं आमचं भांडण. '

त्याचें तें उद्धटपणाचें बोलणें ऐकून माझा राग अनावर झाला. पण हकीगत सांगतांना त्यानें जी लटपट केली आणि वेडेंवाकडें कांहीं तरी बनवून जें सांगितलें, तें फक्त माझ्याच ध्यानांत आलें. निदान दुसऱ्या कोणी तिकडे लक्षच दिलें नाहीं. गाण्यावरून गोष्ट निघाली. आणि मग संभाषणाला कांहीं वेगळेंच वळण लागलें. गाणें लिहिणाऱ्या कवींविषयीं वाद सुरू झाला. कमांडंट म्हणाला कीं सारे कवी दारुडे आणि वाह्यात असतात. शिपायाच्या पेशाला हा नाद फार वाईट. तो तूं आतां सोडून दे. त्यानं कांहींच फायदा होणार नाहीं. '

श्वाब्रिन मला आतां दृष्टीसमोर नकोसा झाला होता. मी तेथून उठलों. कमांडंटचा आणि त्याच्या कुटुंबांतील मंडळींचा तडकाफडकीं निरोप घेतला. आणि खोलीवर आलों. म्यानांतून तलवार काढून एकदां साफसूफ केली. तलवारीची धार चांगली तेज होती, टोक निमुळतें होतें, अशी खात्री करून घेतली. मग सावेलिचला हांक मारून—' उद्यां सकाळीं सहा वाजतां मला उठव, '—म्हणून बजावून सांगितलें. आणि मग स्वस्थ चित्तानें झोपीं गेलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं ठरलेल्या वेळीं ठरविलेल्या ठिकाणीं मी हजर झालों. आणि माझ्या शत्रूची वाट बघत ताटकळत उभा राहिलों. फार वेळ त्याची वाट बघावी लागली नाहीं. आल्याबरोबर श्वाब्रिन म्हणाला,—' चल आटप. हें काम लवकर उरकायला हवं. नाहीं तर कोणी लोक येतील. आणि मग साराच घोंटाळा होईल.'—आम्ही अंगावरचे कपडे उतरवून हातांत तलवारी घेतल्या. आणि आतां एकमेकांशीं भिडणार, तोंच बाजूच्या गंजीमागून इवान इग्नातिच धांवत तेथें आला. त्याच्या मागोमाग आणखी चार पांच शिपाई होते.—' कमांडंटकडे चला,'—म्हणून त्यानें आम्हांला फर्मावलें. आम्ही नाखुशीनें तें मान्य केलें. इवान इग्नातिच लगेच पुढें झाला. त्याच्या पाठोपाठ शिपायांच्या घोळक्यांत आम्ही चाललो होतों. जसा आपण मोठा विजय मिळविला आहे, अशा थाटांत इवान इग्नातिच छाती काढून पुढें चालला होता.

अखेरीस आम्ही कमांडंटच्या घरीं पोहोंचलों. इवान इग्नातिचनें दार उघडलें. आणि लष्करी थाटांत सलाम करून तो म्हणाला,—'मी त्यांना घेऊन आलों आहे.'—आंतमध्यें कमांडंटची बायको जशी आमची वाटच बघत होती.—'अरे, काय हें ? काय चालवलं आहे तुम्ही आमच्या या किल्ल्यांत ? खुनाचे कट करतां ? काय म्हणावं तुम्हांला ? इवान कुझमिच, या लोकांना अटक करायचा एकदम हुकूम द्या....प्योत्र आंद्रेइच, अलेक्सी श्वाब्रिन, तुमच्या हातांतल्या तलवारी मुकाट्यानं आमच्या स्वाधीन करा बघूं...पलाशा, या तलवारी कपाटांत नेऊन ठेव. प्योत्र आंद्रेइच, तूं असं कांहीं करशील, असं आम्हांला वाटलं नव्हतं. तुला लाज वाटायला हवी. श्वाब्रिनची गोष्ट वेगळी आहे. त्यानं खून केला, म्हणून तर गार्डातून त्याची हकालपट्टी झाली. शिवाय तो नास्तिक आहे. देवावर विश्वास नाहीं त्याचा. पण तूं ? त्याच्यासारखाच तूं पण वागतोस ?'

इवान कुझमिच आपल्या बायकोला मधून मधून साथ करीत होता. पुन्हां पुन्हां सांगत होता,—'वासिलिसा येगोरोवना म्हणते, तें बरोबर आहे. लष्करी कायद्यानं द्वंद्वयुद्धांना मनाई केली आहे. माहित नाहीं तुम्हांला ?'—मधल्या वेळांत पलाशानें आमच्या तलवारी कपाटांत नेऊन ठेवल्या होत्या. मला हंसूं आवरत नव्हतें. पण श्वाब्रिन मात्र आपल्या जागीं शांतपणें उभा होता. —'वासिलिसा येगोरोवना, तुमच्याविषयीं मला आदर आहे. पण तरी सुद्धां मला सांगावेसें वाटतें कीं तुमचा या गोष्टीशीं कांहीं सुद्धां संबंध नाहीं.'—थंडपणानें तो म्हणाला,—'आमचा इन्साफ करायच्या भानगडींत तुम्ही पडूं नये, हें बरं. इवान कुझमिच काय करायचं, तें करतील.'—त्यावर कमांडंटची बायको उसळून म्हणाली, —'तूं गप्प बैस. नवरा-बायको काय दोन असतात वाटतं ? इवान कुझमिच, तुम्ही यांना शिक्षा कां करीत नाहीं ? यांना कैद करा. आणि द्या अंधार कोठडींत ठेवून. मात्र वेगळ्या कोठडींत घाला एकेकाला. आणि चांगले ताळ्यावर येईपर्यंत ब्रेडपाण्यावर ठेवा त्यांना. फादर गेरासिमला बोलावून सांगा, म्हणावं,—उपासतापास दे मागें लावून त्यांच्या. त्यांच्या पापाबद्दल देवाची क्षमा मागण्यासाठीं एखादी प्रार्थना कर म्हणावं चर्चमधें.'

इवान कुझमिचला काय करावें, कांहीं सुचेना. मरीया इवानोवना पांढरी फटक दिसत होती. तिचें सारें तेज जसें लोपलें होतें. हळूं हळूं वादळ शांत झालें. कमांडंटची बायको पण शांत झाली. तिनें आम्हांला दोघांना एकमेकांचे मुके घ्यावयास लावलें. पलाशानें कपाटांतील तलवारी परत आणून आमच्या स्वाधीन केल्या. आम्ही घर सोडलें, तेव्हां सर्वांना वाटलें कीं आमची समजूत पटली. इवान इग्नातिच आमच्याबरोबर बाहेर आला होता. बाहेर आल्यावर मी त्याला रागानें म्हटलें,—'तुला तुझ्या वर्तनाची लाज वाटायला हवी. तूं काय कबूल केलं होतंस ? आठवतं ? कोणाजवळ बोलणार नाहीं, म्हणून शब्द दिला होतास

तूं. आणि मग कमांडंटकडे जाऊन तूं खुशाल आमची कागाळी केलीस ? ' —त्यावर तो म्हणाला,—' देवा शपथ, इवान कुझमिचला मी यांतलं कांहीं सुद्धां सांगितलं नाहीं. वासिलिसा येगोरोवनानं सारी त्रित्त बातमी माझ्याकडून काढून घेतली, आणि कमांडंटला न कळत तिनं तुम्हां दोघांना पकडून आणायची व्यवस्था केली. तें कांहीं कां असेना, तुमचं भांडण अशा रीतीनं मिटलं, तें फार चांगलं झालं ! '—मग तो घरीं गेला. श्वाब्रिन आणि मी दोघेच राहिलों.—' तें कांहीं नाहीं. आपलं भांडण कांहीं असं मिटणार नाहीं. '—मी म्हणालों.—' मिटेल कसं ? तुझ्या उद्धटपणाचा जाब तुला तुझ्या रक्तानं द्यावा लागेल. तुझी आतां तशी सुटका होणार नाहीं. '--श्वाब्रिन म्हणला—' पण आतां कांहीं दिवस वाट बघायला हवी. लोकांची पाळत राहील आपल्यावर. तेव्हां आणखी कांहीं दिवस मैत्रीचं नाटक तसंच चालूं ठेवायला हवं. बरं आहे तर मग, येतों आतां ? '—आणि मध्यंतरी जसें कांहीं घडलेंच नाहीं, अशा तऱ्हेनें आम्ही एकमेकांचा निरोप घेतला.

परत कमांडंटच्या घरीं गेल्यावर नेहमींप्रमाणें मी मरीया इवानोवनाशीं गोष्टी करीत बसलों. इवान कुझमिच घरीं नव्हता. वासिलिसा येगोरोवना घरांत कांहीं काम करीत होती. आम्ही हळूं हळूं बोलत होतों. श्वाब्रिनशीं भांडण करून मी त्यांच्या सर्वांच्या मनांत काळजी निर्माण केली होती, त्याबद्दल कोमल शब्दांत ती माझी हजेरी घेत होती. ती म्हणाली, —' तुम्ही दोघंजण तलवारी घेऊन लढायला गेलांत, हें मला कळलं मात्र. आणि लगेच मी बेशुद्ध पडलें. तुम्हीं पुरुष म्हणजे मोठे अजब प्राणी आहांत. एका शब्दासाठीं तुम्ही एकमेकांना ठार मारतां, म्हणजे नवल आहे. बरं, पुन्हां तो शब्द सुद्धां असा कीं चार दिवसांनीं खुशाल विसरून जाल. पण त्यासाठीं तुम्ही एकमेकांचे जीव घ्यायला तयार होतां. दुसरा कसला विचार म्हणून तुम्हांला सुचत नाहीं. आपल्या पाठीमागें कोणाचं काय होत असेल...पण माझी खात्री आहे कीं भांडणाला तूं कांहीं सुरुवात केली नसणार. बहुत करून श्वाब्रिन तुला कांहीं तरी टाकून बोलला असेल. '

' तुला असं कां वाटतं, मरीया इवानोवना ? '

' त्याचं कारण नाहीं मला सांगतां येणार. पण तो जसा नेहमी गुर्मींत असतो. आणि लोकांना टोंचून बोलायची त्याला खोड आहे. मला तो मुळींच आवडत नाहीं. पण तरी सुद्धां त्याला मी आवडत नाहीं, असं मला कोणीं सांगितलं; तर मला बरं वाटणार नाहीं. नवल आहे नाहीं ? '

' पण काय गं, तुला काय वाटतं, मरीया इवानोवना ? त्याला तूं आवडतेस, असं कां वाटतं तुला ? '

माझा तो प्रश्न ऐकून ती लाजेनें लाल झाली. आणि अडखळत ती म्हणाली,—' हो. मला तसं वाटतं खरं.'

' कशावरून ? '

' कारण त्यानं मला एकदां लग्नाबद्दल विचारलं होतं.'

' त्यानं विचारलं होतं ?—असं ?—कधीं विचारलं होतं ? '

' गेल्याच वर्षी. तूं इथें आलास ना, त्याच्या आधीं.'

' आणि मग तूं काय त्याला नाहीं म्हणून सांगितलंस ? '

' खरं सांगूं ? अलेक्सी इवानिच फार हुशार माणूस आहे. मोठ्या कुळांत जन्म झाला आहे त्याचा. घरदार, इस्टेटवाडी सारं कांहीं यथास्थित आहे. पण तरी सुद्धां चर्चमधें जायचं, त्याच्याशीं लग्न करायचं आणि तिथें जमलेल्या सर्व लोकांच्या देखत त्याचा मुका घ्यायचा,...शीः ही कल्पना सुद्धां मला सहन होत नाहीं. त्यापेक्षां जन्मभर कुंवार राहीन मी. '

मरीया इवानोवना मन मोकळें करून जें कांहीं बोलली, त्यामुळें माझे डोळे उघडले. आणि एकदम किती तरी गोष्टींचा उलगडा झाला, असें मला वाटलें. जेव्हां कधीं तिच्याविषयीं बोलावयाचा प्रसंग येई, तेव्हां तेव्हां तिच्याबद्दल दुष्टपणानें तो कांहीं बाही बोले, त्याचें कारण आतां माझ्या लक्षांत आलें. आम्हांला एकमेकां-बद्दल काय वाटत होतें, तें त्याच्या लक्षांत आलें असावें. आणि म्हणूनच आमच्या संबंधांत बिब्बा घालण्याचा त्यानें यत्न केला असावा. ज्या शब्दांनीं आमचें भांडण पेटलें, ते शब्द आतां तर अगदींच हलकटपणाचे वाटले. कारण ते शब्द मुळांतच घाणेरडे होते, आणि त्यांत निरपराध मुलीला विनाकारण बदनाम करावें, असा त्याचा हेतु होता. या उद्धट, पाजी माणसाला चांगला धडा शिकवावयास हवा, अशी माझ्या मनांतील इच्छा बलवत्तर झाली. व मी अधीरतेनें संधीची वाट पाहूं लागलों.

त्यासाठीं मला कांहीं फार दिवस वाट पहावी लागली नाहीं. त्यानंतर दुसऱ्या दिवशीं मी माझ्या खोलींत कांहीं कविता खरडीत बसलों होतों. कांहीं केल्या एक यमक जुळवितां येत नव्हतें, म्हणून क्विल पेनचें टोंक मी उगीचच कुरतडीत बसलों होतों. तेवढ्यांत श्वाब्रिननें खिडकीच्या खालीं भिंतीवर टक्टक् करून मला खुणावलें. मी लेखणी तशीच टाकून दिली. तलवार घेतली. आणि त्याच्याबरोबर निघालों.— 'आतां वेळ लावण्यांत कांहीं अर्थ नाहीं.'—श्वाब्रिन म्हणाला,—'आतां आपल्याकडे कोणाचं लक्ष नाहीं. आपण दूर नदीवर जाऊं या. तिथें कोणी आपल्याला अडवायला येणार नाहीं. '— लगेच त्या दिशेनें आम्ही चालावयास लागलों. वळणावळणाच्या एका नागमोडी रस्त्यानें डगर उतरून आम्ही नदीकाठीं गेलों. आणि लगेच

तलवारी म्यानांतून बाहेर काढल्या. श्वाब्रिन पट्ट्याचे वार करण्यांत माझ्यापेक्षां अधिक हुशार आणि चपळ होता. पण मी ताकदीनें भारी होतों. बोप्रे मला शिकवीत असे, तेव्हां त्यानें मला दांडपट्ट्याचे कांहीं सफाईदार हात शिकविले होते. बोप्रेनें सुद्धां केव्हां तरी सैन्यांत नोकरी केली होती. त्यानें जे चार हात मला दाखविले होते, ते आतां या वेळीं माझ्या कामीं आले. श्वाब्रिनला माझ्या ताकदीची आणि कौशल्याची फारशी कल्पना नसावी. सलामीनंतर बराच वेळ आमचे नुसते हातच चालू होते. पण कोणाला जखम म्हणून होत नव्हती. शेवटी माझ्या लक्षांत आलें कीं माझा शत्रु आतां अगदीं टेकीस आला आहे. त्यासरशीं एकदम चढाई करून मी त्याच्यावर जोरदार हल्ला केला. माझ्या माऱ्यानें तो एकदम कोलमडला. आणि नदीच्या पाण्यांत जाऊन पडला. तेवढ्यांत कोणी तरी माझ्या नांवानें मोठ्यानें पुकारा केलेला मी ऐकला. मी मागें वळून पाहिलें, तर दोन्ही हात उभारून सावेलिच डगरीवरून धांवत पळत येत होता. त्याच क्षणाला माझ्या उजव्या खांद्याखालीं छातींत एकदम कळ उठली. आणि लगेच बेशुद्ध होऊन मी खालीं जमिनीवर कोसळलों.

---

# प्रकरण पांचवें

*प्रेम*



लग्न अजुनि लहान, लाडके, लग्न अजुनि लहान.

आईला तूं विचार आधीं — मोटें पण गे जरा येऊं दे
बापाला तूं विचार आधीं — शहाणपण गे जरा येऊं दे
आमांना तूं विचार आधीं — बुद्धीची गे वाढ होऊं दे
सर्वांचा कर मान ! — लग्न करूं मग छान !

—लोकगीत

माझ्याहुन चांगली मिळूं दे, विसरशील मला;
माझ्याहुन वाईट मिळूं दे, आठवशील मला.

—लोकगीत

मी शुद्धीवर आलों, तेव्हां मला कांहीं सुद्धां आठवत नव्हतें. मी बिछान्यांत पडून होतों. पण माझी खाट नेमकी कोठें आहे, त्याचा मला पत्ता लागत नव्हता. मला पुष्कळच अशक्तपणा वाटत होता. हातांत एक मेणबत्ती धरून सावेलिच माझ्या बिछान्याजवळ उभा होता. माझ्या छातीखांद्यांवर आवळून बांधलेलें बँडेज कोणी तरी हलक्या हातानें सोडवीत होतें.आणि मग हळूं हळूं काय घडलें असावें, तें माझ्या ध्यानांत आलें. आम्हीं लढत होतों, त्याची एकदम आठवण झाली. आणि बहुत करून मला जखम झाली असावी. म्हणून तर असा जायबंदी होऊन मी खाटेला खिळलों होतों. आणखी आठवून पाहण्याचा माझा यत्न चालला होता. तेवढ्यांत खोलीचें दार वाजलें.—'त्याचं कसं आहे आतां ?'—कोणी तरी विचारलें. तो आवाज ऐकतां क्षणीं माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले.—'आहे तसंच आहे.'—उसासा सोडून सावेलिच म्हणाला,—'आतां पांच दिवस झाले. पण अजून कांहीं शुद्धीवर येत नाहींत.'—कुशीवर वळण्याचा मी यत्न केला. पण कांहीं जमलें नाहीं.—'मी कुठें आहे ?...कोण आहे ?'—मी विचारलें. आणि मग माझ्या ध्यानांत आलें कीं अशा रीतीनें बोलणें म्हणजे कांहीं सामान्य गोष्ट नाहीं. ते चार शब्द बोलण्यासाठीं मला कोण प्रयास पडले. मरीया इवानोवना हळूं हळूं बिछान्याजवळ आली. आणि खाटेजवळ वांकून तिनें मला विचारलें,—'काय रे, बरं वाटतं आहे कां आतां ?'—तिनें माझ्या प्रकृतीची चौकशी केली.

पण मी म्हणालों,—'कोण ? माशा कां ? हें बघ,...' माझ्या अंगांत बोलायला देखील शक्ति नव्हती. मी मध्येंच थांबलों. सावेलिचला मात्र मनस्वी आनंद झालेला दिसला. मोठ्यानें ओरडून तो म्हणाला,—'धनी बोलले...धनी बोलले...' —आणि मग माझ्याकडे वळून तो एकसारखा बोलतच राहिला.—'प्योत्र आंद्रेइच, काय घाबरवून सोडलं होतंत तुम्ही मला ? आज पांच दिवस झाले, कळलं ? पांच दिवस झाले !'—मरीया इवानोवनानें त्याची बडबड मध्येंच तोडली.—'हें बघ सावेलिच, त्यांच्याशी फार बोलूं नकोस.'—ती म्हणाली—'फार अशक्तता आली आहे ना ? राहील ना लक्षांत ? बोलायचं म्हणून नाहीं.'—आणि मग ती आली, तशीच निघून गेली. जातांना खोलीचें दार तिनें हळूंच ओढून घेतलें. मी तें सारें बघत होतों. पण मला धड कशाचाच कांहीं उमज पडत नव्हता. एक गोष्ट मात्र कळून चुकली होती. मी कमांडंटच्या घरांत होतों. मरीया इवानोवना माझी खबर घेत होती. सावेलिचशीं बोलण्याचा मी यत्न करून पाहिला. पण त्यानें बोलण्याचेंच नाकारलें. त्रासून मी डोळे मिटले. आणि लगेच मला गाढ झोंप लागली.

जाग आल्यावर मी सावेलिचला हांक मारली. पण तो कोठें जागेवर होता ? तेवढ्यांत माझी नजर बाजूला वळली. आणि बघितलें, तर मरीया इवानोवना माझ्याजवळ बसली होती.—'काय हवं ?'—म्हणून तिनें विचारलें. अमृतानें माखलेल्या त्या मधुर शब्दांनीं मला केवढा धीर आला. त्या क्षणाला माझ्या मनांत ज्या गोड गोड विचारांनीं गर्दी केली, ते सारे बोलून दाखविणें केवळ अशक्य आहे. लगेच तिचा हात मी माझ्या हातांत घेतला. आणि गालावर दाबून ठेवला. आनंदाश्रूंनीं मी त्या नाजुक हाताला स्नान घातलें. माशानें आपला हात तेथें तसाच राहूं दिला...आणि मग एकदम भावनावेगानें तिनें आपले ओठ माझ्या गालांवर टेकले. त्यासरशीं माझ्या सर्वांगांतून विजेची चमक उठली.—'मरीया इवानोवना, तूं किती चांगली आहेस गं,'—मी म्हणालों. आणि मग क्षणाचा सुद्धां विचार न करतां मी लगेच तिला विचारलें,—'तूं माझी होणार कां ? मला जन्माचा सुखी करशील कां ?'—पण तेवढ्यांत तिनें आपला तोल सावरला होता. अनावर होऊं पाहणाऱ्या मनावर ताबा मिळविला होता.—'हें बघ, तूं जरा शांत पडून रहा बघूं.'—माझ्या हातांतून आपला हात हळूंच सोडवून घेत ती म्हणाली,—'तुझ्या प्रकृतीला फार जपायला हवं. तुझी जखम अजून नीट भरलेली नाहीं. निदान माझ्यासाठीं तरी तुला स्वतःची काळजी घ्यायला हवी.'—एवढें बोलून ती माझ्या खोलींतून झपाट्यानें निघून गेली. आतां माझा आनंद गगनांत मावत नव्हता. भावी सुखाच्या नुसत्या कल्पनेनें सुद्धां माझें शरीर पुलकित झालें. आतां बरा व्हावयास काय उशीर ! ती माझी होणार आहे ! तिचें माझ्यावर प्रेम आहे !—या एकाच विचारानें माझें अवघें जीवन त्या क्षणाला व्यापून टाकलें होतें.

आणि त्या क्षणापासून माझी तब्येत हळूं हळूं सुधारावयास लागली. जखमेची मलमपट्टी करावयाचें काम रेजिमेंटमधील न्हाव्याकडे होतें. बाकी डॉक्टर म्हणून आमच्या रेजिमेंटमध्यें कोणी नव्हता. आणि सुदैवानें माझ्यावर त्यानें कांहीं वेडेवाकडे प्रयोग करून पाहिले नाहींत, म्हणून बरें. माझें कोवळें वय आणि प्रसन्न मन यांजमुळें माझी तब्येत फार झपाट्यानें सुधारली. कमांडंटचें सर्व कुटुंबच माझ्या शुश्रुषेंत लक्ष घालीत होतें. मरीया इवानोवना तर सदांची माझ्याजवळ बसलेली असे. स्वाभाविकच पहिली संधि साधून मी पुन्हां एकदां तिला मघांचाच प्रश्न विचारला. त्या वेळीं ती पळून गेली होती. पण आतां मात्र शांतपणानें तिनें माझें प्रेमाचें बोलणें ऐकून घेतलें. आणि मग न लाजतां, मुरकतां तिनें माझ्यावरील प्रेमाची कबुली दिली. आणि आपल्या भावी सुखास घरांतील वडील माणसें मदत करतील, असें स्वतःच्या वतीनें वर आणखी आश्वासन दिलें.—'पण तूं मात्र स्वतःचा नीट काय तो विचार कर.'—ती म्हणाली. मग क्षणभर थांबून तिनें विचारलें,—'तुझ्या घरांतलीं वडील माणसं आपल्या बेताच्या आड तर येणार नाहींत ना?'

खरेंच, आजवर या गोष्टीचा मी कधीं गंभीरपणानें विचारच केला नव्हता. आणि आतां तसा विचार करण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. माझ्या आईविषयीं मला चिंता नव्हती. माझ्या वरील तिचें उत्कट प्रेम मला चांगलें माहित होतें. पण माझ्या वडिलांची मात्र मी खात्री देऊं शकत नव्हतों. त्यांचा स्वभाव मी चांगला ओळखीत होतों. आणि त्यांचीं मतेंप ण मला चांगलीं माहित होतीं. प्रेमाच्या वगैरे गोष्टी त्यांच्या पुढ्यांत करण्याची सोय नव्हती. तरुण माणसाच्या मनांतील स्वच्छंद लहर, म्हणून त्यांनीं माझ्या प्रेमाचा उपहास केला असता. हें सारें मी तिला मोकळेपणानें सांगितलें. पण त्याच वेळीं,—"लवकरच त्यांना पत्र लिहून सारं कांहीं मी कळवणार आहे.'—पत्रांत मी माझं अंतःकरण ओतीन. आणि त्यांना वडीलकीनें आशीर्वाद द्यायला सांगेन,—असें मी म्हणालों. पत्र लिहून झाल्यावर मी तिला तें दाखविलें. माझें पत्र तिला भारी आवडलें. आणि त्याचा इष्ट तोच परिणाम होईल, याबद्दल तिला शंका वाटली नाहीं. नवतीच्या प्रीतीनें तिचें अंतःकरण भरलें होतें. तिच्या मनांत श्रद्धा होती. आणि मोठ्या आशेनें ती भावी काळाकडे बघत होती.

मला बरें वाटावयास लागल्यावर थोड्याच दिवसांनीं मी श्वाब्रिनशीं समेट केला. इवान कुझमिचनें मारामारी केल्याबद्दल एकदां माझी चांगलीच कान उघडणी केली. तो म्हणाला,—'प्योत्र आंद्रेइच, खरं म्हणजे मी तुला या गुन्ह्यांबद्दल अटकेंतच ठेवायला हवं होतं. पण मागून मी विचार केला कीं अनायासें तुला चांगली अद्दल घडली आहे. तेवढी शिक्षा सध्यां पुरे. अलेक्सी इवानिचला बेकरच्या दुकानांत मी कोंडून घातलं आहे. आणि वासिलिसा येगोरोवनानं त्याची तलवार कडी—कुलुपांत बंदोबस्तानं ठेवून दिली आहे. आपली चूक

त्याला तिथें कळून येईल. आणि त्याला पश्चाताप वाटेल, अशी मला आशा आहे.'—त्या वेळीं माझ्या मनांत आनंद असा शिगोशिग भरला होता कीं कोणी दुःखांत असावें, ही कल्पना सुद्धां मला सहन झाली नाहीं. म्हणून कमांडंटपाशीं श्वाब्रिनच्या सुटकेसाठीं मी रदबदली केली. त्या कनवाळू माणसानें नेहमीप्रमाणें आधीं आपल्या बायकोचा सल्ला घेतला. आणि मग त्यानें श्वाब्रिनला सोडून दिलें. सुटका झाल्याबरोबर श्वाब्रिन मला भेटावयास आला. मध्यंतरीं जें कांहीं घडलें होतें, त्याबद्दल त्यानें विषाद व्यक्त केला. चूक आपलीच होती, म्हणून मोकळया मनानें त्यानें कबूल केलें. आणि—'झालें गेलें विसरून जाऊं या.'—म्हणून मला आवर्जून सांगितलें. मनांत राग सांठवून ठेवण्याचें माझ्या स्वभावांतच नव्हतें. मी पण मनापासून त्याला क्षमा केली. खरें म्हणजे त्यानें माझा मनस्वी छळ केला होता. आणि मी बेसावध असतांना कदाचित् प्राणांतिक ठरेल, अशी जखम केली होती. पण अभिमान दुखावल्यामुळें त्यानें माझी बदनामी केली असावी, आणि असफल प्रेमापोटी त्यानें माझ्याशीं तसलें गैरवर्तन केलें असावें, अशी माझ्या मनाशी मी समजूत काढली. आणि माझ्या दुर्दैवी प्रतिस्पर्ध्याला मोठ्या मनानें मी क्षमा केली.

कांहीं दिवसांनीं मी अगदीं बरा झालों. आणि परत माझ्या खोलीवर आलों. माझ्या पत्राच्या उत्तराची मोठ्या उत्सुकतेनें मी वाट बघत होतों. तशी आशा फार थोडी होती. पण तरी सुद्धां अशुभ भविष्याचे भीतिदायक विचार मी आंतल्या आंत दडपून टाकीत होतों. वासिलिसा येगोरोवनाला किंवा कमांडंटला मी अजूनपर्यंत याविषयीं कांहींच बोललों नव्हतों. पण जरी यदाकदाचित बोललों असतों, तरी त्यांनीं त्याचा धसका घेतला नसता, एवढें मला माहित होतें. मी किंवा मरीया इवानोवना त्यांच्यापासून कांहीं चोरून ठेवीत नव्हतों. त्यांची संमति आम्ही गृहीतच धरून चाललों होतों.

शेवटीं एक दिवस सकाळीं सावेलिच एक पत्र घेऊन आला. मोठ्या उत्सुकतेनें मी तें त्याच्या हातांतून काढून घेतलें. लिफाफ्यावरील पत्त्याचें हस्ताक्षर माझ्या वडिलांचें होतें. तें पाहूनच पुढील भीतिदायक प्रसंगाला तोंड देण्याची माझी तयारी झाली. कारण यापूर्वीं बहुत करून माझी आईच सारीं पत्रें लिहीत असे. तिच्या पत्राच्या शेवटीं जरूर वाटल्यास वडील चार ओळी लिहीत. थोडा वेळ मी तो लिफाफा तसाच हातांत धरून ठेवला. तो फोडावयाची मला हिंमत झाली नाहीं. वरच्या पत्त्याकडेच किती तरी वेळ टक लावून मी बघत बसलों होतों.—माझा मुलगा प्योत्र आंद्रेइच ग्रिनेव, ओरेनबुर्ग गुबरनिया. किल्ले बेलोगोर्स्क.—त्या हस्ताक्षरावरून लिहिणाऱ्याच्या मनःस्थितीचा कांहीं थांग पत्ता लागू शकतो कीं काय, तें मी बघत होतों. शेवटीं मी लिफाफ्याचें सील तोडलें. लिफाफा उघडला. आणि पहिल्या चार पांच ओळी बघतां क्षणीं माझ्या डोळ्या समोर अंधारी आली. सारें कांहीं संपलें, असें वाटलें पत्रांतील मजकूर असा होता :

चि. प्योत्र यांसीं—

ता. १५ रोजीं तुमचें पत्र पोहोंचलें. मिरोनोवची मुलगी मरीया इवानोवना हिजशीं लग्न करावयाचें तुम्हीं योजिलें आहे, आणि त्यासाठीं तुम्हांला आमचे आशीर्वाद हवे आहेत, असें तुम्ही लिहिलें आहे. या लग्नास आमची संमति मुळींच नाहीं. अर्थातच आशीर्वाद मिळणार नाहींत. तुम्हांला ऑफिसरचा हुद्दा देण्यांत आला आहे. पण तरी सुद्धां तुम्हांला अजाण मूल समजून मुलास योग्य ती शिक्षा द्यावी, असें आम्हांस वाटतें. तुमच्या देशाच्या संरक्षणासाठीं जी तलवार तुमच्या स्वाधीन करण्यांत आली आहे, ती पेलण्याची योग्यता तुम्हांस मिळाली आहे, असें वाटत नाहीं. कारण त्या तलवारीचा उपयोग तुमच्याच सारख्या अविचारी माणसांशीं द्वंद्वयुद्ध खेळण्यासाठीं तुम्ही केला आहे. लगेच मी आंद्रे कार्लोविचला पण एक पत्र लिहिणार आहे. आणि बेलोगोर्स्कहून आणखी दूर कोठें तरी तुमची बदली करावी, असें सांगणार आहे. तुम्ही एकदां दूर गेलांत, म्हणजे हा सारा मूर्खपणा विसरून जाल. तुमच्या मारामारीची आणि जखमेची हकीगत कळल्यापासून तुमच्या मातोश्री दुःखानें बिछान्यास खिळून पडल्या आहेत. तुमचें काय होणार, कांहींच समजत नाहीं. देवाजवळ प्रार्थना करतों, कीं तुम्ही लवकरच सुधारण्याच्या मार्गास लागाल. तो दयाळू देव तुमचेवर दया करील, अशी व्यर्थ आशा आमच्या मनांत नाहीं.

आपला,

**आंद्रे पेत्रोविच ग्रिनेव**

तें पत्र वाचून अनेक संमिश्र भावनांचा कल्लोळ माझ्या मनांत उठला. माझ्या वडिलांनीं निष्ठुरपणानें माझी अशी निर्भत्सना करावी, याचा मला फार खेद झाला. मरीया इवानोवनाविषयीं त्यांनीं अशी अनादराची भाषा वापरावी, याचें मला मोठें नवल वाटलें. बेलोगोर्स्क किल्ल्यांतून माझी बदली होण्याच्या नुसत्या कल्पनेनें मला अगदीं बेचैन करून टाकलें. पण मला सर्वांत अधिक दुःख झालें, तें आईच्या आजाराची वार्ता ऐकून. सावेलिचचा तर मला भयंकर संताप आला. आमच्या मारामारीची हकीगत त्यानेंच घरीं कळविली असली पाहिजे, हें मला पुरतेपणीं कळून चुकलें होतें. पत्र वाचून झाल्यावर संतापाच्या भरांत मी उगीचच इकडून तिकडे माझ्या टीचभर खोलींत येरझारा घालीत होतों, तों मध्येंच थांबलों. आणि रागारागानें त्याच्यावर ओरडून म्हणालों,—'एक महिनाभर मला मरणाच्या दारांत ठेवून जणुं तुझं समाधान झालं नाहीं. म्हणूनच कीं काय, तूं आतां माझ्या आईला मारायला निघाला आहेस.'—माझ्या कठोर वाग्बाणांनीं तो जसा घायाळ झाला. आणि रडत रडत तो म्हणाला,—'काय हें धनी, काय बोलतांहांत तुम्ही? मी तुम्हांला मरणाच्या दारांत नेऊन ठेवलं? खरं म्हणजे,

तुम्ही मरत होतांत. तर मी तुम्हांला वांचवलं. अलेक्सी इवानोविच तलवार भोसकून तुम्हांला ठार करणार होता म्हणून मी धांवत आलों, तो तुम्हांला वांचविण्यासाठीं. पण या म्हातारपणानं माझा अवसानघात केला. आणि तुमच्या आईला मी काय केलं ? '...' काय केलं ? ' —मी त्याला उलट विचारलें,—'घरीं पत्र लिहायला तुला कोणी सांगितलं होतं ? माझ्यावर पाळत ठेवण्यासाठीं तुझी कोणी नेमणूक केली आहे कीं काय ?'—' मी पत्र लिहिलं ?... आणि तुमच्यावर पाळत ठेवली ?... अरे देवा, यांतलं मला कांहीं सुद्धां माहीत नाहीं.'—रडत रडत सावेलिच म्हणाला,—' मग थोरल्या मालकांनीं मला हें काय लिहिलं आहे, तें बघा एकदां.'—असें म्हणून त्यानें आपल्या अंगरख्याच्या खिशांतून दुसरें एक पत्र काढलें. आणि माझ्या हातीं दिलें. त्या पत्रांत माझ्या वडिलांनीं सावेलिचला लिहिलें होतें :

' प्योत्र बरोबर तुला मी कशासाठीं पाठविलें होतें ? तेथें जें कांहीं चाललें आहे, त्याची सारी खबर इमानानें तूं लिहून कळवीत नाहींस. मग कुत्तरड्या, तुझा उपयोग तरी काय ? माझा मुलगा तेथें हजार भानगडी करतो. आणि तिऱ्हाईत माणसें मला तेथूनची सारी खबर कळवतात; पण गाढवा, तूं मात्र मला त्यांतलें कांहीं सुद्धां कळवीत नाहीस, याची तुला लाज वाटायला पाहिजे. धन्यानें सांगितलेलें काम इमानें इतबारें करावयास हवें, एवढी साधी गोष्ट सुद्धां तुला समजत नाहीं ? तूं खरें काय तें लपवून ठेवलेंस. आणि प्योत्रच्या गुन्ह्यावर पांघरूण घातलेंस. म्हणून हरामखोरा, लगेच मी तुला परत बोलावून घेईन आणि डुकरें वळावयास पाठवीन. हें पत्र मिळतां क्षणीं उलट टपालीं मला सारें कांहीं कळव. प्योत्रची तब्येत सुधारते आहे, असें कळलें. त्याला कोठें जखम झाली होती ? आणि आजारपणांत त्याची शुश्रुषा कोणी केली, त्याची सारी बातमी इत्यंभूत लिहून कळव.'

या पत्रावरून माझी एकदम खात्री पटली कीं सावेलिच निर्दोष आहे. खरें म्हणजे, मी त्याच्यावर नसते आरोप करावयास नको होते. कसला म्हणून खोटा आळ त्याच्यावर घालावयास नको होता. मी मुकाट्यानें त्याची क्षमा मागितली. पण तेवढ्यानें म्हाताऱ्याचें समाधान झालें नाहीं. कपाळाला हात लावून हुंदके देत तो म्हणाला,—' माझंच नशीब खोटं, त्याला कोण काय करणार ? मी इमानानं चाकरी बजावली. आणि माझ्या धन्यांनीं त्याचा असा मोबदला दिला. अखेर मी कुत्तरडा, डुकरराख्या. तुमचा जीव घ्यायाला मी निघालों होतों, नाहीं कां ? प्योत्र आंद्रेइच, दोष माझा नाहीं, तर बोप्रेचा आहे. त्यानं तुम्हांला भोसकाभोसकी कशी करावी, जमिनीवर पाय आपटून दटावणी कशी द्यावी, हें चांगलं शिकवलं. पण भोसकाभोसकीनं नि पाय आपटल्यानं कां कुठें दुष्ट माणसापासून स्वतःचा

बचाव करतां येतो ? ब्रोप्रेसारख्या नालायक माणसाला नोकरीवर ठेवून त्यांनीं पैसा कां उधळला, हेंच मला समजत नाहीं. '

माझ्या विषयींची एकूण एक बित्तंबातमी घरीं लिहून कोणीं कळविली असेल ? जनरल साहेबांनीं ? पण माझ्यासारख्या एका यःकश्चित् शिपायाची ते काय म्हणून दखल घेतील ? शिवाय त्यांच्या कानांवर ही बातमी गेली असण्याचा संभव नव्हता. कारण इवान कुझमिचला या प्रकरणाचा रिपोर्ट पाठविण्याची गरज वाटली नव्हती. मला कांहींच कळेना. शेवटीं श्वाब्रिनची शंका माझ्या मनाला चाटून गेली. तो एकटा एकच माणूस असा होता कीं ज्याचा माझ्या बदलीमुळें कांहीं फायदा होण्याचा संभव होता. कमांडंटच्या कुटुंबांतून आणि मर्जीतून मी दूर झालों असतों, तर एक त्याचें मात्र कल्याण झालें असतें. मरीया इवानोवनाला ही सारी हकीगत कळवावी, म्हणून लगेच मी तिच्या घरीं गेलों. ती बाहेर पोर्चमध्यें उभी होती. मला पाहिल्याबरोबर ती म्हणाली,—' आज तुला झालं आहे तरी काय ? किती निस्तेज, मलूल दिसतो आहेस तूं ? '—'संपलं सारं.'—एवढे दोनच शब्द बोलून मी माझ्या वडिलांचें पत्र तिच्या हातीं दिलें. आणि क्षणार्धांत तिची मुद्रा निस्तेज, मलूल दिसावयास लागली. तिनें तें पत्र वाचलें. आणि थरथरत्या हातांनीं परत दिलें. ती हळूंच म्हणाली,—' तें तसं होणार नव्हतं...बघितलंस ? तुझ्या घरच्या माणसांना मी नको आहे,'...तिच्या आवाजांत कंप होता. ती पुढें म्हणाली,—' जशी देवाची इच्छा. तो जें कांहीं करतो, तें सारं आपल्या भल्यासाठींच करतो. त्याला कांहीं इलाज नाहीं. प्योत्र आंद्रेइच, जोपर्यंत तूं सुखी आहेस...'—' छेः छेः तें शक्य नाहीं. '—तिचा हात हातांत घेऊन मी म्हणालों,—' तुझं माझ्यावर प्रेम आहे. आतां काय वाटेल तें झालं, तरी मी मागें घेणार नाहीं. चल, आपण असेच आंत जाऊं. तुझ्या आईवडिलांच्या पायांवर लोळण घेऊं. तीं बिचारीं साधीं माणसं आहेत. भाबडीं आहेत. त्यांचीं मनं गर्वानें कांही निगरगट्ट झालेलीं नाहींत. ते आपल्याला आशीर्वाद देतील. आपण लग्न करूं...कांहीं दिवसांनीं माझ्या वडिलांचं मनहि आपल्याला वळवतां येईल, याची मला खात्री आहे. माझ्या आईचं माझ्यावर भारी प्रेम आहे. ती आपलीच बाजू घेईल. आणि वडील मला क्षमा करतील.'—' नाहीं. प्योत्र आंद्रेइच,. असं कांहीं होणार नाहीं.'—माशा म्हणाली,—' तुझ्या घरच्या माणसांचे आशीर्वाद मिळणार नसतील, तर मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं. त्यांचा आशीर्वाद नसेल, तर तुला सुख लाभणार नाहीं. देवाची इच्छा असेल, तसं होईल. तुझ्या नशिबांत असलेली बायको तुला मिळाली किंवा दुसऱ्या एखाद्या मुलीवर तुझं प्रेम बसलं, तर देवाच्या दयेनं तुम्हीं दोघं सुखांत रहाल. तसं झालं, तर, प्योत्र आंद्रेइच, तुमच्या दोघांसाठीं मी देवाची प्रार्थना करीन... ' बोलतां बोलतां तिला एकदम रडें कोसळलें. आणि बघतां बघतां ती घरांत निघून गेली. तिच्या मागोमाग घरांत जावें, असें मला वाटलें. पण कदाचित्

माझी भावना अनावर होईल, अशी मला भीति वाटली. म्हणून मी तसाच घरीं परत गेलों.

घरीं आल्यावर मी विचारांत गढून गेलों होतों, तेवढ्यांत कोठून तरी सावेलिच तेथें आला. आणि नकळत माझ्या विचारसमाधीचा भंग करून तो म्हणाला,—' हें घ्या. '—कांहीं तरी खरडलेला एक कागद त्यानें माझ्या पुढ्यांत धरला.—' तुमच्यावर मी पाळत ठेवतों, नाहीं कां ? बापलेकांत भांडण लावून द्यायचा माझा विचार आहे, नाहीं ? '—त्याच्या हातांतून मी तो कागद घेतला. सावेलिचनें माझ्या वडिलांच्या पत्राला हें उत्तर लिहिलें होतें. त्यांत एक शब्दाचा सुद्धां बदल न करतां मी तें खालीं देत आहे. तें पत्र असें होतें :

**माझे धनी आंद्रे पेत्रोविच,**

तुमचं कृपापत्र पोंचलें. तुमचा माझ्यावर, या गुलामावर, भारी राग झालेला दिसतो. तुमचा हुकूम मी पाळला नाहीं आणि म्हणून मला त्याची लाज वाटायला पाहिजे, असं तुम्हीं लिहिलं आहे. पण मी कांहीं कुत्तरडा नाहीं. मी तुमच्या पायाचा चाकर आहे. तुमचे सारे हुकूम मी आजवर पाळले आहेत. इमानें इतबारें तुमची चाकरी बजावली आहे. तुमच्याच चाकरींत माझे केस काळ्याचे पांढरे झाले आहेत. प्योत्र आंद्रेइचला जखम पोंचली, हें खरं आहे. आणि याबद्दल मी तुम्हांला पत्र घातलं नाहीं, हें पण खरं आहे. तुमच्या जिवाला घोर लावावा, असं मला वाटलं नाहीं. म्हणून मी लिहिलं नाहीं. तुम्हीं लिहितां कीं प्योत्र आंद्रेइचच्या मातोश्री अवदोत्या वासिलेवना फार आजारी झाल्या आहेत. काळजीनं त्यांनीं बिछाना धरला आहे. त्यांच्यासाठीं मी देवाची करुणा भाकतों. प्योत्र आंद्रेइचला उजव्या खांद्याखालीं छातींत दोन तीन बोटं खोल अशी जखम झाली होती. त्यांनीं नदीकाठीं मारामार केली. तिथून आम्ही त्यांना उचलून कमांडंटच्या घरीं नेलं. तिथें ते बिछान्यावर पडून होते. स्तेपान पारामोनोव म्हणून एक न्हावी आहे. त्यानं जखम बांधली. आणि आतां देवाच्या दयेनं त्यांची जखम पार बरी झाली आहे. वरच्या ऑफिसर लोकांत त्यांची चहा आहे. कमांडंटची बायको वासिलिसा येगोरोवना प्योत्र आंद्रेइचला आपला मुलगाच जणुं, असं मानते. छोट्या धन्यांनीं मारामारी केली असेल. पण पोरवयांत म्हातारं शहाणपण कोठून येणार ? घोड्याला चार पाय असले, तरी सुद्धां तो अडखळून पडतो. डुकरांची राखण करण्यासाठीं तुम्ही मला परत बोलावून घेणार आहांत, असं लिहितां. तुम्ही माझे धनी आहांत. बरं दिसेल, तसं तुम्हीं करा. माझे तुम्हांला दंडवत.

**तुमचा विश्वासू चाकर— आर्खिप सोवल्येव**

म्हाताऱ्याचें तें पत्र वाचीत असतांना मधून मधून मला हंसू आवरेना. माझ्या वडिलांना मी कांहीं लिहीन म्हटलें, तर सध्यांच्या स्थितींत तें अशक्यच

होतें. तेव्हां सावेलिचचें पत्र वाचून माझ्या आईची काळजी निदान दूर होईल, असें मला वाटलें.

त्या दिवसापासून सारी परिस्थितीच जशी पालटून गेली. मरीया इवानोवना क्वचितच माझ्याशीं बोले. शक्य तों माझ्यापासून दूरदूर राहण्याचा यत्न ती करीत असे. कमांडंटच्या घराविषयीं आजवर माझ्या मनांत जें आकर्षण होतें, तें सर्व एकदम जसें नाहींसें झालें. हळूं हळूं घरांत बसून एकट्यानेंच सारा दिवस काढण्याची संवय मला जडली. पहिल्या पहिल्यानें वासिलिसा येगोरोवना त्याबद्दल मला बोले. पण माझा निश्चय बघून पुढें माझ्या वाटेस जाण्याचें तिनें सोडून दिलें. काम करीत असतांना इवान कुझमिचची काय गांठ पडेल, तेवढीच. श्वाब्रिन क्वचितच भेटे. शक्य तों त्याला भेटण्याचें मी टाळीतच असे. कारण त्याच्या मनांत माझ्याविषयीं गुप्त तिरस्कार आहे, हें मला अनुभवानें कळून चुकलें होतें. आणि त्यामुळें माझ्या मनांतील संशय आणखी पक्का झाला होता. नको हें जगणें, असें मला वाटावयास लागलें होतें. आणि अशा उदासवाण्या विचाराच्या गर्तेंत मी खचत चाललों होतों. त्यांत आणखी एकाकीपणाची आणि निष्क्रियतेची भर पडली होती. एकांतवासांत प्रेम भडकून उठत होतें. प्रेमाचें ओझें एकसारखें वाढतच होतें. आणि तो असह्य भार मला सहन होत नव्हता. लिहिण्यावाचण्यांत आतां गोडी उरली नव्हती. खिन्नतेनें मला सर्वस्वीं घेरलें होतें. अशा विमनस्क स्थितींत एक तर मला वेड लागेल, किंवा दारूची चटक वाढेल, असें भय मला वाटत होतें. आणि याच वेळीं नेमकी एकाएकीं एक अनपेक्षित घटना घडली. त्या घटनेनें एक जबरदस्त पण परिणामीं हितकर असा धक्का मला दिला. माझ्या अवघ्या जीवितावर त्या घटनेचा विलक्षण परिणाम झाला.

---

# प्रकरण सहावें

## *पुगाचेव आणि त्याचे टोळीवाले*



"तरण्या पोरा
म्हाताऱ्यांचे बोल अनुभवी ऐक जरा."

—जुनें गाणें

यापुढें घडलेल्या ज्या आश्चर्यकारक घटनांना मी साक्षी होतों, त्यांचें वर्णन करण्यापूर्वी इ. स. १७७३ सालाच्या अखेरीस ओरेनबुर्ग गुबेरनियामध्यें जी परिस्थिति होती, तिच्याविषयीं कांहीं माहिती देणें आवश्यक आहे.

या विस्तीर्ण आणि संपन्न परगण्यांत असंख्य जंगली लोकांचें वसतिस्थान होतें. आणि या आदिवासींनीं रशियन झारशाहीची अधिसत्ता अलिकडेच मान्य केली होती. पण तरी सुद्धां त्यांचे दंगे धोपे नित्य चालूंच असत. कायद्याला शरण जाण्याची प्रवृत्ति स्वभावतःच त्यांच्यामध्यें नव्हती. आणि सुसंस्कृत जीवनाशीं सुसंगत असें वर्तन ते एकदम करूं शकत नव्हते. ही सारी जातच क्रूर आणि हिंसक म्हणून प्रसिद्ध होती. आणि अशा या बंडखोर जमातीला कह्यांत ठेवण्यासाठीं सरकारला डोळ्यांत तेल घालून पहारा ठेवावा लागे. वारंवार उद्भवणाऱ्या बंडांचा बीमोड करण्यासाठीं सरकारनें अनेक उपाय योजिले होते. त्यांजपैकीं एक म्हणजे योग्य अशी माऱ्याचीं ठिकाणें शोधून तेथें तटबंदी उभारण्याची व्यवस्था करण्यांत आली. किल्ले बांधण्यांत आले. या नव्या लष्करी ठाण्यांच्या संरक्षणाची व्यवस्था बहुत करून याच प्रदेशांतील कझाक सैनिकांकडे सोंपविलेली होती. या भागांतील कझाक याइक नदीच्या खोऱ्यांत वस्ती करून राहणारे होते. या भागांतील शांततेची आणि संरक्षणाची हमी या ज्या कझाक सैनिकांकडे होती, त्यांच्यांतच या वेळीं कांहीं बेदिली निर्माण झाली होती. आणि हे सैनिकच सरकार विरुद्ध बंड करून उठावयास लागले होते. इ. स. १७७२ मध्यें एका मोक्याच्या किल्ल्यांत कझाकांनीं बंडाचें निशाण उभारलें. मेजर जनरल त्रोबेनबर्गनें या बंडखोर कझाक सैनिकांना शिस्त लावण्यासाठीं म्हणून जे अघोरी उपाय योजिले होते, त्यांची परिणिति अखेरीस या उठावांत झाली. परिणामीं सैनिकांनीं त्रोबेनबर्गचा निर्घृण खून केला. राज्यकर्त्यांनीं तेथील कझाकांसंबंधीच्या कारभारांत

हवे तसे बदल केले. आणि शेवटीं क्रूरपणें सूड उगवून व शिक्षा ठोठावून बंड चिरडण्यांत आलें.

वर ज्या घटनांचा मी निर्देश केला, त्या सर्व मी बेलोगोर्स्क किल्ल्यांत सरकारी चाकरीवर रुजू होण्यापूर्वी कांहीं दिवस अगोदर घडल्या होत्या. मी तेथें आलों, तेव्हां सर्वत्र शांतता होती. किंवा निदान शांततेचा आभास तरी सर्वत्र दिसत होता. बंडाच्या कांहीं धूर्त पुढाऱ्यांनीं पश्चातापाचा देखावा केला होता. आणि सरकारनें त्यांच्यावर नको इतका विश्वास ठेवून त्यांना क्षमा केली होती. ते बंडवाले आंतल्या आंत जळत होते. पुन्हां एखाद्या नव्या उठावासाठीं दक्षतेनें संधि शोधीत होते. एकूण परिस्थिति स्फोटक अशी होती.

आतां मी माझ्या हकीगतीस सुरुवात करतों.

इ. स. १७७३ च्या ऑक्टोबर महिन्याच्या पहिल्या आठवड्यांतील तो एक दिवस होता, असें मला आठवतें. पावसाळ्यांतील वादळी वारे गवताळ मैदानांवरून बेगुमान वाहत होते. त्यांच्या निकराच्या माऱ्यानें आसमंत दणाणून गेलें होतें. त्या दिवशीं संध्याकाळीं मी एकटाच नित्याप्रमाणें खोलींत विचार करीत बसलों होतों. निस्तेज चंद्रबिंबावरून काळेभोर ढग झपाट्यानें धांवत होते. तें दृश्य खिडकींत बसून मी बघत होतों. तेवढ्यांत कोणीं तरी, कमांडंटनें तुम्हांला ताबडतोब बोलावलें आहे, म्हणून वर्दी दिली. लगेच कपडे करून मी कमांडंटच्या घरीं गेलों. तेथें माझ्या अगोदरच श्वाब्रिन, इवान इग्नातिच आणि कझाक सार्जंट येऊन बसले होते. नवलाची गोष्ट, म्हणजे वासिलिसा येगोरोवना किंवा मरीया इवानोवना तेथें कोठें दिसत नव्हत्या. कमांडंटनें माझें स्वागत केलें. पण तो विचारांत गढून गेलेला दिसला. मी आंत जातांक्षणीं त्यानें लगेच उठून दाराला आंतून कडी घातली. कझाक सार्जंट दाराजवळ उभा राहिला. बाकी आम्हीं सर्वजण टेबलाभोंवतीं बसलों. नंतर कमांडंटनें खिशांतून एक लिफाफा बाहेर काढला. मग तो म्हणाला,—'सभ्य गृहस्थ हो, तुम्हांला कांहीं चिंताजनक वार्ता सांगायची आहे. जनरल साहेबांनीं काय लिहिलें आहे, तें ऐका.'—असें म्हणून त्यानें नाकावर चष्मा चढवला. आणि खालीं दिलेलें पत्र मोठ्यानें आम्हांला वाचून दाखविलें. पत्रांतील मजकूर असा होता :

कॅप्टन मिरोनोव, बेलोगोर्स्क ठाण्याचे कमांडंट यांसी, [ गुप्त खत ]

कझाक येमेल्यान पुगाचेव नुकताच कैदेंतून सुटून पळाला आहे. हा लुटारू अक्षम्य उद्धटपणानें स्वतःस झार तिसरा पीटर असें म्हणावयास लागला आहे. स्वतःच्या भोंवतीं टोळीवाल्यांची खडी फौज त्यानें जमविली आहे. याइक खोऱ्यांतील शेतकरी खेडुतांमध्यें तो बंडाळी माजवीत आहे. त्यानें अनेक लष्करी ठाणीं काबीज करून उध्वस्त करून टाकलीं आहेत. चोहोंकडे तो लूटमार आणि

खून करीत सुटला आहे. म्हणून तुम्हांला वेळींच कळविण्यांत येत आहे कीं हें पत्र मिळतांक्षणीं तुम्हीं आपल्या अधिकारांतील ठाण्यांत योग्य तो बंदोबस्त राखून असावें. आणि या दरोडेखोर लुटारू तोतयाचें जेणेंकरून पारिपत्य होईल, असे सर्व उपाय योजावेत. आणि तुमच्या ताब्यांतील ठाण्यावर त्यानें हल्ला चढविला, तर कांहीं दयामाया न दाखवतां बेशक त्याला फांसावर चढवावें.

वरील हुकूमनामा मोठ्यानें वाचून दाखविल्यानंतर कमांडंटनें नाकावरचा चष्मा काढून टेबलावर ठेवला. पुढ्यांतील हुकूमनाम्याची घडी करीत तो म्हणाला,—'योग्य तो बंदोबस्त राखून असावं...सांगणं सोपं पण करणं कठीण ! ह्या बंडखोरांचा पाजी पुढारी कांहीं सामान्य असामी नाहीं. त्याच्याजवळ भक्कम फौजफांटा आहे. इथें ठाण्यावर सर्व मिळून एकशेतीस शिपाई आहेत. आणखी कांहीं कझाक सार्जंट आहेत. पण आतां त्यांच्यावर विश्वास ठेवून भागण्यासारखं नाहीं....नाहीं. मक्सिमिच, तूं त्यांच्यांतला नव्हेस, हें आम्हांला माहित कां नाहीं ?' (दाराजवळ कझाक सार्जंट उभा होता. तो गालांतल्या गालांत हंसला). 'पण त्याला कांहीं इलाज नाहीं. तुम्हांला सर्वांना आपापलीं कामं तत्परतेनं करायला हवींत. पहारे बसवायला हवेत. रात्रींच्या गस्त चौक्या ठेवायला हव्यात. कदाचित केव्हां बाहेरून हल्ला झालाच, तर बाहेरचा दरवाजा आधीं बंद करून सर्व शिपायांना तटबंदीवर नेमलेल्या जागीं उभे करायचे...आणि हें बघ मक्सिमिच, तुझ्या त्या कझाकांवर नीट नजर ठेव. तोफेची तपासणी करा. ती चांगली साफसूफ करून ठेवा...आणि सर्वांत महत्वाची गोष्ट, म्हणजे हीं सर्व कामं अगदीं गुपचूप, बिनबोभाट पार पाडायला हवींत. ठाण्यावर कोणाला जरासुद्धां संशय येणार नाहीं, अशा बेतानं सांगितलेलीं सारीं कामं करा.'

काय द्यावयाचे, ते हुकुम देऊन झाल्यावर इवान कुझमिचनें आमची खास सभा बरखास्त केली. श्वाब्रिन आणि मी घरांतून बरोबरच बाहेर पडलों. तेव्हां आमच्यांत कांहीं बोलणें होणें स्वाभाविक होतें.—'याचा शेवट काय होईल, असं तुला वाटतं ?'—मी त्याला विचारलें.--'देवाला माहिती.'—तो म्हणाला.-- 'बघूं या. आतां तरी निदान काळजीचं कांहीं कारण दिसत नाहीं. अर्थात जर कां'...पण पुढें तो कांहीं बोलला नाहीं. आपल्याच विचारांत जसा एकदम गढून गेला. आणि शून्य चित्तानें एका फ्रेंच गाण्याच्या चालीवर तो शीळ घालूं लागला.

आम्ही आमच्याकडून पुष्कळ दक्षता घेतली. तरी पण पुगाचेवच्या उठावाची बातमी ठाण्यावर सर्वत्र पसरली. इवान कुझमिच आपल्या कुटुंबाला फार मान देत असे. पण तरीसुद्धां सरकारी हुकुमनाम्यांतील गुप्त गोष्टींची वाच्यता त्यानें आपल्या बायकोजवळ केली नसेल, अशी माझी खात्री होती. जनरल साहेबांचा खलिता येऊन थडकला, त्यावेळीं त्यानें मोठ्या युक्तीनें वासिलिसा येगोरोवनाला

घराच्या बाहेर पाठविलें. फादर गेरासिमला ओरेनबुर्गहून कांहीं महत्वाची गुप्त बातमी कळली आहे, पण तो ती कोणालच सांगत नाहीं, असें कमांडंटनें आपल्या बायकोला सांगितलें. त्यासरशीं ती गेरासिमच्या बायकोला भेटावयास गेली. माशाला घरीं एकाकी वाटेल, म्हणून इवान कुझमिचच्या सांगण्यांवरून तिनें माशालाहि बरोबर नेलें.

त्या वेळीं इवान कुझमिच आपल्या घरीं एकटाच होता. पलाशा होती, पण त्यानें तिला अडगळीच्या खोलींत कोंडून घातलें. आणि लगेच आम्हांला सर्वांना वर्दी दिली. त्यानंतर आमच्या गुप्त सभेंत जें काय घडलें, त्याचा सारा वृत्तांत वर दिलाच आहे.

वासिलिसा येगोरोवना जशी गेली, तशीच घरीं परत आली. गेरासिमच्या बायकोकडून तिला कांहींच बातमी मिळाली नाहीं. आपल्या गैरहजेरींत पलाशाला कोठडींत डांबून आपल्या नवऱ्यानें एक गुप्त सभा घेतली होती, तें सारें वृत्त तिच्या कानांवर गेलें. आपल्या नवऱ्यानें आपल्याला असें बनवावें, याबद्दल स्वाभाविकच तिला वैषम्य वाटलें. आणि तिनें त्याची उलट तपासणी आरंभिली. या अशा प्रसंगास केव्हां तरी तोंड द्यावें लागणार, हें कमांडंटला पुरतेपणीं माहित होतें. आतां तो सावध होता. आणि बायकोच्या प्रश्नांना दणक्यांत उत्तरें देत होता.—' हें पहा, गांवांतल्या बायका चुलींत गवत जाळीत होत्या; त्यामुळें अपघात वाढतील. म्हणून मी एक नवा हुकूम काढला आहे कीं यापुढें चुलींत कोणीहि गवत जाळूं नये. तर सर्पण जाळावें.'—' आणि काय हो, पलाशाला तुम्हीं कोंडून घातलींत, ती काय म्हणून ? '—तिनें त्याला विचारलें. या प्रश्नाचें उत्तर मात्र इवान कुझमिचजवळ तयार नव्हतें. तोंडांतल्या तोंडांत तो कांहीं तरी पुटपुटला. आपल्या नवऱ्याची बनवाबनवी वासिलिसा येगोरोवनाच्या चांगली ध्यानांत आली. पण कांहीं केल्या तो बधत नाहीं, बधणार पण नाहीं, हें समजल्यावर तिनें आपली उलट तपासणी एकदम थांबवली. प्रसंग ओळखून तिनें विषय बदलला. आणि अकुलिना पांफिलोवना खारावलेल्या काकडीची खास कोशिंबिर कशी करते, त्याची माहिती पतिराजांना सांगावयास तिनें सुरुवात केली. पण त्या दिवशीं रात्रीं वासिलिसा येगोरोवनाला क्षणभर सुद्धां झोंप आली नाहीं. आपल्यापासून लपवून ठेवण्यासारखें आपल्या नवऱ्याजवळ आहे तरी काय ?—या एका गोष्टीचा विचार करीत सारी रात्र तिनें तळमळत काढली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं चर्चमधून ती परत आली, तेव्हां इवान इग्नातिच एका वेगळयाच उद्योगांत गढून गेलेला तिला दिसला. तोफेच्या तोंडांत मुलांनीं ठासून भरलेल्या चिंध्या, गोट्या, हाडकें, वगैरे वस्तु तो बाहेर काढीत होता.—या लष्करी तयारीचा अर्थ काय ?—वासिलिसा येगोरोवनानें स्वतःलाच विचारलें. —किरगीझ लोक हल्ला करणार आहेत, अशी वर्दी तर या लोकांना मिळाली

नाहीं ना ? इवान कुझमिचनं असली क्षुल्लक गोष्ट माझ्यापासून नक्कीच चोरून ठेवली नसती.—लगेच तिनें इवान इग्नातिचला हांक मारून जवळ बोलावलें. बायकांच्या स्वभावानुसार सारें कांहीं जाणून घ्यावयाची तिला इच्छा होती. आणि या म्हाताऱ्या माणसाकडून सारी बित्तंबातमी काढतां येईल, अशी तिची खात्री होती.

तिनें इवान इग्नातिचला आधीं कांहीं घरगुती प्रश्न विचारलें. उलट तपासणीच्या वेळीं एखादा चतुर न्यायाधीश आरोपीला चकवण्यासाठीं ज्याप्रमाणें सहज म्हणून चार इकडचे तिकडचे प्रश्न करतो, तसेंच नेमकें यावेळीं पण झालें. नंतर क्षणभर थांबून तिनें एक दीर्घ निश्वास टाकला. आणि मग मान हलवून जशी सहज ती म्हणाली,—' अरे देवा, आतां काय होणार आहे, कोणास ठाऊक ? '

' त्याची तुम्हीं कांहीं काळजी करूं नका. '—इवान इग्नातिच म्हणाला,—' देव दयाळु आहे. आणि आपल्याजवळ हवे तितके शिपाई आहेत. दारुगोळ्याला तोटा नाहीं. तेलपाणी देऊन मी तोफ फक्कड चालू केली आहे. पुगाचेवनं जरी यदाकदाचित् हल्ला केला, तर आपली तयारी पण कमी नाहीं. बघतां बघतां त्याला मारून काढूं. देवानं दया केली, तर आम्हीं कधींच हार खाणार नाहींत.'

'पण काय रे, हा पुगाचेव आहे तरी कोण ? '—वासिलिसा येगोरोवनानें विचारलें. आणि मग इवान इग्नातिचनें एकदम जीभ चावली. आपली चूक त्याच्या ध्यानांत आली. पण ती फार उशीरां. मग वासिलिसा येगोरोनावनें, कोणाला कांहीं सांगणार नाहीं, म्हणून वचन देऊन त्याच्याकडून सारी बित्तंबातमी काढून घेतली.

वासिलिसा येगोरोवनानें इवान इग्नातिचला दिलेलें वचन खरोखरच पाळलें होतें. आणि त्याबद्दल एका अवाक्षरानें ती कोणाजवळ कांहीं बोलली नाहीं. फक्त फादर गेरासिमच्या बायकोला तिनें सारें कांहीं सांगितलें. कारण तिची गाय दूरदूरच्या कुरणांतून खुशाल चरत असे. आणि कदाचित पुगाचेवच्या गुंडांनीं तिला धरून नेलें असतें, म्हणजे मग ?

लवकरच सारा गांव पुगाचेवच्या हालचालींची चर्चा करावयास लागला. खऱ्याखोट्या वदंतांनीं वातावरण भरून गेलें. शेवटीं कमांडंटनें कझाक सार्जंटला आजूबाजूच्या खेड्यांत आणि किल्ल्यांत फिरून खरी बातमी काय ती काढून आणावयास फर्मावलें. दोन दिवसांनीं मक्सिमिच परत आला. त्यानें सांगितलें कीं सुमारें साठ वेर्स्तच्या अंतरावर आपण अनेक छावण्यांतील शेकोट्यांचा प्रकाश पाहिला; आणि प्रचंड फौजांची दौड चालू आहे, म्हणून बाष्किर लोकांनी आपल्याला बातमी दिली. तथापि, त्याला निश्चित अशी कांहींच बातमी देतां आली नाहीं. कारण पलिकडच्या टापूंत एकट्यानें फिरण्याचा त्याला धीर झाला नव्हता.

किल्ल्यांतील कझाक लोकांत मोठी खळबळ माजली होती. हे लोक गटागटांनी जागोजाग उभे राहत आणि खालच्या आवाजांत बोलत. पण लष्करांतील शिपायांचा सुगावा लागला कीं क्षणार्धात ते नाहींतसे होत. त्यांच्याकडून खरी बातमी काढावी, म्हणून गुप्त हेरांची पाठवणी झाली. यूलाय नांवाचा एक काल्मिक हेर होता. त्यानें कांहीं महत्त्वाची बातमी कमांडंटच्या कानांवर घातली. यूलायनें सांगितलें कीं कझाक सार्जंटनें दिलेल्या बातम्या खोट्या होत्या. त्यानें अशीहि माहिती दिली कीं हा सार्जंट परत आल्यावर त्यानें आपल्या लोकांना सांगितलें कीं आपण बंडखोरांच्या छावण्यांत गेलों होतों व त्यांच्या पुढाऱ्याची भेट घेऊन त्याच्याशीं चर्चा केली. ही माहिती मिळाल्याबरोबर कमांडंटनें मक्सिमिचला गार्डरूममध्यें डांबून ठेवलें. आणि त्याच्या बदली यूलायची नेमणूक केली. ही नवी बातमी जेव्हां कझाकांच्या कानीं गेली, तेव्हां ते चिडलेले दिसले. या घटनेनें त्यांच्या गोटांत खळबळ उडालेली दिसली. आणि इवान इग्नातिचनें कमांडंटच्या हुकुमाची तामिली केली, तेव्हां कझाक जे कांहीं बोलले, तें त्यानें आपल्या कानांनीं ऐकलें होतें. कझाक त्याला म्हणाले होते,—‘ लक्षांत ठेव. हरामखोरा, या नंतर तुझीच पाळी आहे. ’—त्याच दिवशीं कमांडंट कैद्याची उलट तपासणी करणार होता. पण मध्येंच मक्सिमिच कोठडींतून निसटून पळून गेला. अर्थात कझाकांनींच त्याची सुटका केली असली पाहिजे.

आणखी एक घटना अशी घडली कीं जिनें कमांडंटच्या काळजींत आणखी भर घातली. बंडाची चिथावणी देणारीं पत्रकें वाटणाऱ्या एका बाष्किराला शिपायांनीं पकडलें. यानंतर कमांडंटनें आपल्या हाताखालील ऑफिसर्सची पुन्हां एक सभा घ्यावी, असें ठरविलें. आणि पुन्हां एकदां कांहीं तरी अशीच सबब काढून आपल्या बायकोची दूर रवानगी करण्याचा घाट घातला. इवान कुझमिच बिचारा साधासीधा, भोळा भाबडा शिपाई गडी होता. त्यानें पुन्हां एकदां पूर्वींचीच बतावणी केली.

‘ हें बघ. वासिलिसा येगोरोवना,’—घसा साफ करून तो म्हणाला,—‘ फादर गेरासिमला ओरेनबुर्गहून कांहीं महत्त्वाची बातमी मिळाली आहे....’ ‘ पुरे झाल्या तुमच्या थापा.’—वासिलिसा येगोरोवना मध्येंच कडाडली.—‘ मला माहित आहे सारं कांहीं. तुम्हांला तुमच्या ऑफिसर लोकांची सभा घ्यायची आहे. आणि पुगाचेवच्या बंडाचा विचार करायचा आहे. या खेपेस मी मुळींच फसणार नाहीं.’ —इवान कुझमिच तिचें तें निकराचें बोलणें ऐकून सर्दच झाला.—‘ ठीक आहे.’ —तो म्हणाला,—‘तुला जर सारं कांहीं माहित आहे, तर मग तूं जातेस तरी कशाला ? तुझ्या समोरच आम्हीं काय तें बोलतों. माझं काय जातं ?’—‘ हें एक बरं बोललांत.’ —ती म्हणाली,—‘ तुम्हांला कांहीं खोटं बोलतां येत नाहीं. बनवाबनवी करायला जमत नाहीं. बोलवा तुमच्या ऑफिसर्सना.’

पुन्हां आमची सभा झाली. आपल्या बायकोच्या हजेरींत इवान कुझमिचनें पुगाचेवचा जाहीरनामा आम्हांला वाचून दाखविला. कोणा अर्धवट शिकलेल्या कझाकानें बहुत करून तो लिहिला असावा. त्या पत्रकांत पुगाचेवनें किल्ल्यावर हल्ला करण्याची धमकी दिली होती. कझाकांना आणि शिपायांना आपल्या पथकांत सामील होण्यासाठीं आवाहन केलें होतें. आणि ऑफिसर्सनीं आपल्या फौजेचा प्रतिकार करूं नये, म्हणून त्यांना ठार करण्याची धमकी दिली होती. पत्रकाची भाषा अडाणी असली, तरी जोरदार होती. आणि भाबड्या माणसांच्या मनावर या भाषेचा भयानक परिणाम झाला असता, यांत शंकाच नाहीं.

'काय बदमाष माणूस आहे.'—कमांडंटची बायको ओरडून म्हणाली,—'आम्हांला धमक्या देतो आहे गुलाम. वा: म्हणे, हात बांधून आम्हीं त्याला शरण जायचं. आणि मुकाट्यानं आमचं निशाण त्याच्या पायावर टाकायचं. नीच कुठचा ! याला कांहीं अक्कल आहे कीं नाहीं ? आम्ही सुद्धां या चाकरींत उणीं पुरीं चाळीस वर्षं घालवलीं आहेत, म्हणावं. आम्ही सुद्धां लढाई पाहिली आहे. या गुंडाच्या धमक्यांना कोणी कमांडर्स दाद देतील, असं मला नाहीं वाटत.'

'तुझं म्हणणं बरोबर आहे.'—इवान कुझमिच म्हणाला,—'पण तो हरामखोर बरेच किल्ले बळकावून बसला आहे, असं म्हणतात.'

'त्याचा फौजफांटा बराच मोठा आहे. त्याचं सुद्धां बळ कांहीं कमी नाहीं.'—श्वाब्रिन म्हणाला.

'त्याचं बळ काय आहे, तें लवकरच कळेल आपल्याला.'—कमांडंट म्हणाला.—'वासिलिसा येगोरोवना, कोठाराची किल्ली दे बघूं...इवान इग्नातिच, त्या बाष्किराला घेऊन ये इकडे. आणि यूलायला पण सांग कीं तुझा हंटर घेऊन ये म्हणावं.'

'थांबा जरा...इवान कुझमिच,'—वासिलिसा येगोरोवना उठून म्हणाली,—'माशाला मी अगोदर घराबाहेर काढतें. किंकाळ्या ऐकून पोर उगीचच घाबरून जाईल...आणि खरं सांगायचं तर तुमची ही उलट तपासणी मला सुद्धां मानवत नाहीं फारशीं...ही मी चाललें. तुमचं काम चालूं द्या !'

त्या दिवसांत न्यायाच्या कामांत गुन्हेगारांचा छळ करण्याची रूढी सर्वत्र होती. आणि ही रूढी इतकें मजबूत मूळ धरून बसली होती कीं तिचा विच्छेद करण्यासाठीं काढण्यांत आलेला हुकुमनामा कित्येक दिवस नुसता कागदावरच राहिला होता. गुन्हेगाराचा गुन्हा उजेडांत आणण्यासाठीं त्याच्याकडून गुन्ह्याची कबूली मोठ्यानें वदवून घ्यावयास हवी, असा त्या काळचा रिवाज होता. अर्थात्‌च आज हें समजण्यासारखें नाहीं. किंबहुना आजच्या न्यायदानाच्या रिवाजाशीं ते विसंगत आहे. गुन्हेगारानें गुन्हा नाकबूल केला, म्हणून जसा तो निर्दोष ठरत

नाहीं; तसाच त्यानें गुन्ह्याची कबूली दिली, म्हणून कांहीं तो गुन्हेगार ठरत नाहीं. हें सरळ आहे. पण आज सुद्धां मला असे पुष्कळ न्यायाधीश माहित आहेत कीं ज्यांना आरोपींचा अमानुष छळ करण्याची प्रथा बंद केल्याबद्दल फार खेद होतो. त्या दिवसांत मात्र न्यायाधीश किंवा आरोपी कोणी या छळाबद्दल ब्र काढीत नसत. आणि म्हणून कमांडंटनें जेव्हां वरील हुकूम दिला, तेव्हां कोणाला त्याचें आश्चर्य वाटलें नाहीं.—किंवा कोणाला मनस्ताप झाला नाहीं. इवान इग्नातिचनें कोठारांतून बाष्किराला तेथें आणलें.—कोठाराची किल्ली वासिलिसा येगोरोवनाजवळ असे.— आणि त्याला कमांडंटच्या समोर उभे करण्यांत आलें.

त्याचे दोन्ही पाय बेडींत जखडलेले होते. त्यामुळें त्याला धड चालतां सुद्धां येत नव्हतें. उंबरा ओलांडून आंत येण्यासाठीं त्याला कोण प्रयास पडले. आपल्या डोक्यावरची उंच टोपी काढून तो दाराजवळ उभा राहिला. त्याच्याकडे बघतां क्षणीं माझें रक्त जसें गोठून गेलें. त्या माणसाचें दर्शन मी कधीं विसरणार नाहीं. त्याचें वय सत्तरीच्या पलिकडे होतें. त्याचे नाक कान कापलेले होते. डोकें भादरलेलें होतें. दाढीमिशांच्या जागीं तुरळक पांढरे केस दिसत होते. त्याचा बांधा लहानसर होता. त्याच्या पाठींत बांक होता. आणि मांस कसें तें त्याच्या अंगावर दिसत नव्हतें. अर्धवट मिटलेल्या त्याच्या डोळ्यांत मात्र धगधगीत तेजाची चमक होती. आरोपीच्या अंगावरील त्या भयाण खुणा पाहून १७४१* च्या बंडांत त्याला शिक्षा झाली असली पाहिजे, हें कमांडंटनें लगेच ओळखलें,—' अरे बेरडा, पूर्वी केव्हां तरी आमच्या सांपळ्यांत तूं सांपडला होतास म्हणायचा.'—त्याच्याकडे बघून कमांडंट म्हणाला.—' म्हणजे बंड करून उठण्याची ही कांहीं तुझी पहिलीच वेळ नाहीं. तुझं डोकं ज्या तऱ्हेनं भादरलेलं आहे, त्यावरूनच हें दिसतंच आहे. असा जवळ ये. हं. तुला इथें कोणीं पाठवलं ?... कोणीं पाठवलं तुला ? '

आरोपीनें यावर हूं कां चूं केलें नाहीं. कमांडंटकडे खुळ्यासारखा बघत तो स्तब्ध उभा होता.—'अरे, बोलत कां नाहींस ?'—इवान कुझमिचनें विचारलें,— ' तुला रशियन येत नाहीं कां ?...यूलाय, तुमच्या भाषेंत विचार त्याला...विचार कीं या ठाण्यावर त्याला कोणीं पाठवलं ? '

यूलायनें कमांडंटचा प्रश्न तातार भाषेंत त्याला पुन्हां विचारला. पण तरी सुद्धां बाष्किर तसाच स्तब्ध उभा होता. तो कांहीं बोलेच ना.

' ठीक आहे. तो बोलत नसेल, तर लवकरच बोलेल.'—कमांडंट म्हणाला. मग शिपायांकडे वळून त्यानें हुकूम सोडला,—' त्याच्या अंगावरचे कपडे

* १७४० मध्यें बाष्किरांनीं उठाव केला होता. झारशाहीनें तो अमानुषपणें चिरडून टाकला. हा उल्लेख या बंडाच्या संदर्भांत आहे.—अनु०

ओरबाडून काढा.' — आणि मग यूलायला त्यानें ओरडून सांगितलें, —' हं उडव फटके. बघतोस काय ?'

त्यासरशीं दोन शिपायांनीं त्याच्या अंगावरचे सारे कपडे ओरबाडून काढले. त्या दुर्दैवी माणसाच्या मुद्रेवर भयाची छटा उमटली. खोडकर मुलांच्या तांवडींत सांपडलेल्या एखाद्या गरीब मुक्या प्राण्याप्रमाणें भेदरलेल्या डोळ्यांनीं त्यानें सगळीकडे पाहिलें. मग एका शिपायानें त्याचे दोन्ही हात मानेमागें करकचून बांधले. आणि त्याची पाठ उघडी केली. यूलायनें हंटर काढला. आणि हवेंत फटकावला. त्यासरशीं बाष्किराच्या ओठांतून कसला तरी विचित्र रडण्यासारखा चीत्कार निघाला. दीनवाणेपणानें खालीं मान घालून, तोंड वासून त्यानें आमच्याकडे पाहिलें. त्याच्या तोंडांत जीभच नव्हती.

हें सर्व मी माझ्या डोळ्यांनीं साक्षात पाहिलें आहे. आणि त्याचें नुसतें स्मरण झालें, तरी सुद्धां झार अलेक्झांडरच्या सौम्य कारकीर्दींत शिक्षणाचा केवढा प्रसार झाला आहे, आणि मानवतेच्या भावना सर्वत्र कशा फैलावल्या आहेत, तें बघून मला मोठें आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. तरुण माणसा, मी लिहिलेली ही गोष्ट जर दैवयोगानें कधीं काळीं तुझ्या वाचनांत आली, तर निदान एक गोष्ट तरी नीट लक्षांत ठेव. चिरकाल टिकणारे आणि उन्नतीकडे नेणारे जे बदल मानव-समाजांत होत असतात, ते कधींहि हिंसक अत्याचारांमुळें घडून येत नाहींत. त्या साठीं नैतिक भावनांची माणसाच्या मनोभूमिकेंत आधीं पेरणी करावी लागते.*

तें करुण दृश्य दिसतांक्षणीं सर्व जण आश्चर्यभरानें जागच्याजागीं खिळल्या-सारखे झाले. —' ठीक आहे.' — कमांडंट म्हणाला, —' तूं बोलणार नाहींस, हें तर दिसतंच आहे. यूलाय, याला कोठारांत घेऊन जा.... आतां सभ्य गृहस्थ हो, आणखी कांहीं महत्वाच्या गोष्टींचा विचार करायला हवा आहे.'

यापुढें चर्चा चालू होणार, तेवढ्यांत वासिलिसा येगोरोवना धांपा टाकीत तेथें आली. तिच्या मुद्रेवर मनस्वी मनस्तापाच्या खुणा उमटलेल्या दिसत होत्या.

---

* सेन्सॉरला चकविण्यासाठीं पुश्किननें उपर्युक्त भावना ग्रिनेवच्या मुखानें वदविल्या आहेत. आणि पुश्किनच्या सामाजिक व राजकीय विचारांशीं त्या सर्वथा विसंगत आहेत. 'झार अलेक्झांडरची सौम्य कारकीर्द' या निर्देशांत उपरोधाचा विखार आहे. झार अलेक्झांडरविषयीं पुश्किनचें मत वस्तुतः काय होतें, तें त्यानेंच झारचें जें चित्र एका कवितेंत रेखाटलें आहे, त्यावरून स्पष्ट होतें. सदर कवितेंत व्यक्त झालेला झार अलेक्झांडरविषयींचा अभिप्राय असा आहे :

' एक दुर्बळ आणि विश्वासघातकी राज्यकर्ता,... टक्कलवाला अकडबाज... नियतीच्या प्रभावामुळें राजवैभवाच्या प्रकाशांत लोळणारा एक मतिमंद, आळशी प्राणि...' — अनु०

‘ काय झालं ? तुला झालं आहे तरी काय ? ’—कमांडंटनें डोळे विस्फारित करून ओरडून विचारलें.

‘ इवान कुझमिच, बातमी फार वाईट आहे.’—वासिलिसा येगोरोवना म्हणाली,—‘लोअर लेकचा किल्ला आज सकाळींच शत्रूनं काबीज केला आहे. फादर गेरासिमचा एक नोकर आत्तांच तिथून आला. किल्ला शत्रूच्या ताब्यांत आहे, हें त्यानें स्वतः आपल्या डोळ्यांनीं पाहिलें. तिथल्या कमांडंटला आणि साऱ्या ऑफिसर लोकांना फांसावर लटकावलं आहे. साऱ्या शिपायांना कैदेंत टाकलं आहे. आतां तें गुंडांचं सैन्य इथें केव्हां येऊन थडकेल, याचा नेम नाहीं.’...त्या अनपेक्षित बातमीनें मला आश्चर्याचा जोरदार धक्का दिला. लोअर लेक किल्ल्याचा कमांडंट माझ्या चांगला ओळखीचा होता. तरुण, पण मोठा शांत, विचारी, सुस्वभावी असा होता तो. दोन महिन्यांपूर्वी ओरेनबुर्गहून तिकडच्या ठाण्यावर जातांना इवान कुझमिचच्या घरीं त्यानें मुक्काम केला होता. लोअर लेक किल्ला आमच्या या ठाण्यापासून पांचपंचवीस ‘वेर्स्त’ असेल नसेल. याचा अर्थ असा कीं आतां कोणत्याहि क्षणाला आमच्या या ठाण्यावर पुगाचेवचा हल्ला होण्याची शक्यता होती. मरीया इवानोवनाची करुण मूर्ति माझ्या डोळ्यांसमोर उभी राहिली. आणि आतां तिच्या भाग्यलेखांत काय लिहून ठेविलें असेल, या विचारांनीं माझ्या चित्ताचा थरकांप झाला. मला एकदम कांहीं सुचेनासें झालें.

‘ इवान कुझमिच,’—मी कमांडंटला सांगितलें,—‘ रक्तांतला शेवटचा थेंब सांडेपर्यंत हा किल्ला लढवायला हवा. तें तर आपलं कर्तव्यच आहे. पण त्याच वेळीं बायकांच्या सुरक्षिततेचा आपल्याला विचार करायला हवा. अजून रस्ता सुरक्षित असेल, तर सर्व बायकांची रवानगी ओरेनबुर्गला करून द्या. खरं म्हणजे त्याहून लांब कुठें बायकांना पाठवतां आलं, तर गुंडांच्या तडाख्यांतून त्या वांचतील तरी. तेव्हां आधीं आपण या तयारीला लागावं, हें बरं.’

आपल्या बायकोकडे वळून इवान कुझमिच म्हणाला,—‘हें बघ, या गुंडांचा पुरता बंदोबस्त करीपर्यंत तुम्ही इथून दूर राहणं फार बरं. तुला काय वाटतं ? ’

‘ उगीच वेड्यासारखं कांहीं तरी बोलूं नका.’—ती म्हणाली.—‘ बंदुकीचा मारा जिथें पोंचणार नाहीं, असा किल्ला जगांत कुठला ? आपलं हें ठाणं सुरक्षित नाहीं कां ? कांहीं नाहीं तरी गेलीं बावीस वर्षं आम्हीं इथें राहतों आहोंत. या पूर्वी बाष्किर आणि किरगीझ टोळ्यांनीं काय कमी उपद्रव दिला ? त्यांचा आपण चांगलाच समाचार घेतला. तसंच पुगाचेवलाहि आपण पुरून उरूं. ’

‘ बरं. बरं. तसं कां होईना. तुला वाटतं ना आपला किल्ला सुरक्षित आहे म्हणून ? ठीक आहे. मग तूं हवी तर इथेंच राहा. पण माशाचं काय ? ’—

कमांडटनें विचारलें,—' आपण पुगाचेवला मारून काढलं किंवा आपल्याला कुमक मिळाली, तर ठीकच आहे. पण समज, त्यानं हा किल्ला घेतला, तर मग ? '

' तर...मग...'—बोलतां बोलतां वासिलिसा येगोरोवना मध्येंच थांबली. आतां मात्र खरोखरच पुढील संकटाच्या कल्पनेनें ती व्याकुळ झालेली दिसली. चित्तांतील अनावर प्रक्षोभ आवरण्याचा ती यत्न करीत होती.

' नाहीं. वासिलिसा येगोरोवना, माशानं यापुढें इथें राहण्यांत कांहीं अर्थ नाहीं.'—कमांडंट म्हणाला. आयुष्यांत कदाचित् पहिल्यांदाच आपल्या बोलण्याचा कांहीं परिणाम होत आहे, असें त्याला वाटलें. —' आपण माशाला ओरेनबुर्गला पाठवून देऊं या. तिच्या दाईजवळ राहील ती. तिथें मोठं सैन्य आहे. दारूगोळा आहे. आणि तिथली तटबंदी चांगली दगडाची भरभक्कम आहे. आणि मला वाटतं, तिच्याबरोबर तूं पण जावंस; हें बरं. तूं आतां म्हातारी झाली आहेस. आणि किल्ला शत्रूच्या हातीं पडला, तर तुझं काय होईल, कोणीं सांगावं ? '

' ठीक आहे. तुमच्या म्हणण्याप्रमाणं होऊं द्या. '—वासिलिसा येगोरोवना म्हणाली,—' आपण माशाला इथून लावून देऊं. पण मला घालवण्याचा विचार मात्र स्वप्नांत सुद्धां आणूं नका. कारण मी मुळींच जाणार नाहीं. आतां या वयांत तुम्हांला सोडून मी दुसरीकडे जाणार नाहीं. आतां दूर कुठं थडग्याच्या शोधांत जायची मला इच्छा नाहीं. आजवर आपण बरोबरच राहिलों. तशी वेळच आली, तर बरोबरच जगाचा निरोप घेऊं. '

' मग हें ठरलं तर.'—कमांडंट म्हणाला.—' आतां उशीर नको. माशाला पाठवायच्या तयारीला लाग. उद्यां सकाळीं आपण तिची रवानगी करून देऊं. बरोबर शिपाई देईन. खरं म्हणजे इथें शिपाई तसे कमीच आहेत. पण माशा कुठें आहे ?'—'ती तिकडे आहे. फादर गेरासिमच्या घरीं.'—वासिलिसा येगोरोवना म्हणाली,—' लोअर लेक किल्ला शत्रूच्या हातीं पडला आणि तिथल्या कमांडंटला पुगाचेवनं फांसावर लटकावलं, तें सारं तिला कळलं आहे. ती बातमी ऐकल्याबरोबर ती बेशुद्ध पडली. तिची तब्येत कांहीं बरी दिसली नाहीं. देवाची इच्छा असेल, तसं होईल.'—असें म्हणून वासिलिसा येगोरोवना तेथून निघून गेली. आणि आपल्या मुलीला निरोप देण्याच्या तयारीला ती लागली. ती गेल्यावर आमची सभा तशीच पुढें चालू झाली. पण मग मात्र त्या पुढच्या चर्चेंत मी मुळीं सुद्धां भाग घेतला नाहीं. इतर कोण काय बोलत होते, तिकडे पण माझें लक्ष नव्हतें. रात्रीं जेवायच्या वेळीं मरीया इवानोवना घरीं परत आलेली दिसली. तिचे डोळे रडून सुजले होते. लाल झाले होते. आणि कसलें म्हणून त्राण तिच्या गात्रांत राहिलेलें नव्हतें. जेवतांना कोणी कांहींच बोललें नाहीं. जेवणहि रोजच्यापेक्षां लवकरच संपलें. नंतर आम्हीं सर्वजण

तिथून उठलों. आणि कमांडंटचा निरोप घेऊन आपापल्या ठिकाणीं गेलों. पण माझी तलवार मी बुद्धयाच मागें ठेवून आलों होतों. ती घेण्याच्या मिषानें मी परत कमांडंटच्या घरीं गेलों. माझी अशी कल्पना होती कीं त्या वेळीं माशाची एकांतांत गांठ घेतां येईल. मी गेलों तर, ती दारांतच उभी होती. तिनें तलवार माझ्या हातांत दिली. —'बरं आहे, प्योत्र आंद्रेइच,'—रडत रडत ती म्हणाली,—'मी ओरेनबुर्गला जाणार आहे. तुला उदंड औक्ष मिळो. सुखांत रहा तूं. देवाच्या मनांत असेल, तर कदाचित् पुन्हां केव्हां आपली भेट होईल. आणि तसं झालं नाहीं, तर......'—पुढें तिला बोलवेना. तिचे हुंदके अनावर झाले. मी तिला बाहुपाशांत घेतलें,—'बरं आहे, लाडके, येतों मी. आतां यापुढें माझं काय व्हायचं असेल तें होईल. पण एक गोष्ट लक्षांत ठेव. शेवटीं मी तुझीच आठवण काढीन. आणि शेवटची प्रार्थना करीन, ती सुद्धां तुझ्यासाठींच.'—माझ्या छातीवर डोकें टेकून माशा रडत होती. भावनावेगानें मी तिचें चुंबन घेतलें. आणि मग मात्र क्षणाचा सुद्धां विलंब न लावतां घाईघाईनें घराबाहेर पडलों.

# प्रकरण सातवें

## हल्ला

अरे माझ्या देहा, शिपायाच्या देहा,
काय तुझी चहा ?
तेत्तिस वर्षे तुझें जिणें
रणांगणावर लढणें, लढणें.
काय मिळालें लढून मर्दा,
कीर्ति ? पैका ? बातच सोडा !

काय मिळाली माया ? प्रीति ?
छे: छे: मग कां निदान बढती ?
काय बोलतां राव असे ?
शिपाईपेशा माहित नसे ?
फांदी झाडाची, दोरी फांशीची
दौलत देहाची, शिपाई बाण्याची !

—लोकगीत

त्या दिवशीं रात्रीं मला मुळींच झोंप आली नाहीं. अंगावरचे कपडे सुद्धां मी उतरले नाहींत, कारण दुसऱ्या दिवशीं भल्या पहांटे मरीया इवानोवना जाणार होती. आणि तिला शेवटचा निरोप देण्यासाठीं म्हणून मी किल्ल्याच्या वेशीवर जाण्याचें ठरविलें होतें. माझ्या वृत्तींत आतां बराच बदल झाला होता. माझ्या मनांत जी खिन्नता ठाण मांडून बसली होती, तिच्यापेक्षां आजचा हा मनस्ताप सहन करणें सोपें होतें. आम्ही एकमेकांचा निरोप घेणार होतों. तेव्हां विरहाची कळ सोसणें भाग होतें. पण त्याचबरोबर भविष्याची अंधुक पण गोड आशाहि मनांत जागी होती. यापुढें पुष्कळच सहन करावें लागणार होतें. पण पराक्रम करून दाखविण्याची आणि नांव मिळविण्याची ही एक संधि होती. कळत न कळत रात्र निघून गेली. आणि बाहेर पडण्याच्या विचारांत मी होतों. तेवढ्यांत एक कॉर्पोरल आंत आला. त्यानें सांगितलें कीं, किल्ल्यांतील सर्व कझाक सैनिक रातोरात किल्ला सोडून निघून गेले. आपल्या बरोबर यूलायलाहि त्यांनीं बळेंच ओढून नेलें. आणि किल्ल्याच्या आसपास टेहळ्यांची वर्दळ सुरू झाली आहे. म्हणजे मरीया इवानोवना वेळेवर किल्ल्यांतून बाहेर पडूं शकत नव्हती. या विचारानें मी खचलों. तांतडीनें मी त्या कॉर्पोरलला कांहीं सूचना दिल्या. आणि कमांडंटच्या घराकडे निघालों. पूर्व दिशेला फटफटत होतें. रस्त्यानें बेभानपणानें धांवत पळत मी चालल़ों होतों. मध्येंच माझ्या नांवानें कोणी तरी हांक मारलेली मी ऐकली. मी थबकून उभा राहिलों.—'तुम्हीं कुठं निघालांत ?'—इवान इग्नातिचनें विचारलें. —'कमांडंट तटबंदीची पाहणी करण्यासाठीं घरांतून बाहेर गेला आहे. तुला पण त्यानें

तिकडेच बोलावलं आहे. पुगाचेव आला आहे.'—' पण काय रे, मरीया इवानोवना गेली कीं नाहीं ? '—धडधडत्या छातीवर हात दाबून मी विचारलें.—' ती कशाची जाते ? '—इवान इग्नातिच म्हणाला.—' फार उशीर झाला. ओरेनबुर्गचा रस्ता शत्रूनं रोखून धरला आहे. किल्ल्याला चारी बाजूनीं वेढा पडला आहे. प्योत्र आंद्रेइच, एकूण लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं. '

मग आम्ही दोघेहि तटबंदीच्या रोखानें निघालों. निसर्गानें बांधलेल्या उंचवट्यावर कठडे घालून तटबंदी तयार करण्यांत आली होती. तिकडे अगोदर-पासूनच गांवकऱ्यांची झुंबड उडाली होती. किल्ल्यांतील सर्व शिपाई रांगा करून शिस्तींत उभे होते. आतां त्यांच्या हातांत बंदुका दिसत होत्या. वेशीवरची तोफ रातोरात तेथें आणून ठेवलेली होती.

आपल्या लहानशा सैन्याच्या आजूबाजूला कमांडंट फेऱ्या घालीत होता. एक नवाच उत्साह त्याच्या हालचालींत संचारलेला दिसला. आणि लढाईच्या वेळीं ज्या शक्तीचा संचार योद्ध्याच्या नसांनसांतून होतो, त्या शक्तीनें त्याला भारून टाकलें होतें. पलिकडच्या गवताळ मैदानांतून पांच पंचवीस घोडेस्वार टेहळणी करतांना दिसत होते. त्यांच्यापैकीं बहुतेक सर्वजण कझाक होते. कांहीं थोडे बाष्किर पण होते. त्यांच्या लोकरीच्या उंच टोंकदार टोप्या व पाठीवरील बाणांचे भाते, यांजमुळें ते उमटून पडत होते. कमांडंटनें आपल्या सैनिकांची पाहणी केली. आणि मग त्यांना उद्देशून तो म्हणाला, —' गड्यांनो, महाराणीचें रक्षण करण्याची ही संधि सुदैवानं आपल्याला प्राप्त झाली आहे. आम्ही राजनिष्ठ आणि शूर सैनिक आहोंत, हें सर्व जगाला दाखवून देण्याची हीच वेळ आहे.'—कमांडंटच्या त्या भाषणानें सैनिकांना चेव चढला. आणि मोठमोठ्यानें ओरडून त्यांनीं आपला उत्साह व्यक्त केला. श्वाब्रिन माझ्याजवळच बाजूला उभा होता. त्याची नजर शत्रु-सैन्यावर खिळलेली होती. हा वेळपर्यंत बाहेरच्या गवताळ मैदानांत इकडेतिकडे रेंगाळणारे घोडेस्वार किल्ल्यावरची हालचाल पाहून एका ठिकाणीं एकत्र जमले होते. बहुत करून त्यांच्यांत एकंदर परिस्थितीची चर्चा सुरू झाली असावी. कमांडंटनें इवान इग्नातिचला बोलावून घेतलें. आणि बंडखोरांच्या रोखानें तोफेचें तोंड वळविण्यास त्याला सांगितलें. नंतर पहिली बत्ती त्यानें स्वतः दिली. शत्रूंच्या डोक्यावरून तोफेचा गोळा भिरभिरत कोठें तरी दूर जाऊन पडला. मैदानांत घोंटाळणारे घोडेस्वार दौडत तेथून एकदम नाहींतसे झाले. आणि क्षणार्धांत आजूबाजूचे मैदान निर्मनुष्य झालें.

तेवढ्यांत वासिलिसा येगोरोवना तेथें येऊन पोंचली. तिच्या मागोमाग माशा पण आली. ती आपल्या आईला सोडावयास तयार नव्हती.—' काय ? कसं काय चाललं आहे ? लढाई काय म्हणते आहे ? शत्रू कुठें आहे ?'—तिनें विचारलें.—' शत्रू कांहीं फार दूर नाहीं. '—इवान कुझमिच शांतपणानें म्हणाला,—' देवाच्या

दयेनं सारं कांहीं ठीक होईल. काय माशा, तूं कशाला आलीस इथें? भय वाटतं, होय ना?'—'नाहीं. तसं नाहीं.'—मरीया इवानोवना म्हणाली,—'घरांत एकटीनं बसायचंच मला जास्त भय वाटतं.'—बोलतां बोलतां तिची नजर माझ्याकडे वळली. आणि लगेच ओंठावर हंसूं आणण्याचा तिनें बळेंच यत्न केला. काल तिनें जणुं माझ्या प्रियतमेच्या रक्षणासाठींच माझ्या हातांत तलवार दिली होती, याचें स्मरण होऊन मी न कळत तलवारीची मूठ आवळून धरली. मला त्वेष चढला. मी तिचा रक्षणकर्ता आहे, अशी माझ्या मनानें कल्पना करून घेतली. आणि तिनें माझ्यावर टाकलेला विश्वास अनाठायीं नाहीं, हें सिद्ध करण्यासाठीं निर्णायक क्षणाची मी अधीरतेनें वाट पाहूं लागलों.

बघतां बघतां समोरच्या मैदानांत जवळच घोडेस्वारांचा एक मोठा घोळका जमलेला दिसला. आणि थोड्याच वेळांत सारें मैदान जसें घोडेस्वारांनीं फुलून गेलें. त्यांच्यापैकीं कोणाच्या हातांत भाले होते. तर कोणाच्या हातीं तीरकमठे होते. त्या घोळक्यांत एका पांढऱ्या शुभ्र उमद्या घोड्यावर बंडवाल्यांचा पुढारी पुगाचेव दिसत होता. त्याच्या अंगावर भडक किरमिजी झगा होता. आणि त्याच्या हातांतील नागवी तलवार चमकत होती. तो तेथें येतां क्षणीं मैदानभर पांगलेले सारे घोडेस्वार त्याच्या भोंवतालीं लगेच गोळा झाले. आणि मग त्याच्याच आज्ञे-वरून चार घोडेस्वार दौडत किल्ल्याच्या रोखानें भरधांव निघालेले दिसले. ते जवळ आले, तेव्हां आम्ही त्यांना तात्काळ ओळखलें. काल रातोरात किल्ल्यांतून पळून गेलेले ते दगाबाज सैनिक होते. त्यांच्यापैकीं एकानें हातांत कसला तरी कागद डोक्यावर उंच धरलेला होता. दुसऱ्या एकाच्या हातांतील भाल्याच्या टोंकावर यूलायचें मुंडकें खोंचलेलें दिसलें. तटबंदीच्या जवळ येऊन पोंचल्यावर त्या स्वारानें नेम धरून मुंडकें हवेंत उडवलें. आणि त्या दुर्दैवी काल्मिक सैनिकाचें तें मुंडकें नेमकें कमांडंटच्या पायांजवळ येऊन पडलें. तटबंदीच्या पलिकडे कांहीं अंतरावर घोडे रोखून ते हरामखोर सैनिक मोठमोठ्यानें ओरडत होते.—'गोळया चालवूं नका. झार इथें आला आहे. झारला येऊन मिळा.'

'मी तुम्हांला झार दाखवतों.'—इवान कुझमिचनें ओरडून त्यांना सांगितलें. आणि मग त्यानें तोफ चालूं करण्याचा हुकूम सोडला. आमच्या सैनिकांनीं शत्रूंवर गोळयांचा भडिमार केला. कागद डोक्यावर धरून आलेला तो कझाक सैनिक घोड्यावरून खालीं कोसळलेला दिसला. आणि उरलेले तिघे आले, तसे भरधांव दौडत निघून गेले. मग मरीया इवानोवनाकडे माझी नजर वळली. यूलायचें रक्ताळलेलें मुंडकें बघतां क्षणीं तिला काय झालें असेल, त्याची कल्पना न सांगतां होण्यासारखी आहे. तशांत पुन्हां गोळयांचा भडिमार तिनें पाहिला. दोन्ही कानांवर हात दाबून धरून ती जागच्याजागीं उभी होती. असह्य भयानें ती जशी जमिनीला खिळली होती. कमांडंटनें एका शिपायाला जवळ बोलावलें. आणि मरून पडलेल्या कझाक

घोडेस्वाराच्या हातांतील कागद घेऊन येण्यास फर्मावलें. तो सैनिक दौडत मैदानांत गेला. आणि परत येतांना मेलेल्या कझाकाचा घोडा घेऊन परत आला. कझाकाच्या हातांतील पत्र त्यानें कमांडंटच्या हातीं दिलें. इवान कुझमिचनें त्या पत्रावरून एकदां नजर फिरवली. आणि मग तें पत्र फाडून टाकलें. एवढें सारें होत आहे, तोपर्यंत समोरच्या मैदानांत बंडखोरांचें सैन्य लढाईच्या तयारीनें खडें झालेलें दिसलें. थोड्या वेळानें त्यांच्या बाजूनें गोळयांचा भडिमार सुरू झाला. कांहीं गोळया आमच्या कानांजवळून सणसणत पलिकडे जाऊन पडल्या. कांहीं बाण जमिनींत रुतून बसले. हें सारें क्षणार्धांत घडलें. आणि मग कमांडंट ओरडून म्हणाला,—‘ वासिलिसा येगोरोवना, इथें लढाई चालली आहे. तुझं आतां इथें कांहीं काम नाहीं. अगोदर माशाला घेऊन घरीं जा बघूं. तिच्याकडे बघ एकदां. कशी दिसते आहे ती. ’

वासिलिसा येगोरोवना गोळयांच्या भडिमारानें आधींच मनांतून हबकून गेली होती. जाण्यापूर्वी तिनें एकदां शत्रूच्या दिशेनें पाहिलें, तर तेथें एकच गर्दी उडालेली दिसत होती. कमांडंटकडे वळून ती म्हणाली,—‘ इवान कुझमिच, आतां सारं कांहीं देवाच्या हातीं आहे. तारणारा मारणारा तोच एक आहे. माशाला तुमचा आशीर्वाद द्या. माशा बाळ, त्यांच्याजवळ जा बघूं. ’

माशा हळूं हळूं कशी तरी आपल्या बापाजवळ जाऊन उभी राहिली. भयानें ती थरथर कांपत होती. तिनें जमिनीवर गुडघे टेकले. आणि मस्तक नमवून आपल्या पित्याचा तिनें आशीर्वाद मागितला. तिच्या वयोवृद्ध पित्यानें प्रेमभरानें तिच्या तोंडावरून हात फिरविला. आणि तिच्या अंगावरून क्रूसाची खूण करून त्यानें तिला मनःपूर्वक आशीर्वाद दिला. मग तिचे हात धरून त्यानें तिला वर उठविलें. आणि प्रेमभरानें तिचें चुंबन घेतलें. तिच्या पाठीवरून हात फिरवीत मृदु स्वरांत तो म्हणाला,—‘ जा बेटा, देव तुला सुखांत ठेवील. त्याची प्रार्थना कर. तोच एक संकटांपासून तुझें संरक्षण करील. यापुढें कधीं एखादा उमदा माणूस भेटला, तर तूं त्याच्याशीं लग्न कर. आणि सुखांत रहा. तुझ्या आईनं माझ्याबरोबर जसा सुखानं संसार केला, तसाच तूंहि त्याच्याबरोबर सुखानं संसार कर. माशा, बेटी, जा तूं आतां. वासिलिसा येगोरोवना, आतां माशाला इथून लवकर घेऊन जा पाहूं ! ’—माशाला रडें आवरेना. त्याच्या खांद्यावर डोकें टेंकून ती स्फुंदून स्फुंदून रडावयास लागली. ‘ आपणहि एकमेकांचें चुंबन घेऊं या. ’—रडत रडत कमांडंटची बायको म्हणाली,—‘ येतें हं आतां. इवान कुझमिच, येते आतां. मी कधीं चुकलें असेन, तर मोठ्या मनानं मला क्षमा करा. ’—‘ या आतां. या. ’—आपल्या वृद्ध पत्नीचें चुंबन घेऊन, तिला कवटाळून कमांडंट म्हणाला,—‘ पुरें आतां. आधीं घरीं जा. आणि वेळ मिळाला तर माशाच्या अंगावर साराफानचा पोशाख चढव. जा.

देव तुमचं रक्षण करील.'—शेवटीं मोठ्या कष्टानें मायलेकी परत फिरल्या. मरीया इवानोवनाकडे मी टक लावून पाहत होतों. जातां जातां मागें वळून तिनें पण माझ्याकडे पाहिलें. आणि मान हलविली. मग एकदम इवान कुझमिच आमच्याकडे वळून भराभर हुकूम सोडावयास लागला. आतां मात्र शत्रूंच्या हालचालींवर त्याचें अवघें लक्ष खिळलें होतें. सर्व बंडखोर आपल्या पुढाऱ्याच्या भोंवतीं गोळा होत होते. क्षणभरानें ते सर्वजण घोड्यावरून उड्या टाकून खालीं उतरले. त्यासरशीं कमांडंटनें ओरडून हुकूम सोडला,—'हं. आतां जागचे हलूं नका. शत्रू हल्ला करणार आहे.'—तें खरेंच होतें. क्षणार्धांत सारें वातावरण त्यांच्या भयंकर आरड्याओरड्यानें भरून गेलें. सर्व शक्ति एकवटून आमच्या किल्ल्याच्या रोखानें बंडखोर धांवत सुटले होते. तोफेंत दारुगोळा ठांसून भरलेला होता. आणि तोफेचें तोंड खालीं वळविलेलें होतें. शत्रूचे सैनिक जवळ येईपर्यंत शांतपणानें कमांडंटनें वाट पाहिली. आणि मग माऱ्याच्या आवाक्यांत शत्रू आला आहे, असें दिसतां क्षणीं त्यानें तोफेला बत्ती दिली. तोफेचा गोळा अचूक शत्रुसैन्याच्या मधोमध पडला. त्या भयानक स्फोटानें बंडखोरांची दाणादाण उडाली. वाट फुटेल तिकडे ते पळत सुटले. फक्त त्यांचा पुढारी तेवढा जागच्या जागीं उभा होता... चौफेर पळणाऱ्या सैनिकांना धीर देऊन त्यांना आपल्या जवळ बोलावीत होता... हातांतील तलवार उंच धरून सर्व शिपायांना हल्ला करण्यासाठीं खुणावीत होता. क्षणभर बंद पडलेला आरडाओरडा दुप्पट जोरानें सुरू झाला.—'हं बघा गड्यांनो, आतां तुमची परीक्षा आहे.'—कमांडंट आवेशानें म्हणाला,—'दरवाजा उघडा. आणि नगारे वाजवा. चला माझ्या मागोमाग. चला.'

आणि लगेच कमांडंट, इवान इग्नातिच आणि मी तटबंदी ओलांडून बाहेरच्या मैदानांत आलों. पण तरी सुद्धां शिबंदीचे शिपाई जागेवरून हलण्याचें चिन्ह दिसेना. भयानें ते जसे जागच्या जागीं खिळले होते.—'अरे, तुम्ही अजून तिथेंच उभे कां?'—इवान कुझमिच ओरडला,—'आपण मरणारच आहोंत, तर मग मरूं या. शिपायांच्या नशिबांत हेंच असतें.'—तेवढ्यांत चहूबाजूंनीं शत्रूंच्या सैन्यानें उठाव केला. आणि हां हां म्हणतां तीरासारखे आमच्या अंगावरून ते किल्ल्यांत घुसले. नगाऱ्यावरची थाप क्षणार्धांत बंद पडली. आणि आमच्या सैनिकांनीं हातांतील बंदुकी धडाधड जमिनीवर फेंकून दिल्या. त्या घनचक्कर हलकल्लोळांत मी खालीं पडलों. पण पुन्हां उठून मी बंडखोरांबरोबर किल्ल्यांत शिरलों. कमांडंटच्या डोक्याला जखम झाली होती. शत्रूंच्या गुंडांनीं त्याला चौफेर वेढलें होतें. आणि एकच गलका करून ते त्याच्याजवळ किल्ल्या मागत होते. कमांडंटच्या मदतीसाठीं जाण्याचा मी प्रयत्न केला. पण ताकदवान कझाकांनीं मला पकडून ठेवलें. आणि आपल्या कमरपट्ट्यांनीं मला आवळून बांधलें. ते ओरडले,—'झारच्या शत्रूंना काय शिक्षा भोगावी लागते, तें आतां तुला कळेलच.'—मग आम्हांला धरून, बांधून गांवांतील रस्त्यांवरून

फरफटत ओढीत नेलें. हातांत ब्रेड आणि मीठ घेऊन गांवकरी घरांतून बाहेर आले. चर्चमधील घंटा खणखणून वाजावयास लागल्या.—झार चौकांत आला आहे. कैद्यांना राजनिष्ठेची शपथ देण्यासाठीं तो चौकांत थांबला आहे—असा एकच आरडाओरडा गर्दीतून उठला. लगेच लोकांचे घोळके चौकाकडे लोटले. आणि आम्हांला पण तिकडेच ओढून नेण्यांत आलें.

कमांडंटच्या घराच्या पोर्चमध्यें भल्या मोठ्या आरामखुर्चीत पुगाचेव बसला होता. त्याच्या अंगावर लालभडक कझाक झगा होता. झग्यावर जरतारी कलाबतू विणलेली होती. चकचकीत गोंडे लावलेली काळीभोर उंच टोपी त्यानें आपल्या लखलखणाऱ्या डोळ्यांवर तिरकस ठेवली होती. त्याचा चेहरा मला ओळखीचा वाटला. वृद्ध कझाक सैनिक त्याच्या अवतींभंवतीं गर्दी करून होते. पोर्चसमोरच्या कट्ट्यावर फादर गेरासिम हातांत क्रूस घेऊन उभा होता. त्याची रया पार लोपलेली होती. भयानें त्याचा थरकांप झालेला होता. पुगाचेवसमोर जे गुन्हेगार आणण्यांत येणार होते, त्यांच्यासाठीं मनांतल्या मनांत तो देवाची प्रार्थना करीत असावा, असें वाटलें. समोरच्या चौकांत वधस्तंभ घाईघाईनें रोवले जात होते. आम्ही तेथें पोंचल्याबरोबर बाष्किरांनी बघ्यांची गर्दी मागें हटविली. आम्हांला पुगाचेवसमोर उभे करण्यांत आलें. चर्चमधील घंटानाद एकदम थांबला. आणि सगळीकडे स्तब्ध शांतता पसरली.—'यांच्यापैकीं कमांडंट कोण आहे ?'—त्या तोतया झारनें धमकावून विचारलें. लोकांच्या गर्दीतून आमचा सार्जंट एकदम पुढें आला. आणि त्यानें इवान कुझमिचकडे बोट दाखविलें. कमांडंटकडे एक जळजळीत कटाक्ष टाकून पुगाचेवनें विचारलें,–'तुझ्या या झारला विरोध करायची हिंमत तरी कशी झाली तुला ? '—जखमेंतील रक्तस्रावामुळें अशक्त झालेल्या कमांडंटनें उरलीसुरली सारी शक्ति एकवटून निश्चयाच्या स्वरांत उत्तर दिलें,—'तूं कांहीं माझा झार नाहींस. जरा नीट ऐकून घे. तूं चोर आहेस. तोतया आहेस. समजलास ?'—कमांडंटचें तें बोलणें ऐकून पुगाचेवचा राग एकदम अनावर झाला. आणि हातांतला पांढरा रुमाल हलवून त्यानें कसली तरी खूण केली. क्षणार्धांत आजूबाजूचे कझाक म्हाताऱ्या कमांडंटवर तुटून पडले. आणि त्यांनीं त्याला धक्के मारीत वधस्तंभाजवळ नेलें. ज्याची आम्ही कालच उलट तपासणी केली होती, तो नाक कान छाटलेला बाष्किर वधस्तंभाच्या दांड्यावर पाय सोडून बसला होता. त्याच्या हातांत फांसाची दोरी होती. आणि एका मिनिटभरांत कमांडंटचें शव फांसावर लटकत असलेलें माझ्या दृष्टीस पडलें. नंतर इवान इग्नातिचची पाळी आली. त्याला पुगाचेवसमोर खेचण्यांत आलें. पुगाचेवनें त्याला ओरडून सांगितलें—'राजनिष्ठेची शपथ घे. मी झार प्योत्र फयोदोरोविच तुला फर्मावतों आहे.'—'तूं कांहीं आमचा झार नाहींस.'—कमांडंटचेच शब्द इवान इग्नातिचच्या मुखांतून बाहेर पडले,—'तूं चोर आहेस. तोतया आहेस.'—पुगाचेवनें हातांतील पांढरा रुमाल पुन्हां एकदां हलवला. आणि त्या इमानी लेफ्टनंटचा देह कमांडंटच्या शवाशेजारीं लटकूं लागला.

आणि मग माझी पाळी आली. धीर एकवटून शांतपणानें मी पुगाचेवकडे रोखून पाहिलें. आणि माझ्या उदात्त हृदयाच्या सहकाऱ्यांचे शब्द उच्चारण्याची मी तयारी केली. पण तेवढ्यांत मला आश्चर्याचा जबरदस्त धक्का देणारी एक विलक्षण घटना घडली. पुगाचेवच्या आजूबाजूला बंडखोरांचे जे पुढारी कडें करून उभे होते, त्यांच्यांत श्वाब्रिन पण मला दिसला. त्याच्या अंगावर कझाक झगा होता. आणि कझाकांच्या चालीप्रमाणें त्यानें आपले केस कापून घेतलेले दिसले. तो लगेच पुगाचेवजवळ गेला. आणि त्याच्या कानांत कांहीं तरी पुटपुटला.—'याला पण फांसावर लटकावून द्या. '—पुगाचेव म्हणाला. त्यानें माझ्याकडे बघितलें सुद्धां नाहीं. माझ्या गळ्यांत फांस अडकविण्यांत आला. मनांतल्या मनांत मी देवाची प्रार्थना सुरू केली. त्याची करुणा भाकली. केल्या सवरल्या पापांबद्दल क्षमा मागितली. आणि जे मला प्रिय होते, त्यांना सुखी ठेव, म्हणून मी देवाला विनविलें. मला वधस्तंभाकडे खेंचून नेण्यांत आलें,—'भिऊं नकोस. '—म्हणून माझे मारेकरी एकसारखे मला सांगत होते. कदाचित् मला धीर देण्याचा हेतु खरोखरच त्यांच्या मनांत असेल. तेवढ्यांत एक किंकाळीं माझ्या कानांवर पडली.— 'थांबा. दुष्टांनो ! थांबा...'—बघितलें, तर मारेकरी खरोखरच थांबले होते. काय झालें, म्हणून बघण्यासाठीं मी इकडे तिकडे पाहिलें. तर सावेलिच पुगाचेवच्या पायां पडून त्याची करुणा भाकीत होता.—'दया करा माबाप,' माझा दुर्दैवी शिक्षक ओरडून म्हणाला,—'माझ्या धन्याच्या या जवान पोराचा कां जीव घेतां ? त्याला सोडून द्या. त्याचा बाप हवे तेवढे पैसे देईल तुम्हांला. लोकांना जरब बसविण्यासाठीं म्हणून कोणाला फांशींच द्यायचं असेल, तर त्याच्या-बद्दल मला म्हाताऱ्याला फांशीं द्या. '—पुगाचेवनें पुन्हां कसली तरी खूण केली. आणि लगेच कझाकांनीं माझ्या काढण्या काढून घेतल्या.—'जा तूं. आमच्या झारनं तुला क्षमा केली आहे.'—त्यांनीं मला सांगितलें. माझी सुटका झाली, म्हणून मला मोठा आनंद झाला, अशांतला भाग नाहीं. सुटकेचें दुःख वाटलें, असें पण नाहीं. खरें म्हणजे सुटकेच्या त्या क्षणाला मला नक्की काय वाटलें, तें आतां स्मरत नाहीं. माझ्या मनांत एकच गोंधळ उडाला होता. नंतर त्या कझाकांनीं मला घेरलें. आणि पुन्हां तोतयासमोर नेऊन गुडघे मोडून बसावयास लावलें. पुगाचेवनें आपला पीळदार हात माझ्या पुढ्यांत पसरला.—'झारच्या हाताचं चुंबन घे,'—म्हणून एकदम सर्व बाजूंनीं आरडाओरडा झाला. पण अशी लाजिरवाणी शरणागति पत्करण्यापेक्षां कसलाहि छळ आणि कसलेंहि भयंकर मरण मी सुखानें पत्करलें असतें.—'प्योत्र आंद्रेइच, धनी,'—म्हणून सावेलिचनें मला हांक मारली. बघितलें तर माझ्याजवळच बाजूला तो उभा होता. माझ्या पाठीवर हात ठेवून तो हळूंच म्हणाला,—'आतां उगाच भलता हट्ट करूं नका. तुमचं त्यांत काय जातं मोठंसं ? एकदां जमिनीवर थुंका. आणि मग लगेच या बद—म्हणजे त्याच्या हाताचं चुंबन घ्या.'—पण मी

जागचा हललों नाहीं. अखेरीस पुगाचेवनें आपणहून आपला हात मागें घेतला. आणि उपरोधानें तो मला म्हणाला,—'आनंदामुळें महाराजांना वेड लागल्या-सारखं दिसतं आहे. उभे करा त्यांना.'—कझाकांनीं बखोटे धरून मला उभे केलें. आणि सोडून दिलें. आतां त्या भयानक नाटकाचा पुढचा प्रयोग पाहणें मला शक्य झालें होतें.

गांवकरी लोक राजनिष्ठेची शपथ घेत होते. एक एक जण पुढें येत होता. क्रूसाचें चुंबन घेत होता. आणि त्या तोतया झारला नम्रपणानें अभिवादन करीत होता. शिबंदींतील शिपाई या सर्व प्रकारांत सामील झालेले दिसले. बाजूलाच रेजिमेंटमधील दर्जी हातांत आपली बोथटलेली कात्री घेऊन उभा होता. आणि तो आमच्या शिपायांचे लांबसडक केस कात्रीनें कापीत होता. एक एक जण पुढें सरत होता. आणि पुगाचेवच्या हाताचें चुंबन घेत होता. पुगाचेवनें त्या सर्वांना केल्या गुन्ह्याची माफी दिली. आणि त्यांना आपल्या टोळींत सामील करून घेतलें. राजनिष्ठेच्या शपथविधीचा हा सोहळा जवळजवळ तीन तास चालला होता. अखेरीस पुगाचेव आपल्या खुर्चीवरून उठला. आणि वडीलधाऱ्या कझाकांच्या घोळक्यांत पोर्चमधून बाहेर पडला. त्याच्यासाठीं एक पांढरा शुभ्र घोडा तेथें तयार होता. घोड्यावर मौल्यवान साज चढविण्यांत आला होता. दोन कझाक सैनिकांनीं पुगाचेवचे बखोटे धरलें. आणि त्याला घोड्याच्या पाठीवर अलाद झोकून दिलें. फादर गेरासिमला त्यानें सांगितलें कीं मी आज तुमच्याकडे जेवायला येईन. तेवढ्यांत कोठून तरी एका स्त्रीची किंकाळी ऐकूं आली. कांहीं कझाक गुंड वासिलिसा येगोरोवनाला ओढीत तेथें आणीत होते. तिचे केस विस्कटलेले होते. आणि तिच्या अंगावर नांवाला सुद्धां कपडा नव्हता. त्या गुंडांपैकीं एकानें तर तिचें जाकिट आपल्या अंगावर चढविलें होतें. इतर गुंड तिच्या घरांतील सामान सुमान—गाद्या, कपाटें, चहाचें सामान, वस्त्रें प्रावरणें— वगैरे बाहेर ओढून काढीत होते. ती दुर्दैवी म्हातारी एक सारखी किंचाळत होती—'अरे, मला सुखानं मरूं द्या. माझ्यावर दया करा. मला इवान कुझमिचकडे घेऊन चला.'—आणि एकदम वधस्तंभाकडे तिचें लक्ष गेलें. आपल्या पतीचा मृत देह तिनें ओळखला.—'दुष्टांनो, हें काय केलंत?'—संतापानें बेभान होऊन ती ओरडली,—'इवान कुझमिच, प्रशियनांचे भाले आणि तुर्कांच्या गोळ्या तुम्हांला स्पर्श करूं शकल्या नाहींत. लढतां लढतां तुम्हांला वीराचं मरण लाभलं नाहीं. पण या पळपुट्या चोरांच्या हातीं तुम्हांला मरण आलं.'—'या थेरडीची बडबड बंद पाडा पाहूं.'—पुगाचेव म्हणाला. त्यासरशीं एका जवान कझाकानें तिच्या डोक्यावर तलवारीचा वार केला. म्हातारी आपल्या घराच्या पायऱ्यांवर मरून पडली. पुगाचेव तेथून निघाला. आणि लोक त्याच्या मागोमाग धांवत सुटले.

---

# प्रकरण आठवें

*अनाहूत-पाहुणा*



" अनाहूत पाहुणा म्हणजे तातेर माणसापेक्षांहि फार भयंकर."

—**म्हण**

चौकांत आतां चिटपांखरूं सुद्धां नव्हतें. सुन्न होऊन मीं जागच्या जागीं उभा होतों. माझ्यासमोर घडलेल्या भयानक घटना बघून मी अगदीं गोंधळून गेलों होतों.

मरीया इवानोवनाचें काय झालें असेल, त्याचीच मला अतिशय काळजी लागली होती. तिला लपून बसणें शक्य झालें असेल काय ? तिची लपण्याची जागा सुरक्षित असेल काय ? अशा अनेक चिंताजनक विचारांनी माझ्या मनांत गर्दी करून सोडली होती. तशाच स्थितींत मी कमांडंटच्या ऑफिसमध्यें गेलों. ऑफिसची एक खूण म्हणून तेथें धड राहिलेली दिसली नाहीं. खुर्च्या, टेबलें, कपाटें, लाकडाचें म्हणून जें जें कांहीं होतें, त्याची मोडतोड करण्यांत आली होती. चिनी मातीचीं भांडीं फुटलेलीं होतीं. जें जें म्हणून नेण्यासारखें होतें, तें तें लुटारूंनीं लंपास केलें होतें. बाजूच्या जिन्यानें मी वर गेलों. आणि आयुष्यांत पहिल्यांदांच मरीया इवानोवनाच्या खोलींत शिरलों. तिच्या खाटेवरील सर्व सामान गुंडांनीं धुंडाळलें होतें. कपाटें फोडून आंतील चीजवस्त दरोबस्त चोरांनीं धुवून नेली होती. भिंतीवरील देव्हाऱ्याखालीं दिवा अजून जळत होता. क्रूसमात्र जागेवर नव्हता. दोन खिडक्यांच्यामध्यें एक आरसा होता. तो जसाचा तसा जागच्या जागीं राहिलेला दिसत होता. या खोलीची मालकीण आतां कोठें होती ? एक भयानक विचार माझ्या मनांत चमकून गेला—ती गुंडांच्या हातीं सांपडली आहे, अशी मी कल्पना केली आणि माझ्या हृदयाचें स्पंदन बंद पडलें आहे असें मला वाटलें...हुंदके देऊन मी रडूं लागलों. माझ्या प्रियतमेला जोरजोरानें हांका मारूं लागलों. पण तेवढ्यांत कसल्या तरी आवाजानें मी भानावर आलों. कपड्याच्या कपाटामागून पलाशा बाहेर आली. ती पांढरी फिकट दिसत होती व तिचें अंग थरथरत होतें.

'प्योत्र आंद्रेइच',—ती म्हणाली,—'कोठून हा दिवस उगवला ? कसले हे भयानक अत्याचार !' तिच्या स्वरांत आत्यंतिक निराशा होती.

' मरीया इवानोवना कुठें आहे ? '—मी अधीरपणानें विचारलें,—' मरीया इवानोवनाचें काय झालें ? '

' ती सुखरूप आहे. '—पलाशानें उत्तर दिलें,—' अकुलिना पांफिलोवनाच्या घरांत ती लपून बसली आहे. '

' फादर गेरासिमच्या घरी ?...काय ? म्हणतेस काय ? '—मी ओरडून विचारलें—' अरे देवा, पुगाचेव तिथेंच आहे आतां. '

मी त्या खोलींतून एकदम बाहेर पडलों. आणि क्षणार्धांत रस्त्यावर आलों. अवतींभवतीं काय चाललें आहे, तिकडे लक्ष न देतां मी पाद्र्याच्या घराकडे पळत सुटलों. घरांतून गाण्याबजावण्याचे, हंसण्याओरडण्याचे आवाज ऐकूं येत होते. पुगाचेव आपल्या दोस्तांबरोबर मेजवानीवर ताव मारीत होता. पलाशाहि माझ्या मागेंच पळत आली होती. अकुलिना पांफिलोवनाला लवकर बोलावून घेऊन ये, म्हणून मी तिला सांगितलें. थोड्याच वेळानें पाद्र्याची बायको घराच्या बाहेर आली. तिच्या हातांत एक रिकामी बाटली होती.

हा वेळपर्यंत माझा मनस्ताप असह्य झाला होता. लगेच मी तिला विचारलें, —' मरीया इवानोवना कुठें आहे ? '

' पार्टीशनमागें माझ्या बिछान्यावर झोंपली आहे ती. '—अकुलिना पांफिलोवना घाईघाईनें बोलत होती. —' प्योत्र आंद्रेइच, देवाची दया म्हणून थोडक्यांत निभावलं. नाहीं तर घात होत होता, बघ. तो दुष्ट माणूस जेवायला बसला. आणि तेवढ्यांत तिला जाग आली. आणि एकदम ती रडायला लागली. काय करावं, मला कांहींच सुचेना. तिचं रडणं त्यानं ऐकलं होतं. लगेच त्यानं विचारलं,—म्हातारे, आंत कोण रडतं आहे ?—खालीं मान घालून मी हळूच सांगितलं,—माझी भाची आजारी आहे, सरकार. ती आठवडाभर बिछान्याला खिळून पडली आहे.—तुझी ही भाची जवान आहे कां ?—त्यानें विचारलें.—होय, सरकार !—मी उत्तर दिलें. त्यावर तो म्हणाला,—बघूं या तुझी भाची कशी आहे ती.—आतां काय करणार ? माझें अंतःकरण धडधडूं लागलं. पण दुसरा कांहीं मार्गच नव्हता. —दाखवतें, सरकार ! —मी म्हणाले,—पण तिला उठतां येत नाहीं. ती तुमच्याकडे येऊं शकत नाही.—हरकत नाहीं. मीच बघून येतों तिला.—आणि लगेच तो जागेवरून उठला. हलकट मेला ! आणि पार्टीशनकडे वळला. त्यानं पडदा बाजूला सारला. बहिरी ससाण्याच्या नजरेनं त्यानं सारं कांहीं टिपून घेतलं. आणि तेवढ्यावरच निभावलं. देवानं दया केली. खरंच सांगतें, मी आणि म्हाताऱ्यानं त्यावेळीं हुतात्म्याचं मरण स्वीकारण्याची तयारी केली होती. सुदैवानं तिनं पण त्याला ओळखलं नाहीं. अरे देवा, अजून काय काय पहायचं नशिबांत आहे, समजत नाहीं. बिचारा इवान कुझमिच ! त्याचं तसं झालं. तिची आई, ती पण त्याच्याच वाटेनं गेली. आणि इवान इग्नातिच ! काय केलं होतं

त्यानं ? तूं एकटाच्च कसा वांचलास नवल आहे. आणि काय रे, अलेक्सी इवानिच श्वाब्रिनविषयीं काय वाटतं तुला ? कझाकासारखे त्यानं केस कापून घेतले आहेत. आणि लुटारूंच्या पंगतींत बसून तो मेजवानी झोडतो आहे आमच्या घरीं. मोठा धूर्त आहे हं तो. माझी भाची आजारी आहे, म्हणून मी सांगितलं. तेव्हां अशा कांहीं नजरेनं त्यानं माझ्याकडे पाहिलं, तें तूं बघायला हवं होतंस. माझी लबाडी त्याच्या लक्षांत आली होती. पण देव त्याच्या मनांत उभा राहिला. म्हणूनच तो कांहीं बोलला नाहीं त्या वेळीं.'—इतकें ती बोलत आहे तेवढ्यांत पाहुण्यांची आरडाओरड बाहेर ऐकूं आली. त्यांना वोदका हवी होती. आणि त्यासाठीं फादर गेरासिम आपल्या बायकोच्या नांवानं हांका मारीत होता. ती लगेच धांदलीनें परतूं लागली. जातां जातां ती म्हणाली,—'प्योत्र आंद्रेइच, इथून आतां सरळ घरीं जा कसा. इथें थांबू नकोस. तिकडे खूप दारू ढोशीत आहेत ते. आणि दारूच्या धुंदींत तें पशू काय करतील याचा नेम नाहीं. प्योत्र आंद्रेइच, जा तूं आतां. काय व्हायचं असेल, तें कांहीं झाल्याशिवाय राहत नाहीं. कदाचित देवाची कृपाहि होईल आपल्यांवर.'

घाईघाईनें ती घरांत निघून गेली. माझ्या मनांतील काळजी अर्थात् थोडी बहुत कमी झाली होती. मी घरीं जायला निघालों. चौकांत पाहिलें, तर वधस्तंभा-भोंवतीं बाष्किर लुटारूंची गर्दी लोटली होती. आणि फांसावर टांगलेल्या प्रेतांच्या पायांतले बूट काढून घेण्यासाठीं ते सर्वजण धडपडत होते. तें दृश्य पाहून माझा राग अनावर झाला. पण अविचारानें वागण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें माझ्या मनांस समजावून मी चुपचाप माझ्या वाटेला लागलों. किल्ल्यांत सर्वत्र लुटारूंचेंच राज्य होतें. ऑफिसर लोकांची घरें शोधून लूटमार करण्यांत ते दंग होते. बंडखोर दारुड्यांच्या हलकल्लोळानें वातावरण भरून गेलें होतें. मी घरीं गेलों. तर दारांतच सावेलिच भेटला. माझीच वाट बघत तिष्ठत उभा होता तो. मला पाहून त्याला मनस्वी आनंद झालेला दिसला.—'तुम्ही आलांत, धनी ? देव पावला. मला वाटलं कीं गुंडांच्या तडाख्यांत तुम्ही पुन्हां सांपडलांत कीं काय ?...हें बघितलंत कां ? लुटारूंनीं इथें कांहीं एक शिल्लक म्हणून ठेवलेलं नाहीं. कपडे, भांडी-कुंडी, पैसे, सारं कांहीं घेऊन गेले ते. हरकत नाहीं. तुमचा जीव त्यांनीं घेतला नाहीं, हें काय कमी आहे ?...पण धनी, त्यांच्या त्या झारला ओळखलंत कां तुम्ही ?'

'नाहीं बुवा. कोण आहे तो ?'

'म्हणजे काय ? त्या दारुड्याला तुम्ही विसरलांत वाटतं ? तुमचा भारी कोट याच दारुड्याला तुम्ही त्या खाणावळींत दिलांत कीं. चांगला नवा सशाच्या कातडीचा कोट अंगांत घालतां घालतां याच लुटारूनं फाडला कीं तो.'

मला आश्चर्याचा धक्काच बसला. माझा तो वाटाड्या आणि पुगाचेव या दोघांत विलक्षण साम्य होतें. आणि आतां तो वाटाड्या म्हणजेच पुगाचेव, याबद्दल

माझ्या मनांत संशय राहिला नाहीं. मग मला एकट्यालाच त्यानें दया कां दाखविली, त्याचें कारण पण लगेच माझ्या ध्यानांत आलें. त्याच वेळीं, योगायोग काय विलक्षण असतो, याचा पण प्रत्यय आला.—एका भटक्या वाटसरूला एका पोरानें आपला कोट बक्षिस दिला. त्यामुळें त्या पोराच्या गळयाभोंवतीं आवळलेला फांस सैल होऊन गळून पडला. आणि गवताळ जंगलांतून खाणावळीच्या शोधांत भटकत फिरणारा एक दारुड्या आतां किल्ल्यांना वेढे घालीत होता. आणि एका राज्याचा पाया गदगदून उखळण्याचा यत्न करीत होता !

'आतां तुम्ही थोडंसं खाणार कां?'—सेवाधर्मास स्मरून सावेलिचनें विचारलें,—'घरांत तर कांहींच नाहीं आहे. पण तरी सुद्धां खाण्यासाठीं कांहीं तरी पैदा करतां येईल.'

खोलींत मी एकटाच होतों. पुन्हां अनेक विचारांनीं माझ्या मनांत एकच गर्दी करून सोडली. आतां यापुढें काय करावयाचें ? किल्ल्यांत राहून एका लुटारू बंडखोराची चाकरी पत्करावयाची किंवा त्यांच्याच टोळींत सामील होऊन गांवोगांव भटकत फिरावयाचें ? माझ्या सारख्या अधिकाऱ्याला यांजपैकीं कोणतीहि गोष्ट मानहानीची होती. माझी कर्तव्यबुद्धि मला असें सांगत होती कीं या संकटकाळांत इमान राखून सेवा जेथें म्हणून करतां येईल, तेथें लगेच रुजू व्हावयास हवें...पण माझें प्रेम मला मरीया इवानोवनाजवळ राहून तिचें रक्षण करण्याचा सल्ला देत होते. परिस्थिति झपाट्यानें पालटेल असें मला दिसत होतें. तरीपण ती ज्या भयानक संकटांत होती, त्याच्या फक्त विचारानेंच माझा थरकांप होत होता.

तेवढ्यांत एक कझाक माझ्या खोलींत घुसला. आणि माझी विचारसमाधि भंग पावली. धांवत पळत माझा शोध घेत तो आला होता.—'आमच्या झारनं तुम्हांला घेऊन येण्याचा हुकूम दिला आहे.'—त्यानें सांगितलें.—'कुठें आहे तो?'—मी विचारलें. त्याच्या झारचा हुकूम पाळणें तूर्त तरी भाग होतें.

'कमांडंटच्या घरीं.—' कझाक म्हणाला.—'जेवल्यानंतर झार स्नानगृहांत गेला. आणि आतां तो विश्रांति घेतो आहे. कांहीं म्हणा तुम्हीं. फार मोठा माणूस आहे तो. जेवतांना त्यानं एकट्यानं डुकराचे दोन बच्चे सहज फस्त केले. आणि आंघोळीच्या वेळीं असं उकळतं पाणी अंगावर घेतलं कीं तारास कुरिचकिनला सुद्धां तें सहन झालं नाहीं. त्यानं झाडू फोमका बिकबायेवच्या हातीं दिला. आणि अंगावर थंड पाणी ओतून घेतलं तरी त्याला शांत वाटलं नाहीं. असा आहे आमचा झार. आंघोळ करतांना आपल्या छातीवरचं राजचिन्ह त्यानं सर्वांना दाखवलं. एका बाजूला पांच कोपेक्सच्या नाण्याच्या आकाराचं दोन गरुडांचं चिन्ह होतं. आणि दुसऱ्या बाजूला त्याचं स्वतःचं चित्र होतं.'

कझाकाशी वाद घालण्यांत कांहीं अर्थ नाहीं, हें जाणून मी मुकाट्यानें त्याच्या मागोमाग कमांडंटच्या घरीं गेलों. जातांना वाटेंत पुगाचेवची ही मुलाखत कशी

काय पार पडते, याचा एका चिंतेंत मी चूर होतों. मनांतल्या मनांत मी मनस्वी अस्वस्थ होतों, हें वाचकांनीं ओळखलेंच असेल.

मी कमांडंटच्या घरीं पोंचलों, तेव्हां काळोखाची छाया जगावर पसरत होती. चौकांतील वधस्तंभ आणि त्या वधस्तंभावर लोंबणारीं प्रेतें विलक्षण भेसूर दिसत होतीं. वासिलिसा येगोरोवनाचें प्रेत अजून तसेंच पोर्चच्या पायऱ्यांवर पडलेलें होतें. त्या प्रेताच्या दोन बाजूंस उभे राहून दोन कझाक पहारा करीत होते. माझ्या-बरोबर आलेला कझाक माझी वर्दी देण्यासाठीं सरळ आंत गेला. आणि क्षणभरानें पुन्हां बाहेर येऊन मोठ्या अदबीनें त्यानें मला आंत नेलें. याच आंतल्या खोलींत काल मी मरीया इवानोवनाचा भावनावेगांत निरोप घेतला होता.

खोलींत शिरतांक्षणीं जें दृश्य दिसलें, तें मोठें विलक्षण होतें. मधोमध पांढऱ्या स्वच्छ कापडानें आच्छादलेलें एक भलें मोठें टेबल होतें. त्या टेबलावर सर्वत्र मोठ्या बाटल्या आणि लहान ग्लासेस सरमिसळ होऊन पसरलेले होते. दाराच्या समोर टेबलाच्या अग्रभागीं पुगाचेव बसलेला होता. आणि टेबलाच्या भवतींभवतीं दहा बारा वयस्क कझाक बसलेले होते. त्यांच्या डोक्यांवर उंच टोप्या होत्या. अंगांत रंगीत खमीस होते. सर्वजण दारूच्या धुंदीनें उत्तेजित झाले होते. त्यांचे राठ चेहरे लालभडक दिसत होते. त्यांचे डोळे चमकत होते. त्या टोळींत नव्यानेंच रिक्रूट झालेले श्वाब्रिन आणि मक्सिमिच दोघेहि तेथें दिसत नव्हते. मी दारांतून आंत गेल्याबरोबर पुगाचेव ओरडला,—'या महाराज. आमच्या पाहुणचाराचा स्वीकार करा. बसा कीं.'—त्या धुंद लोकांनीं मला जागा करून दिली. शांतपणानें मी टेबलाच्या एका कोपऱ्याला बसलों. माझ्याजवळ एक सडपातळ व दिसण्यांत सुंदर असा तरुण कझाक बसला होता. वोदकानें भरलेला एक ग्लास त्यानें माझ्या पुढ्यांत सारला. मी त्याला हात सुद्धां लावला नाहीं. तेथें बसलेल्या सर्व लोकांना मी एकदां चौकसपणें बघून घेतलें. हातांचीं दोन्हीं कोपरें टेबलावर टेकून समोरच पुगाचेव बसला होता. त्याची काळीभोर दाढी हातांच्या पंजांवर रुळत होती. या वेळीं त्याची मुद्रा अगदीं सौम्य दिसत होती. क्रूरपणाचा लवलेश सुद्धां त्या मुद्रेवर उमटलेला नव्हता. त्याच्याजवळच पन्नास पंचावन वर्षांचा एक माणूस बसला होता.

बोलतांना पुगाचेव वारंवार त्याच्याकडे वळत असे. त्याला कधीं तो काउंट म्हणे, तर कधी तिमोफेइच म्हणे. कधीं कधीं तो काका म्हणूनहि त्याला हांक मारी. सर्वजण अगदीं दोस्तांप्रमाणें एकमेकांशी खेळीमेळीनें बोलत होते. आपल्या पुढाऱ्याविषयीं ते विशेष आदरभाव दाखवीत नव्हते. संभाषणाच्या ओघांत सकाळचा हल्ला, बंडाचें यश, उद्यांच्या हालचाली, इत्यादि विषयांचा उहापोह चाललेला दिसला. त्यांच्यापैकीं प्रत्येकजण स्वतःच्या पराक्रमाची बढाई सांगत होता. प्रत्येक विषयावर स्वतःचें म्हणून कांहीं वेगळें मत मांडीत होता. आणि आडपडदा न ठेवतां पुगाचेवच्या मताविरुद्ध आपलें मत सांगत होता.

मिलिटरी कौन्सिलच्या त्या विचित्र बैठकींत ओरेनबुर्गवर चाल करून जाण्याचा ठराव पास करण्यांत आला. नव्यानें टाकावयाचें हें पाऊल मोठें धाडसाचें होतें. पण त्याची क्षिति कोणालाच दिसली नाहीं. आतांपर्यंत एकामागून एक सहज मिळालेल्या विजयांनीं ते धुंद झालेले दिसले. उद्यांच्या उद्यां येथून छावणी हलवावयाची आणि ओरेनबुर्गच्या रोखारोखानें चाल करून जावयाचें, याबद्दल लगेच एकमत झालें.

'गड्यांनो,'—पुगाचेव म्हणाला,—'झोंपण्यापूर्वीं माझें आवडतें गाणें होऊं द्या. चुमाकोव, हं. तूं कर सुरवात.'—लगेच माझ्या शेजारी बसलेल्या माणसानें आपल्या खर्‍या आवाजांत कोळयांच्या उदास गाण्याचे सूर काढले. आणि सर्वांनीं त्याला साथ दिली.

हिरवी राई, माझी आई, थांबव सळसळ जरा,
वीर युवक मी जरा करूं दे विचार आतां मला.
उद्यां पहांटे उठावयाचें फुटतांना तांबडे,
सुरू व्हायया खटला माझा निर्दय झारापुढें.
झार बादशहा, अमुचा मालक, विचारील तो मला,
'सांग खरें रे, शपथ घेऊनी, शेतकऱ्याच्या मुला.
कोण तुझे ते साथी होते ? डाके घालाया,
चार दोन वा अनेक होते ? छापे माराया.'
देइन उत्तर, 'महाराज, मी सर्व खरें सांगतों,
साथी आम्ही चौघे होतों, सांगातीं चालतों.
काळोखी ती रात एक, अन् दुसरी तलवार,
तिसरा घोडा, धनुष्य चवथें अन् त्यावर तीर,
साथी होते हेचि माझे, दुसरा कुणी नसे,
दूत होऊनी बाण दौडती तीक्ष्ण ते खासे.'
महाराज ते उदार म्हणतिल, 'धन्य तुझी पोरा,
शेतकऱ्याच्या शूर मुला, तूं असशी ज्ञानी खरा.
चौर्यकर्मीं तूं चलाख असुनी, अवगत तुजला कला
द्यावीं उत्तरें कशी, म्हणुनी बक्षिस देतों तुला.
दोन उंच ते खांब त्यावरी तुळई आडवी असे
फांसाची ती दोरी लटके, बक्षिस तुजला खासे.'

वधस्तंभाविषयीचें तें लोकगीत ऐकून माझ्या मनांवर जो परिणाम झाला, त्याचें वर्णन करणें कठीण आहे. आज ना उद्यां जे फांसावर चढणार होते, अशा लोकांच्या तोंडून मी तें गाणें ऐकिलें होते. त्यांचे कंटाळवाणे चेहरे, लयपूर्ण स्वर,

विषण्ण मुद्रा आणि त्यांनीं गाइलेलें तें अर्थपूर्ण गीत, या सर्वांमुळें माझ्या मनांत एकप्रकारची भीति उत्पन्न झाली.

नंतर पुन्हां एकदां सर्वांनीं पुढ्यांतील ग्लास भरले. आणि एकाच घोटांत रिकामे करून ते परत टेबलावर ठेवून दिले. नंतर सर्वजण तेथून उठले. आणि पुगाचेवचा निरोप घेऊन आपापल्या ठिकाणीं निघून गेले. ते उठले, तसा मी पण उठलों. आणि मुकाट्यानें त्यांच्याबरोबर चालावयास लागलों. पण मला एकट्यालाच हटकून पुगाचेव म्हणाला,—' तुम्ही थांबा जरा. तुमच्याशीं थोडं बोलायचं आहे. '—आतां खोलींत आम्हीं दोघेच होतों.

थोडा वेळ तसाच गेला. कोणींच कोणाशीं कांहीं बोललों नाहीं. माझ्यावर नजर रोखून पुगाचेव स्तब्ध बसला होता. डावा डोळा वांकडा करून बघण्याची त्याची लकब त्याचवेळीं पहिल्यांदा माझ्या लक्षांत आली. त्याच्या डोळयांत लबाडी होती, उपहास होता. अखेरीस तो मोठमोठ्यानें हंसावयास लागला. तें हंसणें दिलखुलास मोकळेपणाचें होतें. आणि मग विनाकारण मी पण हंसावयास लागलों.

' काय महाराज, माझ्या लोकांनीं तुमच्या गळयांत फांस अडकवला, तेव्हां भयानं तुमचा जीव उडून गेला होता, खरं कीं नाहीं ? खरं सांगू ? तुमचा तो म्हातारा चाकर मधेंच कुठून उपटला नसता, तर तुम्हीं सुद्धां फांसावर लटकला असतां. त्या थेरड्याला मात्र मी लगेच ओळखलं. त्या दिवशीं रात्रीं काळोखांतून ज्या माणसानं तुम्हांला खानावळीचा रस्ता दाखवला, तो माणूस खुद्द महान् झार असेल, अशी कल्पना तरी तुमच्या डोक्यांत आली कां केव्हां ? '—एवढें बोलून त्यानें झारला शोभेल असा ढबदार व रहस्यपूर्ण डौल धारण केला.—' तुमचा गुन्हा फार मोठा आहे.'—तो पुढें म्हणाला, —' पण तरी सुद्धां मी तुमच्यावर दया केली. कारण माझ्या शत्रूंना चुकवण्यासाटीं मी रानोमाळ वणवण फिरत होतों. त्यावेळीं तुम्ही माझ्यावर उपकार केले. पण अजून काय झालं आहे ? बघाल. बघाल तुम्ही. माझं राज्य मी परत जिंकून घेतलं कीं तुमच्यासाठीं मी काय हवं तें करीन. मग काय, माझ्याशीं एकनिष्ठ राहून माझी चाकरी करायचं आश्वासन देतां काय ? '

त्या बदमाषाचा तो प्रश्न आणि त्याचा उद्धटपणा, यांची मला मोठी गंमत वाटली. मला हंसू आल्याखेरीज राहिलें नाहीं.

' हंसायला काय झालं ? '—कपाळावर आंठ्या चढवून रागारागानें त्यानें विचारलें,—' सर्व रशियाचा मी झार आहे, हें तुम्हांला अजून खरं वाटत नाहीं. होय ना ? खरं सांगा. '

त्याच्या त्या प्रश्नानें मी हतबुद्ध झालों. हा भटक्या लुटारू झार आहे, म्हणून कबूल करणें माझ्या स्वभावास जमण्यासारखें नव्हतें. माझ्या लेखीं तो अक्षम्य भित्रेपणा ठरला असता. त्याच्या तोंडावर, तूं तोतया आहेस, म्हणून सांगितलें

असतें तर माझा सर्वनाश ओढवला असता. वधस्तंभाच्या पायथ्याशीं मला रागाचा पहिला झटका आला होता. त्यावेळीं सर्व लोकांच्या देखत मी जें कांहीं करावयास तयार झालों होतों, तें हास्यास्पद होतें, असें आतां मला वाटूं लागलें. पुगाचेवच्या प्रश्नाचें उत्तर देण्यास मी बराच वेळ घुटमळलों. तो माझ्या उत्तराची गंभीरपणें वाट पाहत होता. शेवटीं ( आणि आज देखील त्या क्षणाची मला मोठ्या अभिमानानें आठवण येते ) कर्तव्य भावनेनें मानवी दौर्बल्यावर विजय मिळविला. मी पुगाचेवला म्हणालों,—' ठीक आहे. मी तुम्हांला खरं काय तें सांगतों. मी तुमची सार्वभौम सत्ता कशी मान्य करूं शकतों, याचा तुम्हींच विचार करा. तुम्ही विचारी आहांत. माझं ढोंग लगेच तुमच्या लक्षांत येईल. '

' मी झार नाहीं ? तर कोण आहे, असं तुम्हांला वाटतं ? '

' तें एक देवाला माहित. तुम्ही कोणी का असेना. पण एक गोष्ट मात्र खरी कीं तुम्ही विस्तवाशीं खेळ खेळत आहांत. '

पुगाचेवनं माझ्याकडे रोखून पाहिलें. —' अस्सं. एकूण मी झार प्योत्र फ्योदोरोविच आहे, हेंच तुम्हांला मुळांत पटत नाहीं. ठीक आहे. पण शेवटीं शूर माणूस जिंकतो, हें तर तुम्हांला कबूल आहे कीं नाहीं ? पूर्वी जुन्या जमान्यांत ग्रिश्का ओत्रेप्येवनं* राज्य केलं होतंच कीं नाहीं ? मला तुम्ही काय वाटेल ते समजा. पण माझ्याजवळ राहा. मी कुणी कां असेना. त्याची कशाला तुम्ही काळजी करतां ? नांवांत काय आहे मोठसं ? माझ्या सैन्यांत तुम्ही दाखल व्हा. इमानानं चाकरी करा. आणि थोड्याच दिवसांत मी तुम्हांला फील्ड मार्शल आणि नंतर प्रिन्स करीन. बोला आतां. यावर तुमचं काय म्हणणं आहे ? '

' तें शक्य नाहीं. ' —कांहीं एका निश्चयानें मी बोलत होतों,—'थोरा मोठ्यांच्या कुळांत माझा जन्म झाला आहे. महाराणीशीं एकनिष्ठ राहण्याची मी शपथ घेतली आहे. तेव्हां तुमची चाकरी मी करूं शकत नाहीं. माझं कांहीं भलं करावं, अशी खरोखरच तुमच्या मनांत इच्छा असेल, तर मला ओरेनबुर्गला जाऊं द्या.'

पुगाचेव क्षणभर विचारांत गढलेला दिसला. मग तो म्हणाला,—' समजा, मी जाऊं दिलं, तर निदान शत्रूच्या सैन्यांत तुम्ही सामील होणार नाहींत, असं वचन द्याल ? '

' असं वचन मी कसं देऊं शकेन ? '—मीच त्याला उलट विचारलें.— ' माझा मी कांहीं स्वतंत्र नाहीं, हें तुम्हांला चांगलं माहित आहे. तुमच्या विरुद्ध लढण्याचा मला हुकूम मिळाला कीं लगेच तसं करणं मला भाग आहे. तुम्ही

---

* ग्रिश्का ओत्रेप्येवनें प्रिंस दिमित्रीचा तोतया बनून पोलिश हस्तक्षेपवाल्यांच्या मदतीनें १६०५--१६०६ सालीं मॉस्कोच्या गादीवर अकरा महिनें राज्य केलें होतें. —अनु०

आतां अधिकाराच्या जागेवर आहांत. आपल्या हाताखालच्या अधिकाऱ्यांनीं आपला दरएक हुकूम पाळलाच पाहिजे, असं तुम्हांला वाटतं कीं नाहीं ? माझ्या सेवेची जरूरी आहे, अशा वेळीं मी लढाईवर जाण्यास नकार दिला, तर त्याला काय नांव द्याल तुम्ही ? आतां मी तुमच्या हातांत सांपडलों आहे. तुम्ही मला जाऊं दिलं, तर मी म्हणेन, आभारी आहे. तुम्ही मला फांसावर चढविलें, ठीक आहे. देव तुमचा निवाडा करील. खरं खरं काय तें उत्तर मी दिलं आहे.'

माझ्या बोलण्यानें पुगाचेव चकित झालेला दिसला.—'ठीक आहे तर मग.'—माझ्या खांद्यावर हात ठेवून तो म्हणाला,—'शिक्षा करायची म्हटलं कीं मी शिक्षा करतों. माफी द्यायची म्हटलं कीं मी माफी देतों. खुशाल कुठें जायचं असेल, तिकडे जा. आणि काय करायचं असेल, तें खुशाल करा. उद्यां माझा निरोप घ्यायला या. आज आतां घरीं जा. आणि स्वस्थ झोंपा. माझे पण डोळे पेंगले आहेत.'

मी पुगाचेवचा निरोप घेतला. आणि घरीं आलों. रात्रीचे थंडगार वारे वाहत होते. सगळीकडे शांतता होती. स्वच्छ चांदणें पडलें होतें. चौक, वधस्तंभ, चांदण्यांत सारें कांहीं स्वच्छ दिसत होतें. किल्ल्यांत चहूंकडे शांत होतें व काळोख दाटला होता. गुत्त्यांतून तेवढी प्रकाशाची तिरीप दिसत होती. शांततेचा मधूनच भंग करणारा आरडाओरडा तेथूनच ऐकूं येत होता. कांहीं बेहोष लुटारू गुत्त्यांत पीत बसले होते. फादर गेरासिमच्या घराचीं दारं खिडक्या बंद होत्या. तेथेंहि शांतताच होती.

मी घरीं गेलों. तर सावेलिच माझ्या अनुपस्थितीमुळें दुःख करीत असलेला दिसला. मी कुठेंहि जाण्यास आतां मोकळा आहे, हें समजल्यावर त्याला अपरिमित आनंद झाला. आपल्या अंगावर क्रूसाची खूण करीत तो म्हणाला,—'देव दयाळू आहे. तो कधींहि तुम्हांला अंतर देणार नाहीं, धनी. मग उद्यां सकाळींच निघूं या. आपण इथून आधीं निघूं, मग कुठं जायचं तें पुढचं पुढें पाहूं. मी थोडसं खायला केलं आहे. अगोदर चार घास खाऊन घ्या. मग झोंप काढायला सकाळपर्यंत हवा तेवढा वेळ आहे. पुन्हां झोंप पण सुखाची लागेल.'

म्हाताऱ्यानें सांगितलं, तें तें सारं मी बिनबोभाट केलं. सावेलिचनें शिजविलेल्या अन्नावर मी जसा तुटून पडलों. आणि भूक शांत झाल्यावर जमिनीवरच आडवा झालों. सारीं गात्रें शिणलीं होतीं. विचार करून मन पण थकलें होतें. डोळे मिटतांक्षणीं मला झोंप लागली.

---

# प्रकरण नववें

## *निरोप*



शिकलों तुजवर प्रेम कराया
अनुभव असला मधुर प्रिये.
वियोग घडतां, कुडी सोडुनी
आत्मा जातो, गमलें सखये.

—खेरास्कोव.

सकाळींच नगाऱ्यावर टिपरी पडली. त्या आवाजानें एकदम दचकून मी जागा झालों. आणि सरळ चौकांत गेलों. वधस्तंभाच्या भोंवतीं पुगाचेवच्या माणसांनीं रांगा केल्या होत्या. वधस्तंभांवर दोन्हीं प्रेतें अजून तशींच लटकत होतीं. कझाक घोड्यांवर स्वार झाले होते. सैनिकांच्या हातांत बंदुका होत्या. सगळीकडे निशाणें फडकत होतीं. गाड्यांवर कांहीं तोफा चढविलेल्या दिसल्या. त्यांतून आमची तोफ मी सहज ओळखून काढली. चौकांत गांवकऱ्यांची एकच गर्दी उसळली होती· सर्वजण झारच्या वाटेकडे डोळे लावून उभे होते. कमांडंटच्या घराजवळ पोर्चलगत पांढरा शुभ्र उमदा घोडा खुरांनीं जमीन उकरीत उभा होता. घोड्याचा लगाम हातीं धरून एक कझाक बाजूला उभा होता. कमांडंटच्या बायकोचें प्रेत पोर्चमधून ओढून जरा बाजूस सारलेलें दिसलें. आतां प्रेतावर पोतीं टाकलीं होतीं. थोड्या वेळानें कमांडंटच्या घरांतून पुगाचेव बाहेर आला. लगेच लोकांनीं डोक्यांवरील टोप्या काढून हातांत घेतल्या. पुगाचेव पोर्चमध्यें उभा राहिला. आणि हंसून त्यानें सभोंवार नजर टाकली. तांब्याच्या चिल्लर नाण्यांनीं भरलेली एक पिशवी एका कझाकानें पुगाचेवच्या हातांत दिली. त्या पिशवींतील नाणीं मुठी भरभरून पुगाचेवनें जमावावर उधळलीं. नाणीं गोळा करण्यासाठीं एकच झुंबड उडाली. चेंगराचेंगरींत कांहीं लोक जायबंदी झाले. पुगाचेवच्या अवतींभवतीं त्याचे प्रमुख साथीदार घोळका करून उभे होते. त्यांच्यांतच श्वाब्रिन पण होता. आमचे डोळे भिडले. तेव्हां माझ्या डोळ्यांत भरलेला तिरस्कार बघून त्यानें दुसरीकडे नजर वळविली. त्याच्या नजरेंत द्वेष आणि तुच्छता होती. लोकांच्या घोळक्यांतून पुगाचेवनें मला अचूक हुडकून काढलें आणि आपल्याजवळ येण्याची खूण केली. मी पुढें झालों. तो म्हणाला,—' मी काय सांगतों, तें नीट ऐका. इथून सरळ ओरेनबुर्गला

जा. तिथल्या गव्हर्नरची आणि जनरलची गांठ घ्या. आणि त्यांना माझा निरोप सांगा. म्हणावं कीं एक आठवडाभरांत मी येणार आहे. लहान मुलांस शोभेल अशा प्रेमानं आणि भाबडेपणानं माझं स्वागत करायला सांगा त्यांना. त्यांना सांगा कीं लढण्याचा बेत असेल, तर याद राखून ठेवा. हालहाल करून ठार मारीन एकेकाला. नीट संभाळून प्रवास करा.'—नंतर श्वाब्रिनकडे बोट दाखवून तो लोकांना म्हणाला,—'हा बघा तुमचा नवा कमांडर. याचा प्रत्येक हुकुम बिनतक्रार पाळा. हा किल्ला त्याच्या ताब्यांत दिला आहे. आणि तुम्हांला सर्वांना मी त्याच्या हवालीं केलं आहे. निमूटपणानं तो सांगेल, तसं वागा.'— ते शब्द ऐकून माझी पांचावर धारण बसली. श्वाब्रिन किल्ल्याचा कमांडर...म्हणजे मरीया इवानोवना सुद्धां त्याच्याच हातांत! मग सारा निकाल लागला म्हणावयाचा. पोर्चच्या पायऱ्यांवरून पुगाचेव खालीं उतरला. कझाकानें घोडा त्याच्याजवळ आणून उभा केला. त्याला मदत करण्यासाठीं कांहीं कझाक लगेच पुढें धांवले. पण त्यापूर्वींच सहज लीलेनें घोड्याच्या पाठीवर उडी मारून पुगाचेव स्वार झाला होता.

त्याचवेळीं लोकांची गर्दी बाजूला करून सावेलिच धिटाईनें पुढें आला. आणि पुगाचेवच्या हातीं त्यानें एक कागदाचा कपटा दिला. ही काय नवी भानगड आहे, मला कांहींच कळेना. पुगाचेवनें दिमाखांत विचारलें,—'काय आहे या कागदांत?'

'वाचा कीं. म्हणजे समजेल.'—सावेलिच म्हणाला. पुगाचेवनें तो कागदाचा कपटा उलटा पालटा करून पाहिला. मग तो म्हणाला,—'काय पण अक्षर आहे! झारच्या डोळ्यांना असलं अक्षर लावायची संवय नाहीं...माझा सेक्रेटरी कुठं आहे?'

कॉर्पोरलचा युनिफॉर्म अंगावर चढवलेला एक तरुण कझाक धांवत पुढें आला. त्याच्या हातीं तो कागद सोपवून पुगाचेव म्हणाला,—'मोठ्यानं वाच.'—माझ्या पहिल्या शिक्षकानं पुगाचेवला लिहिलेल्या त्या पत्रांत काय खरडलें होतें, तें जाणण्याची मला उत्सुकता होती. सेक्रेटरीनें पत्रांतील एकएक अक्षर काळजीपूर्वक लावून वाचावयास सुरवात केली.

'दोन झगे, एक कॅलिकोचा आणि एक पट्टयापट्टयांचा रेशमी.—सहा रुबल्स.'

'याचा अर्थ काय?'—कपाळावर आंठ्या चढवून पुगाचेवनें विचारलें.

'कळेल सारं. जरा ऐकून तर घ्याल.'—सावेलिचनें शांतपणानें सांगितलें.

तोंपर्यंत पुढील अक्षरें सेक्रेटरीनें कशींबशीं लावलीं होतीं.

'हिरव्या तलम कापडाचा युनिफॉर्म.—सात रुबल्स.'

'पांढऱ्या कापडाची तुमान.—पांच रुबल्स.'

'एक डझन हॉलंड शर्टस. कफ्ससुद्धां.—दहा रुबल्स.'

' चहाचा सेट. —दोन रुबल्स आणि पन्नास कोपेक्स.'

' ही काय मस्करी मांडली आहे ?'—रागानें ओरडून पुगाचेवनें विचारलें.— ' झगे. तुमानी. टी सेट. काय भानगड आहे ही सारी ? '

सावेलिचनें खाकरून घसा साफ केला. आणि मग कागदांतील यादीचें खुलासेवार स्पष्टीकरण केलें.—' माझ्या धन्याचं सामान लुटारूंनीं लुटून नेलं. त्याची ही यादी आहे, महाराज.'

' लुटारू ? कोणते लुटारू ? '—पुगाचेवनें ओरडून विचारलें.—' नाहीं. लुटारू नाहीं. माफ करा. चुकून बोललों मी.'—सावेलिच म्हणाला.—' लुटारूंनीं नाहीं. तुमच्या लोकांनीं माझ्या धन्याचं सारं घर शोधलं. आणि घरांतल्या सर्व वस्तू त्यांनीं उचलून नेल्या. असे रागावूं नका. घोड्याला चार पाय असले तरी सुद्धां कधीं कधीं तो अडखळतो.—हं पुढें ऐका. '—' वाच रे. '—पुगाचेव म्हणाला.

' एक चादर साधी, सुती. आणि एक सिल्कची. —चार रुबल्स. '

'एक तांबडा कोट, कोल्ह्याच्या लोकरीचें अस्तर लावलेला. —चाळीस रुबल्स.'

' आणि एक सशाच्या कातड्याचा कोट. खाणावळींत झारला दिला तो.— पंधरा रुबल्स. '

' ही काय भानगड आहे ? '—पुगाचेवनें ओरडून विचारलें. आतां मात्र त्याचा राग अनावर झालेला दिसला.

माझ्या शिक्षकाविषयीं माझ्या मनांत काळजी निर्माण झाली. आतां कसली शिक्षा त्याला भोगावी लागणार, तेंच मला कळेना. तो पुढें आणखी बरेंच कांहींतरी बोलणार होता. पण तेवढ्यांत पुगाचेवनें त्याला हटकलें,—' माझ्याकडे असल्या चिल्लर भानगडी घेऊन येतोस ? तुला लाज कशी वाटत नाहीं ? '—असें म्हणून त्यानें सेक्रेटरीच्या हातांतून कागदाचा कपटा हिसकावून घेतला. आणि सावेलिचच्या तोंडावर तो फेंकून मारला.—' गाढव आहेस झालं. म्हणे कपडे चोरीस गेले. मग त्यांत एवढं बोंबलायला काय झालं ? ज्यांनीं माझा हुकुम मानला नाहीं, त्यांना मी फांसावर चढवलं. तसंच तुला आणि तुझ्या धन्याला फांसावर चढवलं नाहीं, एवढं नशीब समज. तुझा जीव वांचवल्याबद्दल थेरड्या, तूंच आमच्यासाठीं जन्मभर देवाची प्रार्थना करायला हवीस. म्हणे सशाच्या कातड्याचा कोट ! हं ! मी देतों तुला कातड्याचा कोट. तुला जिवंत सोलून काढायला सांगतों. तुझ्या चामड्याचा झकास कोट होईल बघ ! '

' जशी तुमची इच्छा. '—सावेलिच म्हणाला,—' पण मी तर बोलून चालून गुलाम आहे. आणि माझ्या धन्याच्या वस्तू चोरीस गेल्या, तर त्यांची ज़िम्मेदारी माझी आहे. '

पुगाचेवनें सावेलिचच्या बोलण्याकडे लक्षच दिलें नाहीं. तो त्यावेळीं खुशींत दिसला. त्यानें लगाम खेंचला. आणि घोड्याला टांच दिली. त्याच्या मागोमाग श्वाब्रिन आणि त्याचे इतर साथीदार आणि टोळीवाले सर्वजण शिस्तींत किल्ल्याबाहेर पडले. लगेच लोकांचे घोळके त्या दिशेनें धांवले. क्षणार्धांत चौक ओस पडला. फक्त मी आणि सावेलिच चौकांत उभे होतों. त्याच्या हातांत तो यादीचा कागद होता. आणि उदासपणानें तो त्या कपड्याकडे बघत होता.

पुगाचेवचें माझ्याशीं असलेले सलगीचे संबंध पाहून त्याचा फायदा घ्यावा असा सावेलिचनें विचार केला होता. पण त्याची निराशा झाली. त्याचा हा अनाठायीं उत्साह पाहून त्याची एकदां सडकून हजेरी घ्यावी, असें माझ्या मनांतून होतें. पण मला हंसूं आवरेना.—'तुम्ही आतां हंसतां आहांत.' —तो म्हणाला, —'पण पुन्हां घर लावण्याची पाळी आली कीं कळेल मग काय तें. हंसण्यावारी नेण्यासारखी गोष्ट नाहीं ही, धनी.'

मी तेथून निघालों, आणि मरीया इवानोवनाला भेटण्यासाठीं तडक फादर गेरासिमच्या घरीं गेलों. तेथें अकुलिना पांफिलोवना मला भेटली. तिनें मला एक दुःखद बातमी सांगितली.

काल रात्रीं मरीया इवानोवनाला सडकून ताप भरला होता आणि पहांटेपासून ती निपचीत पडून होती. मधूनमधून वातांत ती कांहीं कांहीं बडबडत होती. तिला बघण्यासाठीं म्हणून मी तिच्या खोलींत गेलों. पाऊल न वाजवितां हळूंच तिच्या खाटेजवळ जाऊन उभा राहिलों. तिला बघून भयानें माझ्या छातींत कळ उठली. तिचा चेहरा ओळखूं येत नव्हता. मला पण तिनें ओळखलें नाहीं. फादर गेरासिम आणि त्याची बायको माझें सांत्वन करण्यासाठीं कांहीं कांहीं बोलत होते. पण त्यांच्या बोलण्याकडे माझें लक्ष नव्हतें. भयप्रद विचारांनीं माझें मन भरून गेलें होतें. आईबापांना मुकलेली ती बिचारी पोरकी पोर लुटारू बंडखोरांच्या तडाख्यांत सांपडली होती आणि त्यावेळीं तरी निदान तिच्यासाठीं मी कांहीं करूं शकत नव्हतों. सर्वांत अधिक मला श्वाब्रिनची भीति वाटत होती. तोतया झारनें त्याच्या हातीं सत्ता दिली होती. त्याला जणुं किल्ल्याचा राजा केलें होतें. आणि त्याच्या तिरस्काराला पात्र झालेली ती दुर्दैवी निरपराध मुलगीहि याच किल्ल्यांत होती. तेव्हां त्यानें तिचा कसा छळ केला असतां हें सांगणें शक्य नव्हतें. आणि मी त्या तशा स्थितींत कांहीं सुद्धां करूं शकत नव्हतों. या हरामखोर गुंडांच्या

कचाट्यांतून शक्य तितक्या लवकर तिची सुटका करावयास हवी होती. माझ्या डोळ्यासमोर आतां फक्त एकच मार्ग होता, तावडतोब ओरेनबुर्गचा रस्ता धरावयाचा आणि तेथून बेलोगोर्स्क ठाण्याची मुक्तता करण्यासाठीं शक्य ते सारे यत्न करावयाचे. मनाचा निर्धार झाल्यावर मी फादर गेरासिमचा आणि त्याच्या दयाळू बायकोचा निरोप घेतला. ज्या दुर्दैवी मुलीला मी माझी वाग्दत्त वधू मानीत होतों, तिला विश्वासानें मी त्यांच्या स्वाधीन केलें. तिचा हात हातांत घेऊन मी त्याचें चुंबन घेतलें. आणि आसवांनीं तो ओला केला. अकुलिना पांफिलोवना मला पोंचविण्यासाठीं दारापर्यंत आली. डोळ्यांत पाणी आणून ती म्हणाली,—'प्योत्र आंद्रेइच, वेळ फार वाईट आहे. चांगले दिवस लवकर यावेत, म्हणून आपण देवाची प्रार्थना करावी. प्रकृतीची काळजी घे. आणि खुशालीचें पत्र पाठव. आमचा सारा भरीभार आतां फक्त तुझ्यावरच आहे मरीया इवानोवना बिचारी—तिला तरी तुझ्यावांचून आतां कोण आहे ? '

तिथून निघून मी चौकांत आलों. तेथें क्षणभर उभे राहून मी वधस्तंभाकडे पाहिलं, लवून नमस्कार केला, आणि किल्ल्याची हद्द सोडली. हा सबंध वेळ सावेलिच माझ्या मागेंच फिरत होता. त्याला बरोबर घेऊन मी ओरेनबुर्गचा रस्ता धरला.

मी चालत होतों. आणि माझें मन विचारांत गढून गेलें होतें. तेवढ्यांत घोड्याच्या टापांचा आवाज ऐकून मी भानावर आलों. मागें वळून पाहिलें, तर एक कझाक घोडेस्वार दौडत येतांना दिसला. दुसऱ्या एका बाष्किर घोड्याचा लगाम त्याच्या हातीं होता. दुरून खुणा करून तो मला थांबावयास सांगत होता. मी थांबलों. घोडेस्वार जवळ येऊन ठेपला. लगेच मी त्याला ओळखलें. तो आमचा सार्जंट होता. माझ्या जवळ येतांक्षणीं चपळाईनें घोड्यावरून उडी मारून तो उतरला. आणि दुसऱ्या घोड्याचा लगाम माझ्या हातांत देऊन म्हणाला,—'प्योत्र आंद्रेइच, आमच्या झारनं हा घोडा तुमच्यासाठीं दिला आहे. आणि त्याच्या पाठीवरचा कोट पण. '—मी बघितलें, तर त्या घोड्याच्या खोगिरावर मेंढ्याच्या कातड्याचा कोट बांधलेला दिसला.—'आणखी...आणि हें बघा,'—बोलतां बोलतां मध्येंच अडखळल्यासारखा तो थांबला.—'आणि...आणि पन्नास कोपेक्सची एक लहानशीं थैली पण झारनं दिली होती....माफ करा...ती वाटेंत सांडली.'-सावेलिचनें त्याच्याकडे एकदां रोखून पाहिलें. आणि मग तो ओरडला,—'वाटेंत सांडली काय ?

आणि तुझ्या खमीसाच्या खिशांत तें काय खळखळतंय रे ! बेशरम कुठला !'— 'काय ? माझ्या खिशांत ?'—सार्जंट बेपर्वाईनें म्हणाला,—'कुठं काय खळखळतंय माझ्या खिशांत ! कांहींच नाहीं. अरे, लगाम आहे तो लगाम.'—'जाऊं दे रे.'— उगाच वादविवाद वाढूं नये, म्हणून मी मध्येंच म्हणालों.—'हें बघ, ज्यानं तुला पाठवलं, त्याला सांग कीं मी फार आभारी आहे. आणि ती थैली वाटेंत सांडली आहे ना, तिचा शोध घे रस्त्यानं. मी तुला बक्षिस दिली आहे ती. वाटेंतल्या एखाद्या गुत्त्यावर थांबून वोदका पी.'—'आभारी आहे...तुमच्यासाठीं मी नेहमीं देवाची प्रार्थना करीन.'—असें कांहीं तरी पुटपुटत तो घोड्यावर स्वार झाला. आणि खमीसाचा खिसा एका हातानें दाबून धरून त्यानें घोड्याला टांच मारली. क्षणार्धांत तो दिसेनासा झाला.

मेंढ्याच्या कातड्याचा कोट मी अंगांत घातला. आणि घोड्यावर स्वार झालों. सावेलिचलाहि माझ्या मागे घोडयावर बसवून घेतलें.—'बघितलंत ? त्या बदमाषाच्या हातीं मी अर्ज दिला, त्याचा हा परिणाम. त्या चोराला सुद्धां लाज वाटली स्वतःची. आपल्या वस्तू लुटारूंनीं चोरून नेल्या, त्याच्या निम्म्यानं सुद्धां या खत्रुड घोड्याची आणि या फाटक्या कोटाची किंमत येणार नाहीं. हरकत नाहीं. मरतुकड्या कुत्तरड्याचे चार केस तरी हातीं लागले. तेवढेंच सही. हो. चोरट्याचं काय घ्या...'

# प्रकरण दहावें

## *गांवाला वेढा*



व्यापुनि डोंगर जंगल सारे
सैन्य ठेविलें उंचावरतीं
गरुड भरारी जशी घेउनी
नजर लाविली नगरावरतीं

उभवी भिंती तटबंदीच्या
दारुगोळा ठेवी दडवुन
हेतू हा कीं रात्र पसरतां
बार धडाकुन द्यावा उडवुन

—खेरास्कोव

आम्ही ओरेनबुर्गच्या जवळ येऊन पोंचलों. वेशीजवळ आम्हांला अनेक कैदी दिसले. त्यांचीं डोकीं भादरण्यांत आलीं होतीं. आणि अमानुष छळ करून त्यांचे चेहरे विद्रुप करण्यांत आले होते. म्हाताऱ्या, हातपाय तुटलेल्या सैनिकांच्या हाताखालीं हे सर्व कैदी तटबंदीजवळ काम करीत होते. कांहींजण खंदकांतील गाळ गाड्यांतून वाहून नेत होते. कांहींजण जमीन खणीत होते. गवंडी किल्ल्याच्या तटावर चढून भिंतीची डागडुजी करीत होते. वेशीजवळ आल्याबरोबर पहारेकऱ्यांनीं आमच्या पासपोर्टची मागणी केली. मी बेलोगोर्स्कहून आलों आहे, असें कळतांच सार्जंट लगबगीनें मला जनरलच्या घरीं घेऊन गेला.

जनरल आपल्या बागेंत नारिंगाच्या झाडांची तपासणी करीत हिंडत होता. पावसाळयांतील वादळ वाऱ्यानें फळझाडांची बरीच नासधूस केली होती. एका म्हाताऱ्या माळ्याच्या मदतीनें बागेंतल्या झाडांची मशागत करण्यांत स्वारीचें लक्ष गुंतलेलें होतें. उघड्या पडलेल्या झाडांच्या बुंध्यांवर मायाळू हातांनीं वाळलेल्या गवताचीं ऊबदार पांघरुणें तो घालीत होता. त्याची अंगकाठी मजबूत आणि मुद्रा शांत दिसत होती. मला बघून त्याला आनंद झालेला दिसला. आणि लगेच माझ्याकडे वळून त्यानें माझी वास्तपुस्त केली. बेलोगोर्स्क ठाण्यावरील ज्या दुःखदायक घटना मी साक्षात् माझ्या डोळ्यांनीं पाहिलेल्या होत्या, त्यांची इत्थंभूत कहाणी मी सांगितली. एकीकडे वाळलेल्या फांद्या छाटण्याचें त्याचें काम चालूच होतें. पण मी जें काय सांगत होतों, तें सर्व तो लक्षपूर्वक ऐकत होता.—' अरेरे, बिचारा मिरोनोव ! '—माझी कहाणी सांगून झाल्यावर म्हातारा दुःखभरानें म्हणाला,—' ही फार वाईट गोष्ट झाली. मिरोनोव फार कर्तबगार ऑफिसर होता. त्याची बायको भारी प्रेमळ होती. कावळ्यांच्या छत्र्यांचीं लोणचीं ती फार चांगली

करीत असे. पण काय रे, त्याच्या मुलीचं काय झालं ? माशा तिचं नांव, नाहीं कां ?'—'सध्यां फादर गेरासिमच्या घरीं ती आहे,'—म्हणून मी सांगितलें.— 'अरेरे, फार वाईट झालं. त्या गुंडांचा कांहीं भरंवसा देतां येत नाहीं. त्या दुर्दैवी मुलीचं काय होणार, कांहीं कळत नाहीं,'—ती संधि साधून मी लगेच म्हणालों कीं बेलोगोर्स्क इथून कांहीं फार दूर नाहीं. इथून सैन्य पाठवलं, तर त्या ठाण्याची सहज मुक्तता करतां येईल. त्याविषयीं मात्र तो साशंक दिसला. मान हलवून,— 'बघूं या. बघूं या,' असें कांहीं तरी तो पुटपुटला. मग माझ्या पाठीवर हात ठेवून तो म्हणाला,—'वाटचालीनं तूं थकला असशील. आधीं आपण चहा घेऊं. या बंडाचा बंदोबस्त कसा करतां येईल, तें मी बघतों. आजच मी युद्ध-समितीची एक सभा बोलावली आहे. त्या सभेंत बदमाष पुगाचेवची आणि त्याच्या सैन्याची तूं खरी माहिती सांग. त्या आधीं तूं जरा विश्रांति घे. मग बोलायला पुष्कळ वेळ आहे.'

मला दिलेल्या जागीं जाऊन बघतों, तर सावेलिचनें सारी कांहीं मांडामांड व्यवस्थित केलेली दिसली. सभेची वेळ होईपर्यंत मी सारा धीर एकवटून वाट बघत बसलों. वेळ जातां जात नव्हती. माझ्या दृष्टीनें ती सभा फार महत्वाची होती. माझ्या नशिबाचा निर्णय ती सभाच करणार होती. तेव्हां ठरलेल्या वेळीं जनरलच्या घरीं मी हजर झालों. माझ्या आधीं तेथें शहराचा एक अधिकारी येऊन बसलेला दिसला. जकात खात्याचा तो डायरेक्टर होता. चांगला जाडजूड, लालबुंद चेहऱ्याचा तो माणूस मोठा बडबड्या दिसला. इवान कुझमिचला तो चांगला ओळखत होता. आणि आपल्या जुन्या दोस्ताची सारी हकीगत त्यानें मला विचारली. माझ्या बोलण्यांत तो वारंवार अडथळे आणीत होता. मधूनच कांहीं प्रश्न विचारीत होता. युद्ध शास्त्राची माहिती त्याला यथातथाच दिसली. पण माणूस हुशार होता. आणि साऱ्या घडामोडींचा उलगडा त्यानें सहज करून घेतला. आमचें बोलणें चालूं होतें, तोंपर्यंत मधल्या वेळांत इतर सर्व निमंत्रित तेथें येऊन दाखल झाले. एक जनरल वगळला तर बाकी सर्वजण, कोणाला लढाईचा कसलाच अनुभव नसावा, असें दिसले. सर्व मंडळी जमल्यावर सर्वांना चहा देण्यांत आला. आरंभीं जनरलनें सारी परिस्थिति सर्वांना नीट समजावून सांगितली. शेवटीं तो म्हणाला,—'आतां प्रश्न असा आहे कीं, बंडखोरांशीं मुकाबला कसा करायचा. आपण त्यांच्यावर हल्ला चढवायचा कीं बचावाची तयारी करायची ? दोन्ही मार्गांचे फायदे तोटे आहेत. आपण चढाई करून हल्ला चढवला तर शत्रू सैन्याची पुष्कळ हानि करतां येईल, यांत शंका नाहीं. बचावाचा मार्ग जास्त भरंवशाचा व विश्वसनीय आहे. या नंतर मी तुमची मतं घेणार आहे. इथें सर्वांत खालचा अधिकारी कोण आहे ?'—माझ्याकडे वळून तो म्हणाला,— 'हं. तुझं काय मत आहे, तें मोकळेपणानें सांग.'

मी उठून उभा राहिलों. पुगाचेवची आणि त्याच्या सैन्याची माहिती देऊन मी सांगितलें कीं, आपल्या नियमित सैन्यापुढें पुगाचेवचा निभाव लागणार नाहीं. माझें मत अधिकाऱ्यांना पसंत पडलें नाहीं. त्यांत त्यांना तारुण्यसुलभ उतावळेपणा व उद्धटपणा दिसला. सभेंत कुजबुज सुरू झाली. आणि खालच्या आवाजांत 'पोरकट' या शब्दानें माझी संभावना केली जात आहे, हें मी स्पष्टपणें ऐकिलें. जनरल माझ्याकडे बघून हंसला. आणि शांतपणानें म्हणाला,—'लढाईचा प्रश्न आला कीं युद्धसमितीच्या सभेंत पहिल्यांदा बहुतेक चढाईच्या बाजूनें मतं पडतात. आणि तसेंच व्हायला पाहिजे. ठीक आहे. सभ्य गृहस्थहो, आतां आपण मतें घेऊं या. हं. डायरेक्टरसाहेब, तुमचं मत काय आहे, तें बघूं या.'

हा वेळपर्यंत जकात खात्याच्या म्हाताऱ्या डायरेक्टरनें तीन कप चहाचे आणि कित्येक ग्लास रमचे पोटांत रिचविले होते. खाकरून, घसा साफ करून तो म्हणाला, —'माझं मत विचाराल, तर तुमचे हे दोन्ही मार्ग मला पसंत नाहींत.'

'काय? म्हणतां काय?'—आश्चर्यानें स्तंभित झालेल्या जनरलनें विचारलें.— 'तुमचं म्हणणं तरी काय आहे? पण दुसरे कोणतेच मार्ग नाहींत. चढाई नाहीं तर बचाव. यापरतां तिसरा मार्ग मुळीं नाहींच...'

'आपण सौद्याचा मार्ग स्वीकारावा.'

'असं. असं. बरोबर आहे तुमचं म्हणणं. हा सुद्धां एक मार्ग आहे. आणि त्याचा सुद्धां विचार करण्यासारखा आहे. पुगाचेवच्या मुंडक्यासाठीं गुप्त फंडांतून सत्तर रुबल्स, सत्तरच काय पण शंभर रुबल्स देखील आम्ही जाहीर करूं शकतों...'

'आणि मग,—' जनरलचें बोलणें मध्येंच तोडून डायरेक्टरसाहेब म्हणाले, —'ते लुटारू लोक आपल्या पुढाऱ्याचे हातपाय बांधून त्याला आमच्यासमोर हजर करतील. आणि तसं झालं नाहीं, तर मला डायरेक्टर म्हणूं नका, किरगीझ मेंढा म्हणा मेंढा!'

'तुमच्या सूचनेवर अवश्य विचार करून चर्चा करूं.'—जनरल म्हणाला. —'तरीपण कोणत्याहि परिस्थितींत लष्करी उपाय देखील योजायला हवेत. अच्छा. आतां क्रमाक्रमानें आपलीं मतं सांगा.'

सर्व मतें माझ्याविरुद्ध पडलीं. आपलें सैन्य बेभरंवशाचें आहे, यशाची खात्री नाहीं, जरा दमानें घ्यायला पाहिजे वगैरे सबबी सर्व अधिकाऱ्यांनीं सांगितल्या. खुल्या मैदानांत उतरून लढाई करण्यापेक्षां तोफांच्या संरक्षणाखालीं किल्ल्याच्या मजबूत भिंतीआड राहणेंच जास्त सयुक्तिक आहे, असें सर्वांचेंच मत पडलें

प्रत्यकाचें मत सांगून झाल्यावर जनरलनें पाइपमधील राख झाडली. आणि तो गंभीरपणानें म्हणाला,—'सभ्य गृहस्थहो, माझं मत विचाराल, तर तें पूर्णपणें

या तरुणाच्या बाजूचं आहे. त्याचं मत लढाईच्या डावपेचांवर आधारलेलं आहे. आणि या डावपेचांनुसार बचावापेक्षां चढाईच जास्त उपयुक्त ठरते.'

एवढें बोलून त्यानें पुनः पाइपमध्यें तंबाखू ठांसून भरली. मला मोठा अभिमान वाटला. सभेंत चुळबुळ माजली होती. कांहीं एका भयानें सर्वांचा कबजा घेतलेला दिसत होता. विजयोन्मादानें मी एकदां सभोंवार पाहिलें.

—' पण सभ्य गृहस्थ हो,—' दीर्घ निःश्वासाच्या जोडीला धुराचा एक भला मोठा ढग हवेंत सोडून जनरलनें अर्धवट सोडलेलें आपलें भाषण पुढें चालू केलें, –' एवढी मोठी जबाबदारी एकट्याच्या शिरावर घेण्याचं धाडस मी करणार नाहीं. महाराणी साहेबांनीं आसपासचा सर्व मुलूख माझ्या हातीं सोंपवला आहे. त्याचा संरक्षणाचा हा प्रश्न आहे. म्हणून बहुमतानें जें ठरलेलं आहे, तसं वागावयाचं मी ठरवलं आहे. आपल्या ठाण्याला शत्रू वेढा घालील, तोंपर्यंत आपण शांतपणानं वाट पहावी; तोफांच्या जोरावर शत्रूचें हल्ले परतवून लावावे, आणि शक्य झाल्यास बारीक सारीक हल्ले करावें, असंच बहुमत आहे. काय मंडळी, माझं म्हणणं बरोबर आहे ना ? '

तेथें जमलेले अधिकारी आतां माझ्याकडे कुचेष्टेनें पाहत होते. सभा बरखास्त झाली. मला वाईट वाटलें, तें फक्त एकाच गोष्टीचें. एवढा मोठा हा जनरल, त्यानें आपलीं मतं बाजूस ठेवून या अडाणी, अननुभवी, लोकांच्या मतास मान दिला होता. मला वाटलें कीं शूर सेनापतीनें असें वागावयास नको होतें.

कौन्सिलची ही सुप्रसिद्ध बैठक होऊन कांहीं दिवस लोटले. आणि आपल्या वचनास जागून पुगाचेव ओरेनबुर्गवर चाल करून आला. तटबंदीच्या बुरुजावरून मी शत्रूच्या सैन्याची पाहणी केली. पूर्वीपेक्षां पुगाचेवचे सैनिक संख्येनें किती तरी पटींनीं वाढलेले दिसले. आसपासच्या किल्ल्यांतून जिंकून आणलेल्या तोफा आतां त्याच्याजवळ होत्या. सभेंत आंखलेलें युद्धाचें धोरण आतां जाहीर झालें होतें. तेव्हां हा वेढा यापुढें किती दिवस लांबेल, त्याचा कांहीं नेम नव्हता. तो कोंडमारा असह्य झाल्यामुळें धाय मोकलून रडावें, असें मला वाटलें.

ओरेनबुर्गच्या वेढ्याचें वर्णन विस्तारानें करण्याचा येथें माझा विचार नाहीं. घरगुती आठवणीचा तो विषय नाहीं. तर इतिहासाच्या कक्षेंतील तो विषय आहे. मी फक्त त्याचें थोडक्यांत वर्णन करणार आहे. स्थानिक अधिकाऱ्यांच्या निष्काळजी-पणामुळें हा वेढा किल्ल्यांतील लोकांना फार तापदायक ठरला. त्यांची उपासमार झाली. आणि अनेक संकटांना विनाकारण त्यांना तोंड द्यावें लागलें. ओरेनबुर्गमधील जीवनक्रम दिवसेंदिवस त्रासदायक होत चालला होता. सर्व लोक खिन्नपणें आपल्या नशिबावर हवाला ठेवून बसलें होतें. गरजेच्या वस्तूंच्या किंमती प्रमाणा-बाहेर भडकल्या होत्या. आपल्या अंगणांत येऊन थडकणाऱ्या तोफगोळ्यांची लोकांना आतां संवय झाली होती. बंडखोरांनीं हल्ला चढविला तर त्याची जिज्ञासा आतां कोणास राहिली नव्हती. वेळ आतां जात नव्हता. बेलोगोर्स्क किल्ल्यांतील

कांहींच खबर कळत नव्हती. चारी बाजूचे सर्व रस्ते शत्रूंनीं रोखून बंद केले होते. मरीना इवानोवनाचा वियोग माझ्या प्रकृतीस मानवत नव्हता. तिकडे तिचें काय झालें असेल, या कल्पनेनें सुद्धां मला वेदना होत होत्या. रिकामपणचा एकच उद्योग म्हणजे घोड्यावर बसण्याचा. पुगाचेवच्या कृपेनें मला जो घोडा मिळाला होता, तो चांगला होता. जो शिधा मला मिळे, त्यांत त्या उमद्या जनावराची भागी होती. दररोज घोड्यावर बसून मी गांवाबाहेर जात असे. शत्रूच्या घोडेस्वाराशीं माझ्या दररोज चकमकी होत असत. या अशा चकमकींत हटकून शत्रुसैन्याचीच सरशी होत असे. कारण शत्रूकडे अन्नपाण्याची ददात नव्हती. दारूचा तुटवडा नव्हता. आणि त्यांचे घोडे पण चांगले मजबूत होते. उपासमारीमुळें मरतुकड्या झालेल्या घोड्यांवर बसून आमचे घोडेस्वार शत्रूच्या घोडेस्वारांशीं सामना करायला असमर्थ ठरत. उपासमारीनें गांजलेले आमचें पायदळ किल्ल्याबाहेर पडून शत्रूवर चालून जाई. पण एक तर बंडखोरांचे घोडेस्वार मैदानभर विखुरलेले असत. आणि बर्फामुळें आमच्या सैन्याच्या हालचालीला अडथळा होत असे. यामुळें आमचें पायदळ शत्रूचें फारसें नुकसान करूं शकत नव्हतें. तटबंदीच्या बुरुजांवरून आमच्या तोफा व्यर्थच गरजत असत. तोफांचे गाडे बाहेर मैदानांत न्यावेत, तर ते बर्फाच्या राशींत रुतून बसत. आणि आमच्याकडचे मरतुकडे घोडे नेट लावून गाडे ओढण्यास बिलकूल राजी नसत. आमच्या लष्करी हालचालींचा हा असा प्रकार होता. आणि ओरेनबुर्गचा अधिकारी वर्ग हेंच धोरण शहाणपणाचें आणि दूरदर्शीपणाचें मानीत होता.

एकदां आम्ही शत्रूच्या एका मोठ्या तुकडीला कसें तरी पिटाळून लावलें. त्यावेळीं सैन्यापासून अलग पडलेल्या एका कझाक सैनिकावर मी त्वेषानें तुटून पडलों. माझ्या हातांतील तुर्की तलवारीनें मी त्याच्यावर वार हाणणार, तेवढ्यांत त्यानें आपल्या डोक्यावरची टोपी काढून हातांत घेतली आणि ओरडून विचारलें, --' प्योत्र आंद्रेइच, काय ? कसं काय चाललं आहे ? '

त्याच्याकडे बघून मी मोठ्यानें ओरडलों,--' कोण ? मक्सिमिच ? '—होय तो आमचा सार्जंटच होता.—' अरे, तूं इथें कसा ? इकडे कधीं आलास ? '

' कालच आलों. प्योत्र आंद्रेइच, तुझ्यासाठीं एक चिठ्ठी आणली आहे मी.'

' कुठें आहे ? '—मी ओरडून विचारलें. पण त्या तशा वेळीं त्या प्रश्नाची माझी मलाच लाज वाटली.

' ही तुझी चिठ्ठी घे. ' असें म्हणून मक्सिमिचनें खमीसाच्या खिशांत हात घातला.

' काय वाटेल तें करून तुला ही चिठ्ठी पोंचवतों, असं मी पलाशाला वचन दिलं होतं.'--चोळा मोळा झालेली एक चिठ्ठी त्यानें माझ्या हातांत टाकली आणि घोड्याला टांच मारून तो तेथून पसार झाला. मला धीर नव्हता. लगेच तेथल्या तेथेंच चिठ्ठी उलगडून घाईघाईनें मी मजकुरावरून नजर फिरविली :

—' माझ्या मातापितरांचं काय झालं, हें तर तुला माहितच आहे. देवाचीच तशी इच्छा होती. आतां जगांत मला आप्त म्हणून कोणी नाहीं. आतां तुझ्यावरच काय तो माझा भरीभार आहे. संकटांत सांपडलेल्यांना मदत करायचा तुझा स्वभाव आहे. आणि माझ्याविषयीं तुला काय वाटतं, तें पण मला माहित आहे. हें पत्र तरी निदान तुझ्या हातांत पडो, म्हणून मी देवाची प्रार्थना करीत आहे. मक्सिमिच म्हणाला कीं हें पत्र मी तुला नक्कीच देतो. पलाशाला तो सांगत होता कीं प्रत्येक हल्ल्याच्या वेळीं बेदरकारपणानं तूं पुढें घुसतोस. आणि जिवाची तमा न करतां तूं लढतोस. चकमकीच्या वेळीं त्यानं तुला पुष्कळ वेळां पाहिलं आहे, असं तो सांगत होता. डोळ्यांत पाणी आणून तुझ्या खुशालीसाठीं जे कोणी रात्रंदिवस देवाची प्रार्थना करतात, त्यांचा विचार तूं कधीं केला आहेस कां? तूं इथून गेल्यावर बरेच दिवस मी आजारी होतें. मला बरं वाटायला लागलं, तशी श्वाब्रिननं फादर गेरासिमच्या घरांतून मला बाहेर काढलं. फादर गेरासिम तसा सहजीं बधणारा मनुष्य नाहीं. पण श्वाब्रिन माझ्या वडिलांच्या जागीं कमांडंट म्हणून काम करतो आहे. तुला हें माहितच आहे, म्हणा. तेव्हां त्याचा हुकुम मानण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. नाहीं तर तुझ्या विरुद्ध पुगाचेवकडे रिपोर्ट करीन, म्हणून त्यानें गेरासिमला धमकी दिली. सध्यां आमच्याच जुन्या घरांत पहारेकरांच्या बंदोबस्तांत त्यानं मला ठेवलं आहे. मी त्याच्याशीं लग्न करावं, म्हणून त्यानं मला धारेवर धरलं आहे. तो मला रोज सांगतो कीं मी तुला वांचवलं, म्हणून.—अकुलिना पांफिलोवनानं मी तिची भाची आहे, म्हणून पुगाचेवजवळ बतावणी केली, त्या वेळीं सारं कांहीं मला माहित असून मी बोललो नाहीं.— पण त्याच्या सारख्या माणसाशीं लग्न करण्यापेक्षां मी तेव्हांच मेलें असतें, तरी बरं झालं असतं, असं आतां वाटतं. इथें त्यानं माझा असह्य छळ चालवला आहे. तो मला म्हणतो कीं, तूं जर माझ्याशीं लग्न केलं नाहीं, तर मी तुला बंडखोरांच्या स्वाधीन करीन. आणि मग लिझावेता खारलोवासारखी तुझी गत होईल. विचार करण्यासाठीं मी त्याच्याकडून थोडी मुदत मागून घेतली आहे.—आणखी तीन दिवस वाट पाहीन आणि तूं नकार दिला, तर मग मात्र दया माया कांहीं दाखवणार नाहीं;—असं त्यानं मला निक्षून सांगितलं आहे. प्योत्र आंद्रेइच, आतां मला तुझाच काय तो एक आधार आहे. माझं रक्षण कर, म्हणून ही दुर्दैवी मुलगी तुझी करूणा भाकते आहे. तेव्हां जनरलला आणि इतर सर्व कमांडर्सना सांगून शक्य तेवढ्या लवकर आम्हांला येथें मदत पाठवायास सांग. आणि शक्य असेल तर तूंहि ये. ही पोरकी पोर आणखी काय लिहिणार?

तुझीच,

**मरीया मिरोनोवा**

तें पत्र वाचतां क्षणीं माझ्या डोळ्यांसमोर अंधारी आली. एकदम कांहीं सुचेनासें झालें. घोड्याला टांच मारून मी लगेच शहराकडे मोर्चा वळविला. त्या दिवशीं विनाकारण क्रूरपणानें मी घोड्याला बेदम मारहाण केली. माशाची सुटका कशी करावी, याच्याच योजना माझ्या डोक्यांत घोळत होत्या. पण कसला मार्ग म्हणून दिसत नव्हता. घोडा भरधांव पिटाळून मी तडक जनरलचें घर गांठलें. आणि एकदम त्याच्या पुढ्यांत जाऊन उभा राहिलों. तोंडांत पाइप धरून जनरल आपल्या खोलींत येरझारा घालीत होता. मला पाहतांच तो थबकून उभा राहिला. मी एकदम न सांगतां सवरतां त्याच्या पुढ्यांत जाऊन उभा राहिलों, या गोष्टीचें त्याला आश्चर्य वाटलें. आणि मी इतक्या उतावळेपणानें कां आलों, म्हणून त्यानें कळकळीनें विचारणा केली. मी लगेच म्हणालों,—'मी तुम्हांला बापाच्या ठिकाणीं मानतों. एक विनंति करायला आलों आहे मी. माझ्या जन्माचं सारं सुख धोक्यांत आहे.'

'काय झालं? नीट सारं काय तें सांग.'—आश्चर्यचकित झालेला तो वयोवृद्ध सेनानी म्हणाला.—'मी काय करावं, अशी तुझी इच्छा आहे? स्वस्थपणानं काय तें सांग.'

'कांहीं नाहीं. आत्तांच्या आत्तां सैन्याची एक तुकडी आणि कांहीं कझाक माझ्या हवालीं करा. मी लगेच बेलोगोर्स्कवर चालून जातों. आणि आजच्या दिवसांत शत्रूचा फडशा पाडतों.'

जनरलनें माझ्याकडे रोखून पाहिलें. काय, या माणसाला वेडबिड तर लागलें नाहीं ना, असा भाव त्याच्या नजरेंत होता. खरें म्हणजे, त्याचें निदान फारसें चुकलेलें नव्हतें. चमकून त्यानें विचारलें,—'काय म्हणालास? तूं चालून जाणार?'

'होय महाराज, नुसता चालून जाणार, एवढंच नाहीं, तर विजयाची मी खात्री देतों. फक्त मला जायची परवानगी द्या!'

'तें शक्य नाहीं.'—मान हलवून तो म्हणाला,—'तूं अजून लहान आहेस. तुला इतक्या दूरवर जायचं आहे. तेव्हां इथल्या मुख्य ठाण्याशीं तुझा संबंध तोडून टाकणें, आणि तुझ्यावर पूर्णपणें मात करणें, शत्रूला कठीण जाणार नाहीं. आणि रस्ते रोखून धरल्यानंतर...'

आतां बहुतेक युद्धशास्त्राचे सारे नियम तो मला समजावून सांगणार आणि एक भलें मोठें व्याख्यान झोडणार, अशी धास्ती मला वाटली. म्हणून धीर करून मध्येंच मी त्याचें भाषण तोडलें,—'हें बघा, कॅप्टन मिरोनोवच्या मुलीनं मला एक पत्र लिहिलं आहे. ती फार संकटांत आहे. तिला मदत हवी आहे. श्वाब्रिन बळजबरीनें तिच्याशीं लग्न करणार आहे.'

'असं? हा श्वाब्रिन महा हलकट माणूस आहे. मला माहित आहे. माझ्या तावडींत कधीं सांपडला, तर चोवीस तासांत मी त्याच्यावर खटला भरीन. आणि लगेच इथल्या चौकांत गोळ्या घालून त्याला ठार करीन...पण सध्यां आपण धीरानं घ्यायला हवं.'

‘धीरानं घ्यायला हवं!’—मी पिसाटासारखा ओरडलों,—‘पण मधल्या काळांत तो मरीया इवानोवनाशीं लग्न करून मोकळा होईल !’

‘हात्तिच्या !’—जनरल म्हणाला,—‘मग त्यांत वाईट तें काय आहे? सध्यां तिनं श्वाब्रिनशीं लग्न केलं तर बरं होईल. तो तिचा कांहीं काळ सांभाळ करील. आणि आपण जेव्हां त्याला ठार करूं, तेव्हां तिच्यासाठीं दुसरा नवरा शोधूं. सुंदर विधवांना जास्त दिवस बिनलग्नाचं राहवंच लागत नाहीं. मी तर असंहि म्हणेन कीं कुमारिकेपेक्षां सुंदर विधवानांच लवकर नवरा मिळतो!’

‘तिला श्वाब्रिनच्या स्वाधीन करण्यापेक्षां माझें मरणच परवडेल मला!’—मी संतापानें ओरडलों.

‘अरेच्या! अशी भानगड आहे काय?’—जनरल हेल काढून म्हणाला.—‘आतां माझ्या लक्षांत आलं. तुझं मरीया इवानोवनावर प्रेम आहे तर! तसं असेल तर गोष्ट वेगळी. तरी पण कांहीं झालं तरी मी तुझ्याबरोबर सैन्याची तुकडी आणि कझाक देणार नाहीं. अशा प्रकारची मोहीम म्हणजे पोरखेळ ठरेल नुसता. ही भलती जोखीम मी मुळींच घेणार नाहीं.’

खालीं मान घालून मी स्तब्ध उभा राहिलों. सर्व बाजूनीं निराशेचा काळोख दाटला होता. एकदम एक विलक्षण कल्पना माझ्या मनांत चमकून गेली. कल्पना कोणती ती जाणून घ्यावयाची असेल तर त्यासाठीं पुढील प्रकरण वाचा, असें कांहींतरी जुन्या पिढींतील कादंबरीकार लिहीत असत. आतां मला तसेंच लिहिणें भाग आहे.

---

# प्रकरण अकरावें

## बंडखोरांचें खेडें



सिंहानें नुकतेंच आपलें खाणें संपविलें होतें.
तो स्वभावतःच क्रूर असला तरी त्यानें नम्रपणें विचारलें,
'माझ्या गुहेंत कां येणं केलंत तुम्ही ?'

—ए. सुमारोकोव

जनरल साहेबांचा निरोप घेऊन घाईघाईनें मी माझ्या घरीं आलों. सावेलिचने नेहमीप्रमाणें तक्रारीच्या सुरांत माझे स्वागत केलें.—'काय हें ? मी रोज बघतों आहे. त्या दारुड्या लुटारूंशीं झटापट करायला तुम्ही रोज जातांच आहांत. सभ्य लोकांनी कां असं करावं ? समजा, तुमचं जर कांहीं बरं वाईट झालं तर उगीचच जीव दिल्यासारखं होईल. तुर्की किंवा स्विडीश शत्रूंशीं सामना असतां, तर गोष्ट वेगळी. पण ज्या बदमाषांशीं तुम्हीं लढतां आहांत, त्यांचं नांव काढायची सुद्धां लाज वाटतें मला !'

त्याचें बोलणें मध्येंच तोडून मी त्याला विचारलें—'तें राहून दे. आधीं तूं मला असं सांग, तुझ्याजवळ पैसे किती आहेत ?' —'कसले पैसे घेऊन बसला आहांत ?' —तो हंसत हंसत म्हणाला.—'चोरासोरांनीं काय होतं नव्हतं तें धन लुटून नेलं.'—असं म्हणून त्यानें खमीसाच्या खिशांत हात घातला. आणि एक थैली बाहेर काढली. चांदीच्या नाण्यांनीं ती कांठोकांठ भरलेली दिसत होती. तो म्हणाला,—'हे एवढे पैसे मी लपवून ठेवले होते. तेवढे वांचले बघा.'—'ठीक आहे.'—मी म्हणालों—'त्यांतले अर्धे मला दे. बाकीचे तुझ्याजवळच असूं दे. मी आतां बेलोगोर्स्कला जातों आहे.'

'प्योत्र आंद्रेइच, धनी,'—माझा दयाळू शिक्षक म्हणाला. त्याचा कंठ दाटून आला होता.—'असं कांहीं करूं नका. सारे रस्ते बंडखोरांच्या टोळक्यांनीं रोखले आहेत. अशा वेळीं तुम्ही जाणार तरी कसे ? तुम्हांला स्वतःविषयीं कांहीं वाटत नाहीं; पण तुमचे म्हातारे आईबाप आहेत. निदान त्यांचा तरी विचार करा. आणि जायचं तरी कां ? कशासाठीं ? थोडे दिवस वाट पहा. आपलं सैन्य

येईल. आणि त्या दरोडेखोरांचा बंदोबस्त करील. मग तुम्हांला जायचं असेल तिकडे खुशाल जा.'

पण माझा बेत पक्का ठरला होता.—'आतां वाद घालून कांहीं फायदा नाहीं.'—मी म्हणालों,—'मला जाणें भाग आहे आणि मी जाणारच. तूं कशाला दुःख करतोस? देवाच्या दयेनं पुन्हां भेट होईलच आपली. आणि हें पहा, काटकसर करण्याच्या भानगडींत पडूं नकोस. किंमती कितीहि चढल्या तरी हरकत नाहीं. तुला जें कांहीं लागेल, तें विकत घे. हे पैसे मी तुला देऊन टाकतों. जर मी तीन दिवसांत परत आलों नाहीं...'

'तुम्ही म्हणतां तरी काय?'—मला बोलूं न देतांच सावेलिच ओरडला.—'मी तुम्हांला एकट्याला जाऊं देईन होय? अशी गोष्ट स्वप्नांत सुद्धां आणूं नका. तुम्ही जायचं ठरविलंच आहे, तेव्हां मीहि येईन तुमच्याबरोबर. गरज पडल्यास पायीं चालत येईन. पण मी तुम्हांला कधींहि सोडणार नाहीं. तुम्ही इथें नसतांना मी एकटाच या दगडी किल्ल्यांत मजेंत बसून राहीन, असं वाटतं तरी कां तुम्हांला? तुम्हांला वाटत असेल, मला वेड लागलं आहे. काय म्हणायचं तें खुशाल म्हणा, धनी. पण मी तुम्हांला एकट्याला जाऊं देणार नाहीं.'

सावेलिचशीं वाद घालण्यांत कांहीं अर्थ नव्हता. म्हणून मी त्याला निघण्याची तयारी करायला सांगितलें. अर्ध्या तासानंतर आम्ही निघालों. मी माझ्या उमद्या घोड्यावर बसलों होतों. आणि सावेलिच एका मरतुकड्या घोड्यावर स्वार झाला होता. शहरांतील एका माणसानें तें घोडं त्याला दिलं होतं. कारण त्याला दाणा-वैरण घालण्याची कूवत त्या माणसांत नव्हती. आम्ही वेशीजवळ आलों. पहारेकऱ्यांनीं आम्हांला जाऊं दिलें. ओरेनबुर्ग सोडून आम्ही बेलोगोर्स्कचा रस्ता धरला.

संध्याकाळ झाली. आमचा रस्ता बेर्दा नांवाच्या खेड्यांतून जात होता. हें खेडें आतां पुगाचेवच्या हातीं होतें. रस्त्यावर बर्फ सांचलेलें होतें. पण घोड्यांच्या टापांच्या खुणा सगळीकडे उमटलेल्या दिसत होत्या. मी माझा घोडा जोरांत दामटला. सावेलिच मागेंच राहिला. आणि तो जोरजोरानें ओरडूं लागला,—'जरा सावकाश, धनी, जरा सावकाश! माझं मरतुकडं घोडं तुमच्या लांबटांग्या सैतानाच्या बरोबरीनं धांवूं शकत नाहीं. पण मी म्हणतों, इतकी घाई तरी काय आहे? आपण जसे काय मेजवानी झोडायलाच जात आहोंत, असंच कुणालाहि वाटेल...पण आपण मृत्यूच्या जबड्यांत जात आहोंत. मी काय म्हणतों तें लक्षांत असूं द्या. प्योत्र आंद्रेइच...धनी...दया करा. अजून तरी माझं ऐका.'

बेर्दा गांवांतील दिवे दिसूं लागले. आम्ही एका छोट्या नदीजवळ येऊन पोंचलों. गांवाला वळसा घालून ती वाहत होती. त्यामुळें गांवाला अनायासेंच संरक्षण मिळाल्यासारखें वाटत होतें. सावेलिच माझ्या मागे होताच. त्याची दयेची याचना चालूच होती. गांवाच्या सीमेवरून आम्ही सुरक्षितपणें पुढें जाऊं, असें मला

वाटत होतें. पण तेवढ्यांत माझ्यासमोर चार पांच शेतकऱ्यांचें टोळकें मला दिसलें. त्यांच्या हातांत काठ्या होत्या. पुगाचेवची ही चौकी होती. त्या शेतकऱ्यांनीं आम्हांला हांका मारल्या. परवलीचा शब्द मला माहित नव्हता. म्हणून मुकाट्यानेंच पुढें जाण्याचा माझा विचार होता. पण त्यांनीं मला घेरलें. एकानें माझ्या घोड्याचा लगाम धरला. मी माझी तलवार उपसली. आणि त्या माणसाच्या डोक्यावर वार केला. त्याच्या टोपीमुळें त्याला इजा झाली नाहीं. पण तो खाली कोसळला. आणि त्यानें घोड्याचा लगाम सोडून दिला. बाकीचे सर्वजण गोंधळून गेले व पळत सुटले. त्या संधीचा फायदा घेऊन मी घोड्याला टांच मारली आणि तेथून निसटलों.

रात्रीच्या अंधारामुळें कदाचित् मी निसटून गेलों असतों. पण एकदम मी मागें पाहिलें, तेव्हां सावेलिच मला दिसला नाहीं. आपल्या लंगड्या घोड्यामुळें बिचाऱ्याला बंडखोरांच्या हातून निसटतां आलें नसावें. आतां काय करावें ? मी एकदोन मिनिटें वाट पाहिली व त्याला पकडून ठेवण्यांत आलें आहे, अशी खात्री करून घेतल्यावर त्याच्या मदतीसाठीं मी घोडा परत फिरवला.

मी नदीजवळ येऊन पोंचलों, तेव्हां दूर कुठें तरी आरडाओरडा चालू असल्याचें मी ऐकिलें. त्यांत सावेलिचचा आवाज मी ओळखला. मी घोडा जोरांत दामटला. आणि ज्यांनीं मला थोड्या वेळांपूर्वीच अडवलें होते, त्या शेतकऱ्यांच्या घोळक्यांत येऊन पोंचलों. सावेलिचला त्यांनीं घेरलें होतें आणि घोड्यावरून खालीं खेंचलें होतें. त्याला आतां ते बांधणार, तेवढ्यांत मी तेथें पोंचलों. मला पाहून त्यांना आनंद झाला आणि सर्वजणच आरडाओरडा करीत माझ्या अंगावर धांवले. एका क्षणांत त्यांनीं मला खालीं खेंचलें. त्यांच्यापैकीं एकजण—तो त्यांचा पुढारी असावा—म्हणाला,—'आतां मी लगेच तुम्हांला झारकडे घेऊन जातों. तुम्हांला लगेच फांशीं द्यायचं कीं उद्यांपर्यंत थांबायचं, तें झारच ठरवील.' —मी विरोध केला नाहीं. सावेलिचनें माझेंच अनुकरण केलें. आणि मग मोठ्या विजयोन्मादानें आम्हांला घेऊन ते झारकडे निघाले.

नदीच्या दुसऱ्या कांठावर चढून आम्हीं गांवांत शिरलों. झोंपड्यांत दिवे जळत होते. आरड्याओरड्यानें सर्व वातावरण भरून गेलें होतें. रस्त्यांत लोकांचे जमाव हिंडत होते. पण काळोख इतका दाटला होता कीं कुणीहि आमच्याकडे लक्ष दिलें नाहीं, किंवा मी ओरेनबुर्गचा अधिकारी म्हणून ओळखलें नाहीं. हमरस्त्याला एक झोंपडी होती. तिकडे आम्हांला नेण्यांत आलें. झोंपडीच्या दाराजवळ दारूचीं कांहीं पिपें व दोन तोफा होत्या.—'हाच आमच्या झारचा राजवाडा.'—आम्हांला धरून नेणाऱ्या शेतकऱ्यांपैकीं एकजण म्हणाला,—'मी आतां आंत जातों आणि तुमची वर्दी देतों.'—तो आंत गेला. मी सावेलिचकडे पाहिलें, तर म्हातारा आपल्या अंगावर क्रूसाची खूण करीत होता व प्रार्थना पुटपुटत

होता. आम्हांला बराच वेळ वाट पाहवी लागली. शेवटीं तो शेतकरी बाहेर आला आणि म्हणाला,—' जा आंत. झारनं सांगितलं आहे कीं कोण ऑफिसर आहे, त्याला आंत लावून दे. '

मी त्या झोपडींत, किंवा शेतकऱ्यांच्या शब्दांत सांगावयाचें झाल्यास, राजवाड्यांत शिरलों. तेथें दोन मेणबत्त्या जळत होत्या व भिंतीला कथलाचा वर्ख लावलेला होता. बाकीचें सर्व सामान नेहमीचेंच होतें. बांक, एक टेबल, हात धुण्याचें भांडें, खिळ्यावर एका टावेल, एका कोपऱ्यांत उभ्या करून ठेवलेल्या विस्तव सारण्याच्या सळया आणि एका रुंद दगडी कट्ट्यावर ठेवलेलीं गाडगीं-मडकीं. एवढेंच सामान त्या खोलींत होतें. एका कोपऱ्यांत एक प्रतिमा होती व पुगाचेव तिच्यासमोर एका खुर्चीवर बसला होता. त्याच्या अंगांत लाल झगा होता. डोक्यावर उंच टोपी होती आणि आपले हात त्यानें कमरेवर ठेवलेले होते.

त्याच्याजवळ त्याचे प्रमुख साथीदार उभे होते. त्यांनीं कमालीचा आज्ञाधारकपणा धारण केलेला दिसत होता. ओरेनबुर्गच्या एका अधिकाऱ्याला पकडून आणलें आहे, या बातमीनें बंडखोरांत अतिशय कुतूहल निर्माण केलें होतें, असें दिसलें. आणि म्हणूनच दरबारी थाटांत माझें स्वागत करण्याची त्यांनीं तयारी केली होती. पुगाचेवनें मला ताबडतोब ओळखलें. तोंडावरचा गांभीर्याचा बुरखा झुगारून देऊन तो हंसतहंसत म्हणाला,—'ओ हो ! कोण ? तुम्ही काय ? कां येणं केलंत इकडं ?'—मी सांगितलें कीं माझ्या खाजगी कामासाठीं मी जात होतों, आणि रस्त्यांत तुमच्या लोकांनीं मला अडकवून ठेवलें.—' पण कसलं काम ? '—त्यानें पृच्छा केली. त्याला कसें उत्तर द्यावें, हेंच मला कळेना. पुगाचेवला वाटलें कीं तेथें असलेल्या लोकांसमोर बोलण्याचा मला संकोच वाटत असावा. म्हणून आपल्या साथीदारांना खूण करून त्यानें सगळ्यांना बाहेर काढलें. सर्वजण बाहेर पडले. पण दोघेजण मात्र तिथेंच बसून राहिले. ते कांहीं जागचे हलेनात.—' तुम्हांला काय सांगायचं आहे, तें यांच्यासमोर सांगू शकतां,'—माझ्याकडे वळून पुगाचेव म्हणाला.—' यांच्यापासून मी कांहींच गुप्त ठेवीत नाहीं.'—पुगाचेवच्या त्या दोन साथीदारांकडे मी तिरप्या नजरेनें पाहिलें. त्यांच्यापैकीं एकजण खुज्या बांध्याचा, कमरेंत वांकलेला म्हातारा होता. त्याच्या दाढीचे केस पिकलेले दिसले. त्याच्या लोंकरीच्या कोटावर एक निळी फीत होती. त्याखेरीज नजरेंत भरण्यासारखें त्याच्याजवळ कांहींच नव्हतें. पण त्या दुसऱ्याला मात्र मी जन्मभर विसरणार नाहीं. तो मला दांडगा, उंचापुरा, मजबूत बांध्याचा आणि रुंद छातीचा होता. त्याचें वय पंचेचाळीसच्या जवळपास असावें. त्याची दाढी दाट व लालभडक होती. डोळे करड्या रंगाचे आणि चमकदार होते. नाकाच्या ठिकाणीं फक्त दोन भोकें होतीं. कपाळावर आणि गालांवर लाल चट्टे होते. या सर्वांमुळें देवीचे वण असलेल्या त्याच्या रुंद चेहऱ्यावर कपटीपणाचे

भाव उमटलेले दिसत होते. त्याच्या अंगांत लाल खमीस होता. त्यावर त्यानें किरगीझ झगा चढवला होता व तुमान कझाक फॅशनची होती. त्यांचीं नांवें मला मागाहून समजलीं. पहिला जो माणूस होता, त्याचें नांव बेलोबोरोदोव होतें. तो सैन्यांत कॉर्पोरेल होता. पण तेथून पळून आला होता. दुसऱ्याचें नांव अफानासी सोकोलोव होतें. हा गुन्हेगार सैबेरियाच्या खाणींतून तीन वेळा निसटून आला होता. ख्लोपुशा या टोपण नांवानें तो ओळखला जात असे. त्या वेळीं माझ्या मनांत निराळ्याच भावनांचें प्राबल्य होतें. तरी पण अगदींच अचानकपणें घडून आलेल्या या भेटीचा माझ्या मनावर बराच परिणाम झाला. तेवढ्यांत पुगाचेवनें विचारलेल्या प्रश्नामुळें मी भानावर आलों.—' हं. बोला आतां. ओरेनबुर्ग सोडून इकडे येण्यचं कारण काय ? '

त्या वेळीं एक विलक्षण विचार माझ्या मनांत चमकून गेला. मला वाटलें कीं दैवानें जेव्हां दुसऱ्यांदा मला पुगाचेवच्या भेटीस पाठविलें आहे, तेव्हां या वेळीं सुद्धां मला माझ्या मनांतील हेतु साध्य करण्याची संधि मिळालेली आहे. या संधीचा फायदा घेण्याचें मी ठरविलें आणि माझ्या या निर्णयावर विचार करण्यांत वेळ न घालवितां मी पुगाचेवला सांगून टाकलें,

' मी बेलोगोर्स्कला जात होतों. तिथें एका पोरक्या पोरीचा छळ करण्यांत येत असून तिच्या मदतीसाठीं मी निघालों होतों. '

पुगाचेवचे डोळे चमकले. त्यानें ओरडून विचारलें,—' पोरक्या पोरीचा छळ करणारा हा आहे तरी कोण ? कोल्ह्यासारखा लुच्चा असला तरी तो न्यायाच्या तडाख्यांतून सुटणार नाहीं. बोला, कोण आहे तो हरामखोर ? '

' श्वाब्रिन.'—मी उत्तर दिलें.—' तुम्ही फादर गेरामिसच्या घरीं पाहिलेल्या आजारी मुलीला त्यानं डांबून ठेवलं आहे. आणि तिच्याशीं तो बळजबरीनं लग्न करूं पाहत आहे. '

' श्वाब्रिनला चांगलाच धडा शिकवितों.'—पुगाचेव धमकावणीच्या सुरांत म्हणाला.—' हुकूम नसतांना कोणतंहि काम करण्याचे, माझ्या प्रजेला छळण्याचे परिणाम काय होतात, हें दाखवतोंच त्याला. त्याला फांसावर लटकावीन. '

' जरा माझं ऐकाल कां ? '—ख्लोपुशा घोगऱ्या स्वरांत म्हणाला.—'कमांडरच्या जागीं श्वाब्रिनची नेमणूक करण्याची तुम्हांला घाई झाली होती. आणि आतां त्याला फांसावर लटकावण्याचीहि घाई झाली आहे तुम्हांला. अगोदरच कझाकांच्या डोक्यावर एका उमरावाला नेमून तुम्ही त्यांचा अपमान केला. आतां पहिल्याच आरोपाच्या आधारानें त्याला फांशी देऊन उमरावांच्या मनांत तुम्ही किल्मिष निर्माण करीत आहांत. '

'उमरावांची गय करण्याचं किंवा त्यांना बढती देण्याचं कांहींच कारण नाहीं,'—निळी फीत घातलेला तो म्हातारा म्हणाला.—'श्वाब्रिनला फाशीं दिलं, तर कांहीं बिघडणार नाहीं. पण या ऑफिसरची कसून तपासणी केली पाहिजे. हे महाशय इथं कां आले ? हा जर तुम्हांला आपला झार मानीत नाहीं, तर तुमच्याकडे न्याय मागण्याचा त्याला काय अधिकार आहे ? आणि समजा, तो तुम्हांला झार मानतो, तर इतके दिवस ओरेनबुर्गमध्यें तुमच्या शत्रूंजवळ राहून हा काय करीत होता ? त्याला जरा माझ्या स्वाधीन करा. त्याला ठाण्यावर नेतों अन् तापलेल्या सळयांनीं डागण्या देतों. माझी अशी खात्री आहे कीं, ओरेनबुर्गच्या अधिकाऱ्यांनीं याला इथें हेरगिरीसाठींच पाठवलं असलं पाहिजे !'

त्या थेरड्याचा तर्क कुणालाहि पटण्यासारखा होता, असें मला वाटलें. मी आतां कुणाच्या तडाख्यांत सांपडलों आहे, या विचारानेंच माझें रक्त गोठून गेलें. माझी अवस्था पुगाचेवच्या लक्षांत आली असावी.—'काय महाराज, '—डोळे मिचकावीत तो म्हणाला,—'मला वाटतं, आमच्या फील्ड-मार्शलच्या बोलण्यांत बरंच तथ्य आहे. यावर काय म्हणणं आहे तुमचं ?'

पुगाचेवच्या टोमण्यानें मला धीर आला. मी शांतपणानें उत्तर दिलें कीं मी आतां तुमच्या हातांत आहे. तेव्हां तुम्हांला जें बरें दिसेल तें करा.

'ठीक आहे.'—पुगाचेव म्हणाला.—'आतां हें सांगा कीं ओरेनबुर्गची काय हालहवाल आहे ?'

'देवाच्या दयेनं तिथं सारं कांहीं ठाकठीक आहे.'—मी उत्तर दिलें.

'अस्सं ?'—पुगाचेवनें विचारलें.—'उपासमारीनं तिथं लोक मरत आहेत. खरं ना ?'

त्या तोतया झारचें म्हणणें खरें होतें. पण मी राजनिष्ठेस जागलों. आणि दणकून सांगितलें कीं या अफवा खोट्या आहेत. ओरेनबुर्गमध्यें अन्नधान्याचा भरपूर पुरवठा आहे.

'बघितलंत ?'—तो थेरडा छद्मीपणानें म्हणाला.—'तुमच्या तोंडावर हा खोटं बोलत आहे. तिथून पळून आलेले सारे लोक सांगतात कीं तिथं उपासमार चालू आहे, रोगराई पसरली आहे, मुरदाड मांस खाऊन लोक जगत आहेत, आणि दुसरें कांहींच नसल्यामुळें हें मांस मिळालें तर त्यांना आनंद होतो. पण हा माणूस शपथेवर सांगतो तो ओरेनबुर्गमध्यें चंगळ आहे म्हणून. तुम्ही श्वाब्रिनला फांसावर लटकावणार असाल, तर या जवान मर्दालाहि त्याच फांसावर चढवा. म्हणजे कुणालाच तक्रार करावयास जागा राहणार नाहीं.'

त्या डांबिस म्हाताऱ्याच्या बोलण्यानें पुगाचेवच्या मनावर परिणाम झालेला दिसला. पण सुदैवानें ख्लोपुशानें म्हाताऱ्याच्या म्हणण्यास हरकत घ्यायला सुरवात केली. तो म्हणाला,—'बस झालं तुझं, नौमिच. प्रत्येकालाच फांसावर लटकावयाच्या मागें आहेस तूं! अरे, जरा स्वतःकडे तर पाहशील? काय शरीर पण स्वारीचं! हाडांचा सांपळा आहे नुसता. कोणत्या दिवशीं थडग्यांत जाशील याचा नेम नाहीं. पण दुसऱ्यांना ठार करण्याला मात्र नेहमीं तयार! आजवर रक्त सांडलंस, तेवढं पुरेसं नाहीं वाटतं?'

'आणि तूं मोटा साधूच लागून गेला आहेस कीं नाहीं?' —बेलोबोरोदोवनें टोमणा मारला.—'एकदम असा कळवळा कुठून आला तुला?'

'मी पापी आहे, हें माहित आहे मला.' —ख्लोपुशानें उत्तर दिलें,— 'आणि या हातानं,'—(असें म्हणून त्यानें आपल्या हाडकुळ्या हाताची मूठ वळून झग्याची बाही वर सारली व खांद्यापर्यंतचा केसाळ हात उघडा केला) —'अनेक ख्रिस्ती लोकांचं रक्त सांडलं आहे. पण मी शत्रूंना ठार केलं, पाहुण्यांना नव्हे. माझ्या शत्रूला मी भर रस्त्यांत किंवा दाट जंगलांत ठार करतों. घरीं शेकोटीजवळ बसलेल्या लोकांवर मी कधींच हात टाकीत नाहीं. मी दंडुक्यानें किंवा कुऱ्हाडीनें ठार करतों, अशा म्हाताऱ्या बायक्यांसारख्या चहाड्याचुगल्या करून नव्हे.'

म्हाताऱ्यानें तोंड फिरविलें व तो पुटपुटला,—'नकटा कुठचा!'

'काय बडबडतो आहेस रे, थेरड्या?'—ख्लोपुशा खवळून ओरडला,— 'थांब, तुला दाखवतोंच नकट्याचा इंगा. तुझी पण वेळ येईल. तापलेल्या सळयांची मजा तुला सुद्धां दाखवीन. तोंपर्यंत जरा जपून राहा. नाहींतर दाढीच उपटून काढीन तुझी!'

'अरे, अरे काय मांडलं आहे तुम्ही?'—पुगाचेव रुबाबांत म्हणाला,—'पुरे हें भांडण. ओरेनबुर्गचे सारे कुत्रे एकाच फांसावर लटकावले, तर त्याला माझी ना नाहीं. पण आपल्याच कुत्र्यांनीं एकमेकांच्या अंगावर धांवणं कांहीं बरं नाहीं. चला, आतां समेट करा पाहूं!'

ख्लोपुशा आणि बेलोबोरोदोव कांहीं न बोलतां एकमेकांकडे उदास नजरेनें पाहूं लागले. संभाषणाचा विषयच बदलण्याचें मी ठरविलें. कारण हें संभाषण असेंच चालूं राहिलें असतें तर परिणामीं मलाच तें घातक ठरलें असतें. म्हणून पुगाचेवकडे वळून हंसत हंसत मी म्हणालों,—'अरे, तुम्ही मला घोडा व ओव्हर कोट दिला, त्याबद्दल तुमचे आभार मानण्याचं विसरूनच गेलों होतों मी. तुमच्यामुळें खैर झाली. नाहींतर ओरेनबुर्गला पोंचणं शक्यच झालं नसतं मला. रस्त्यांतच गारठून मेलों असतों मी.'

माझी युक्ति सफल झाली. पुगाचेव खुशींत आला. डोळे मिचकावीत तो म्हणाला,—' एकदां कुणाचं भलं केलं कीं दुसऱ्यांदांहि केलं पाहिजे. असो. पण आतां मला हें सांगा कीं श्वाब्रिन ज्या मुलीचा छळ करीत आहे ती तुमची कोण? प्रेयसी तर नाहीं ना ?'

' मी तिच्याशीं लग्न करणार आहे. '—मी उत्तर दिलें. वातावरणांत अनुकूल बदल झाला होता आणि खरें काय तें लपवून ठेवण्याची आतां गरज नव्हती.

' काय ? तिच्याशीं लग्न करणार ? '—पुगाचेव ओरडून म्हणाला,—' मग अगोदरच कां सांगितलं नाहीं मला ? मी तुमचं लग्न लावून देईन, आणि लग्नाची मेजवानी पण झोडीन. '—नंतर बेलोबोरोदोवकडे वळून तो म्हणाला,—' हें पहा, फील्ड-मार्शल, यांची अन् माझी जुनी ओळख आहे. आपण सर्व बरोबरच जेवण घेऊं या. शहाणपण सकाळीं येतं. तेव्हां यांना काय सजा करायची तें उद्यांच ठरवूं या. '

हा सन्मान स्वीकारण्यास मी मोठ्या आनंदानें नकार दिला असता. पण त्यावेळीं तसें करणें शक्य नव्हतें. त्या झोपडीच्या मालकाच्या दोन मुलींनीं टेबलावर पांढरी चादर टाकली. आणि त्यावर ब्रेड, मांसळीचें सूप आणि वोदकाच्या बाटल्या आणून ठेवल्या. आणि पुन्हां एकदां पुगाचेव व त्याचे जे भयंकर साथीदार यांच्या-बरोबर मी जेवण घेतलें.

जेवणानंतर दारूच्या धुंदींत सुरू झालेला धांगडधिंगा रात्रभर चालू होता. आणि नाखुशीनें तें सर्व पाहणें मला भाग होते. शेवटीं त्यांच्यावर दारूचा अंमल इतका चढला कीं ते निचेष्ट पडले. पुगाचेव खुर्चीत डुलक्या घेऊं लागला. त्याच्या साथीदारांनी मला बाहेर चलण्याची खूण केली व मी त्यांच्याबरोबरच झोंपडीच्या बाहेर आलों. ख्लोपुशाच्या हुकुमावरून मला मुख्य ठाण्यावर नेण्यांत आलें. तेथें सावेलिच होता. त्याला आणि मला तेथेंच रात्रभर कोंडून ठेवण्यांत आलें. हा वेळपर्यंत जें कांहीं घडलें होतें, त्यामुळें सावेलिच इतका बधिर झाला होता, कीं त्यानें मला एक सुद्धां प्रश्न विचारला नाहीं. अंधारांत पडल्या पडल्या तो सुस्कारे सोडीत होता व कण्हत होता. शेवटीं तो घोरूं लागला. माझ्या डोक्यांत विचारांनी गर्दी केली होती. त्यामुळें सबंध रात्र मी जागून काढली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं पुगाचेवनें मला बोलावणें पाठविलें. मी त्याच्या झोंपडीकडे गेलों. दाराजवळच एक घसरगाडी होती व तिला तीन तातार घोडे जुंपले होते. रस्त्यांत लोकांची झुंबड उडाली होती. पुगाचेव मला झोंपडीच्या दारांतच भेटला. त्याच्या अंगांत लोंकरीचा ओव्हरकोट व डोक्याला किरगीझ टोपी होती. रात्रीचे त्याचे साथीदार त्याच्या भोंवतीं आज्ञाधारकपणानें उभे होते.

काल रात्रीची त्यांची वागणूक आणि आतांचा हा आज्ञाधारपणा यांतील तफावत मला जाणवली. पुगाचेवनें हंसत हंसत माझें स्वागत केलें व मला घसरगाडींत बसविलें.

आम्ही आपापल्या जागांवर गाडींत बसलों. 'हांक बेलोगोर्स्ककडे.' —पुगाचेवनें आपल्या धिप्पाड तातार गाडीवानाला हुकुम सोडला. माझें अंतःकरण धडधडूं लागलें. घोडे निघाले. त्यांच्या गळ्यांतील घंटा वाजूं लागल्या. घसरगाडी बर्फावरून जोरांत निघाली.

'थांबा ! थांबा !'—कुणीं तरी ओरडलें. तो आवाज माझ्या ओळखीचा होता. सावेलिच आमच्या गाडीमागें पळत येत आहे, हें मी पाहिलें. पुगाचेवनें गाडी थांबवण्याचा हुकुम सोडला.—'प्योत्र आंद्रेइच, धनी !'—सावेलिच ओरडला,—'माझ्या म्हातारपणीं मला एकट्याला सोडून जाऊं नका. मला या हराम—' 'ओ हो! कोण? म्हातारा कां?'—पुगाचेव म्हणाला—'देवाच्या दयेनं आपली पुन्हां भेट झाली म्हणायची. ठीक आहे. बस पुढें गाडीवानाजवळ.'

सावेलिच गाडींत बसला आणि म्हणाला,—'फार उपकार झाले, महाराज, फार उपकार झाले. या म्हाताऱ्यावर दया केल्याबद्दल देव तुम्हांला उदंड औक्ष देईल. मी जन्मभर तुमच्यासाठीं देवाची प्रार्थना करीन. आणि पुन्हां कधीं त्या ससाच्या कातडीच्या कोटाचं नांव म्हणून काढणार नाहीं.'

त्या कोटाचें नांव काढतांच पुगाचेवला राग येणें स्वाभाविक होतें. पण सुदैवानें सावेलिचचे शब्द त्याच्या कानीं गेले नसावेत किंवा जाणूनबुजून त्यानें तिकडे दुर्लक्ष केलें असावें. घोडे भरधांव निघाले. रस्त्यांत लोक थांबत होते व माना वांकवून पुगाचेवला अभिवादन करीत होते. दोन्ही बाजूला वळून पुगाचेव त्यांच्या अभिवादनाचा स्वीकार करीत होता. थोड्याच वेळांत आम्ही खेड्यांतून बाहेर पडलों आणि भरधांव निघालों.

त्यावेळीं माझ्या मनांतील भावनांची कल्पना कुणालाहि सहज येण्यासारखी आहे. जी आपल्याला कायमची मुकली, असें मला वाटत होते, तिची भेट कांहीं घटकांभरांत होणार होती. आमच्या भेटीच्या क्षणाचें चित्र मी माझ्या मनश्चक्षूंसमोर उभें केलें... त्याच वेळीं ज्याच्या हातीं माझें भवितव्य होतें आणि कांहीं विलक्षण योगायोगानें जो गूढपणें माझ्याशीं निगडित होता, त्या माणसाविषयींहि मी विचार करूं लागलों. माझ्या प्रेयसीच्या मुक्ततेचा ज्यानें पत्कर घेतला होता, त्या माणसाचा बेगुमान क्रूरपणा आणि रक्तपिपासु स्वभाव यांचेंहि मला स्मरण झालें. माझी प्रेयसी कॅप्टन मिरोनोवची मुलगी आहे, याची पुगाचेवला कल्पना नव्हती. श्वाब्रिनची निराशा

होणार, हें तर दिसतच होतें. तेव्हां तो पुगाचेवजवळ गुपित फोडील, किंवा अन्य कांहीं मार्गानें पुगाचेवला खरें काय तें समजेल, अशी भीति होतीच. असें झालें तर मरीया इवानोवनाचें काय होईल? या विचारानेंच माझ्या मनाचा थरकांप उडाला व अंगावर शहारे उभे राहिले.

पुगाचेवच्या प्रश्नानें माझ्या विचारांची सांखळी तुटली. तो विचारीत होता, 'कसला विचार करीत आहांत, महाशय?'

'पुष्कळच गोष्टींचा विचार करायचा आहे,'—मी म्हणालों.—'मी ऑफिसर आणि सभ्य माणूस आहे. कालच मी तुमच्याविरुद्ध लढत होतों. पण आज तुमच्या-जवळ मी गाडींत बसलों आहे आणि माझ्या जीवनाचं सारं सुख तुमच्यावर अवलंबून आहे.'

'मग तुम्हांला भीति वाटते कीं काय?'—पुगाचेवनें विचारलें.

मी उत्तर दिलें कीं ज्यानें मला एकदां क्षमा केली आहे, त्याच्याकडून मी दयेचीच नव्हे, तर मदतीची अपेक्षा करीत आहे.

'खरं आहे तें. खरं आहे तुमचं म्हणणं.'—पुगाचेव म्हणाला.—'माझीं माणसं तुमच्याकडे कशी बघत होतीं, पाहिलंत ना? आज देखील तो म्हातारा म्हणत होता कीं तुम्ही हेर आहांत आणि तुमचा छळ करून तुम्हांला फांसावर चढवलं पाहिजे. पण मीच नाहीं म्हणालों.'—सावेलिच व गाडीवान यांना ऐकूं जाऊं नये म्हणून तो हलक्या आवाजांत बोलूं लागला.—'तुम्ही दिलेली वोदका आणि ससाच्या कातडीचा कोट मी विसरलों नाहीं बघा. तुमचे लोक म्हणतात तसा मी कांहीं रक्तपिपासु राक्षस नाहीं.'

पुगाचेवनें बेलोगोर्स्कचा किल्ला घेतला त्या वेळच्या घटना माझ्या नजरेसमोर उभ्या राहिल्या. पण त्याचें म्हणणें खोडून काढणें योग्य होईल असें मला वाटलें नाहीं. म्हणून मी गप्प बसलों.

थोडा वेळ थांबून पुगाचेव म्हणाला,—'ओरेनबुर्गमध्यें लोक माझ्याविषयीं काय बोलतात?'

'ते म्हणतात कीं तुमचा पराभव करण सोपं नाहीं. तुमची सर्वांवर जरब बसली आहे, हें खास.'

त्या तोतयाच्या चेहऱ्यावर अभिमानाचे भाव उमटले.—'होय. खरं आहे तें.'—तो उल्हसित होऊन म्हणाला,—'लढावं कसं हें मला चांगलं समजतं. ओरेनबुर्गच्या लोकांना युझेयेवायाच्या लढाईचं समजलं कां? तिथं चाळीस जनरल

ठार झाले. चार सैन्यांना कैद केलं. आहांत कुठें? प्रशियाचा राजा तरी आतां माझ्या-विरुद्ध लढाईला उभा राहील काय?'

त्या बदमाषाची बढाई ऐकून मला हंसू आलें.—'तुमची स्वत:विषयीं काय कल्पना आहे?'—मी उलट विचारलें,—'तुम्ही फ्रेड्रिकचा पराभव करूं शकाल काय?'

'कोण? फ्योदोर फ्योदोरिच? त्यांत काय मोठंसं? मी तुमच्या जनरल्सना हरवलं आणि तुमच्या जनरल्सनीं त्याचा पराभव केला होता. माझ्या सैन्यानें कधीं मार खाल्ला नाहीं. मी मॉस्को घेतल्यानंतर पाहा काय होतंय तें.'

'मॉस्कोवर चालून जाण्याचा तुमचा विचार आहे काय?'

पुगाचेव विचारांत गढून गेला. नंतर हलक्या आवाजांत म्हणाला,—'देवाला माहित. माझे हातपाय जखडलेले आहेत. थोडं स्वातंत्र्य पाहिजे मला. माझ्या लोकांच्या मनांत भलतेच विचार येतात. इथून तिथून सारे चोर आहेत चोर! मला मोठ्या विचारानं पावलं टाकावीं लागतात. कधीं अपयश आलं तर हेच लोक आपल्या बचावासाठीं माझं मुंडकं उडवतील.'

'आतां कसं बोललांत!'—मी म्हणालों.—'मग त्यांना सोडून तुम्ही महाराणीच्या स्वाधीन कां होत नाहींत?'

पुगाचेव कडवटपणें हंसला.—'तें शक्य नाहीं.'—तो म्हणाला.—'आतां फार उशीर झाला आहे. आतां मला दया दाखविली जाणार नाहीं. जसं सुरू केलं आहे, तसंच मी तें पुढं चालविणार आहे. कुणी सांगावं? कदाचित् मला यशहि येईल. ग्रिश्का ओत्रेप्येवनं मॉस्कोवर राज्य केलं होतंच ना?'

'पण त्याचा शेवट कसा झाला? त्याला खिडकीबाहेर फेकून देण्यांत आलं. त्याचं डोकं उडवलं गेलं. त्याला जाळलं अन् ती राख तोफेंत घालून हवेंत उडवण्यांत आली.'

'आतां माझं ऐका जरा.'—कसल्या तरी स्फूर्तीचा संचार झाल्यासारखा पुगाचेव म्हणाला.—'मी एक तुम्हांला गोष्ट सांगतों. मी लहान असतांना एका काल्मिक म्हातारीनें मला ती सांगितली होती. एक होता गरूड. तो एकदां कावळ्याला म्हणाला,—अरे, कावळ्या तूं पृथ्वीच्या पाठीवर तीनशें वर्षें जगतोस आणि मी फक्त तेहतीस वर्षेंच. हें कसं रे?—त्याचं असं आहे, महाराज,—कावळा म्हणाला,—तुम्ही जिवंत प्राण्याचं रक्त पीत असतां अन् मी मेलेल्या प्राण्याचं मांस खातों.—गरुडानं विचार केला आणि कावळ्याप्रमाणं मेलेल्या

प्राण्यांचं मांस खाण्याचं ठरवलं. गरूड आणि कावळा बरोबरच उडाले. त्यांना एक मेलेला घोडा दिसला. दोघेहि खाली आले व त्या घोड्याला चोंचा मारूं लागले. कावळ्यानें चोंच मारावी आणि म्हणावें, अहाहा! किती छान मांस आहे हें! गरुडानें एकदां चोंच मारली, पुन्हां मारली, आणि मग आपले पंख पसरून तो कावळ्याला म्हणाला,—नको रे बाबा, नको मला तुझं मांस. जिवंत प्राण्याचं रक्त एकदां प्यायला मिळालं तरी पुरे. पण मेलेल्या प्राण्यांचं मांस खाऊन तीनशें वर्षं जगणं नको. —काय, आवडली कां ही काल्मिक गोष्ट?'

'छान आहे.'—मी म्हणालों.—'पण खून करून अन् लूटमार करून जगणं म्हणजेच मेलेल्याचं मांस खाऊन जगणं आहे, असं मला वाटतं.'

आश्चर्यचकित होऊन पुगाचेवनें माझ्याकडे पाहिलें. पण तो कांहींच बोलला नाहीं. आम्ही दोघेहि चूप होतों, विचार करीत होतों. तातारनें कसलें तरी उदास गाणें सुरू केलें. सावेलिच डुलक्या घेत होता. बर्फाछादित रस्त्यावरून गाडी झपाट्यानें सरसरत जात होती...आणि मग एकदम याईक नदीच्या कांठावरचं खेडें मला दिसलं. गांवाभोंवतालचें कुंपण व चर्चचा मनोरा दिसूं लागला. आणि पंधरा मिनिटांच्या आंतच आम्ही बेलोगोर्स्क किल्ल्यांत प्रवेश केला.

---

# प्रकरण बारावें

*अनाथ*



सफरचंदाच्या झाडाला
ना फांद्या, ना फुलें
आमुच्या या नवरीला
ना आई, ना बाप.
कोण घालील तिज साज ?
कोण देईल आशीर्वाद ?

—लग्नाचें गाणें

कमांडंटच्या घराजवळ आमची गाडी येऊन पोंचली. पुगाचेवच्या गाडीच्या घंटांचा आवाज लोकांनीं ओळखला. आणि लगेच गर्दी करून ते गाडीमागें धांवत सुटले. श्वाब्रिननें तोतया झारचें स्वागत केलें. त्याचा पोशाख कझाक पद्धतीचा होता. त्यानें दाढीहि वाढविली होती. आपला आनंद आणि निष्ठा व्यक्त करण्यासाठीं कमालीची लाचारी दाखवीत त्या निमकहराम माणसानें पुगाचेवला हात देऊन खालीं उतरविलें. मला पाहतांच तो अस्वस्थ झाल्यासारखा दिसला. पण लगेच त्यानें स्वतःला सावरून घेतलें. आपला हात पुढें करून तो म्हणाला. 'तूंहि आमच्यांत सामील झालास तर !'—कांहीं न बोलतां मी तोंड फिरविलें.

कमांडंटच्या खोलींत शिरतांच मला अतिशय दुःख झालें. ती खोली माझ्या परिचयाची होती. कमांडंटची सनद भिंतीवर अद्यापहि टांगलेली दिसत होती. ही सनद म्हणजे गतकाळाचा शोकपूर्ण मृत्युलेखच आहे, असें मला वाटलें. इवान कुझमिच ज्या खुर्चीवर बसून आपल्या बायकोची बडबड ऐकत डुलक्या घेत असे, त्याच खुर्चीवर पुगाचेव बसला होता. पुगाचेवसाठीं श्वाब्रिननें स्वतः वोदका आणली. एक ग्लास घशांत ओतल्यावर माझ्याकडे बोट दाखवून पुगाचेव श्वाब्रिनला म्हणाला,—'यांनाहि वोदका दे !'—श्वाब्रिन ट्रे घेऊन माझ्याजवळ आला. पण दुसऱ्यांदा मी आपलें तोंड फिरविलें. तो अस्वस्थ झाल्यासारखा दिसत होता. पुगाचेवची मर्जी आपल्यावर खप्पा झाला आहे, हें त्यानें कुणी न सांगतां सवरतां ओळखलें होतें. पुगाचेवची हांजी हांजी करीत असतांनाच तो मधूनमधून माझ्याकडे

संशयखोर दृष्टीनें बघत होता. पुगाचेवनें किल्ल्यांतील हालहवाल विचारली, शत्रूच्या सैन्याविषयीं ज्या अफवा पसरल्या होत्या, त्यांची चौकशी केली. आणि मग एकदम त्यानें श्वाब्रिनला विचारलें,—' काय रे, एका तरुण मुलीला तूं डांबून ठेवलं आहेस म्हणे ? कोण आहे ती ? मला बघायचं आहे तिला.'

श्वाब्रिनचा चेहरा खरकन उतरला.—' नाहीं सरकार, तुरुंगांत डांबलं नाहीं तिला. '— तो अडखळत म्हणाला,—' ती आजारी आहे आणि आपल्या खोलीत ती झोंपली आहे.'—' मला तिच्याकडे घेऊन चल. '—पुगाचेवनें फर्माविलें. आणि तो उठला देखील. पुगाचेवच्या हुकुमाचा अवमान करण्याची श्वाब्रिनची छाती नव्हती. तो पुढें झाला आणि पुगाचेव त्याच्या पाठोपाठ निघाला. मी पण त्यांच्या मागोमागच निघालों.

पायऱ्याजवळ उभे राहून श्वाब्रिन म्हणाला,—' तुम्हांला हवं तें मागा, सरकार. पण एका तिऱ्हाइताला माझ्या बायकोच्या खोलींत पाऊल ठेवूं देऊं नका.'

अतिभयानें माझ्या अंगावर कांटा उभा राहिला.—' काय ? म्हणतोस तरी काय ? तूं लग्न केलंस तिच्याशीं ? '—मी ओरडून विचारलें.

' तुम्ही थांबा थोडं. '—पुगाचेव म्हणाला.—' आतां ही बाब माझ्या हातीं आहे.'—नंतर श्वाब्रिनकडे वळून तो म्हणाला,—' जादा शहाणपणा दाखवूं नकोस आणि बाताहि मारूं नकोस. ती तुझी बायको असो वा नसो. मला वाटेल त्याला घेऊन मी तिच्या खोलींत जाईन. चला हो तुम्ही. '

खोलीच्या दाराजवळ श्वाब्रिन पुन्हां थांबला आणि भावनावेगानें म्हणाला, 'तिच्या अंगांत ताप आहे, सरकार. आणि गेल्या तीन दिवसांपासून ती शुद्धींत नाहीं.'

' मुकाट्यानें दार उघड. '— पुगाचेवनें फर्माविलें.

खिशांत हात घालून श्वाब्रिन कांहींतरी शोधूं लागला. आणि किल्ली आणावयास आपण विसरलों, असें त्यानें सांगितलें. पुगाचेवनें दारावर एक लाथ हाणली. त्यासरशीं कुलूप गळून पडलें, दरवाजा उघडला गेला आणि आम्ही आंत गेलों.

खोलींत नजर टाकतांच माझें रक्त गोठून गेलें. मरीया इवानोवना जमिनीवर अस्ताव्यस्त पडलेली होती. तिच्या अंगावरचे कपडे फाटलेले होते. ती निस्तेज, रोड दिसत होती आणि तिच्या केसांच्या जटा झाल्या होत्या. तिच्याजवळ पाण्याचें भांडें होतें. आणि त्यावर ब्रेडचा एक तुकडा होता. मला पाहून ती उठली आणि तिनें किंकाळी फोडली. त्यावेळीं मी इतका गोंधळून गेलों होतों मी मला काय वाटलें त्याचें वर्णन करणें शक्य नाहीं.

पुगाचेवनें श्वाब्रिनकडे पाहिलें व कडवटपणानें उपरोधाच्या स्वरांत तो म्हणाला,—' वा ! काय छान इस्पितळ आहे तुझं ! '—नंतर तो मरीया इवानोवनाजवळ गेला आणि म्हणाला,—' तूं काय केलं होतंस म्हणून तुझ्या नवऱ्यानं तुला ही शिक्षा दिली ? काय गुन्हा केला होतास तूं त्याचा ? '

' नवरा ! '—ती एकदम ओरडली.—' तो माझा नवरा नाहीं. अशा माणसाशीं मी कधींच लग्न करणार नाहीं. मी मरायचं ठरवलं आहे अन् कुणीं माझी सुटका केली नाहीं तर मी मरणार हें खास ! '

पुगाचेव भयंकर संतापला होता. श्वाब्रिनकडे पाहून तो ओरडला,—' मला फसवतोस काय ? हरामखोर कुठला ! अशा गुन्ह्याला काय शिक्षा असते, माहित आहे ? '

श्वाब्रिननें पुगाचेवच्या पायावर लोळण घेतली...त्यावेळीं माझा सगळा द्वेष, सगळा संताप वितळून जाऊन त्यांची जागा तिरस्कारानें घेतली. एक सभ्य गृहस्थ एका पळपुट्या कझाकाचे पाय धरीत आहे, हें पाहून मला किळस आली. पुगाचेव नरम पडला होता. तो म्हणाला,—' आतां मी तुला क्षमा करतों. पण याद राख. पुन्हां कांहीं केलंस तर त्याचा तुला जाब द्यावा लागेल ! '—नंतर मरीयाकडे वळून तो मृदु स्वरांत म्हणाला,—' मुली, ऊठ आतां. मी तुला मोकळं केलं आहे. मी झार आहे तुझा. '

मरीया इवानोवनानें त्याच्याकडे दृष्टिक्षेप केला आणि आपल्या आईबापांची हत्या करणाराच माणूस आपल्यासमोर उभा आहे, हें तिनें ताडलें. दोन्ही हातांनीं आपलें तोंड तिनें झांकून घेतलें व मूर्छा येऊन ती खालीं कोसळली. मी तिच्याकडे धांवलों. पण तेवढ्यांत पलाशा निर्भयपणें खोलींत घुसली आणि आपल्या मालकिणीची शुश्रुषा करूं लागली. पुगाचेव बाहेर पडला आणि त्याच्यापाठोपाठ मी आणि श्वाब्रिनहि बाहेर आलों.

माझ्याकडे वळून पुगाचेव हंसत हंसत म्हणाला,—' बोला आतां. त्या सुंदर मुलीची मी सुटका केली आहे. आतां पाद्र्याला बोलावून त्याच्याच हातानं त्याच्या भाचीचं लग्न लावूं या कां ? मी तिचा धर्मपिता होईन आणि श्वाब्रिन नवऱ्याच्या बाजूनें उभा राहील. '

मला ज्याची पूर्वीपासून भीति वाटत होती, नेमकें तेंच यावेळीं दत्त म्हणून उभें राहिलें. पुगाचेवची सूचना ऐकून श्वाब्रिनचा जळफळाट झाला. संतापानें बेभान होऊन तो ओरडला,—' सरकार, चूक माझी आहे. मी खोटं बोललों. पण ग्रिनेवनेंहि तुम्हांला फसविलं. ही मुलगी पाद्र्याची भाची नाहीं, तर इवान मिरोनोवची मुलगी आहे. आपण किल्ला घेतला तेव्हां हिच्या बापाला फांसावर चढवलं. '

पुगाचेव माझ्याकडे रोखून पाहूं लागला.—‘ ही काय भानगड आहे ? ’—त्यानें चकित होऊन विचारलें.

‘ श्वाब्रिन सांगतो, तें खरं आहे. ’—मी निश्चयानें उत्तर दिलें.

‘ तुम्ही मात्र कधींच मला सांगितलं नाहीं. ’—पुगाचेव म्हणाला. त्याची प्रसन्न वृत्ती जाऊन त्याचा चेहरा रागानें काळवंडला होता.

‘ तुम्हींच विचार करा. ’—मी म्हणालों.—‘ मिरोनोवची मुलगी जिवंत आहे, असं जर मी तुमच्या लोकांसमोर तुम्हांला सांगितलं असतें, तर त्यांनी तिचा केव्हांच निकाल लावला असता. तिला वांचवणं शक्यच झालं नसतं. ’

‘ तुम्ही म्हणतां तें बरोबर आहे. ’—पुगाचेव हंसून म्हणाला.—‘ त्या दारुड्यांनी या बिचाऱ्या गरीब मुलीचा नक्कीच खात्मा केला असता. पाद्र्याच्या बायकोनं त्यांना फसवलं, तें फार चांगलं केलं. ’

पुगाचेव खुषींत आला आहे हें पाहून मी म्हणालों,—‘ हें पाहा, मी तुम्हांला कोणत्या नांवानं संबोधावं, हेंच मला कळत नाहीं व तें जाणून घेण्याचीहि माझी इच्छा नाहीं... पण तुम्ही माझ्यावर जे उपकार केले आहेत, ते फेडण्यासाठीं मी आनंदानं आपला जीव देखील देईन. देव साक्षी आहे. माझं एकच मागणं आहे. आणि तें म्हणजे माझी प्रतिष्ठा आणि एक ख्रिश्चन या नात्यानं माझी सद्सद्विवेक बुद्धि यांच्याविरुद्ध जाईल असं कांहीं करण्यास मला सांगू नका. तुम्ही माझे उपकारकर्ते आहांत. ज्या चांगल्या गोष्टीची तुम्ही सुरवात केली आहे, ती तशीच शेवटास न्या—मला व त्या गरीब अनाथ मुलीला देव नेईल तिकडे जाऊं द्या. तुम्ही कुठंहि असा अन् तुमचं कांहींहि होवो, तुमच्या पापी आत्म्याला मुक्ति मिळाली, म्हणून आम्ही दोघंहि दर दिवशीं जन्मभर देवाची करुणा भाकूं. ’

पुगाचेवचें निष्ठुर अंतःकरण विरघळल्यासारखें दिसलें.—‘ तुमच्या मनांत आहे तसंच होईल. ’—तो म्हणाला.—‘ फांशी द्यायचं ठरवलं कीं मी फांशी देतों. आणि क्षमा करायची ठरवली कीं क्षमा करतों. माझं हें असं आहे. त्या मुलीला घेऊन जा— हवं तिथं जा. देव तुमचं भलं करो ! ’

आणि मग लगेच तो श्वाब्रिनकडे वळून म्हणाला,—‘ यांना माझ्या राज्यांतील सर्व किल्ल्यांतून आणि शहरांतून प्रवास करण्याचा परवाना दे. ’ – श्वाब्रिन जमिनीला खिळल्यासारखा जागच्याजागीं उभा होता. पुगाचेव उठला आणि किल्ल्याची पहाणी करण्यासाठीं निघाला. श्वाब्रिन त्याच्यामागोमाग निघाला. प्रवासाची तयारी करण्याच्या निमित्तानें मी मागें राहिलों.

मी मरीया इवानोवनाच्या खोलीकडे धांवलों. खोलीचें दार बंद होतें. मी दारावर थाप मारली. ‘ कोण आहे ! ’ म्हणून पलाशानें विचारलें. मी आलों

असल्याचें मी सांगितलें. मग मरीया इवानोवनाचा गोड आवाज माझ्या कानीं आला.—' प्योत्र आंद्रेइच, थांबा हं जरा. मी कपडे बदलते आहे. अकुलिना पांफिलोवनाच्या घरीं जा. मी आलेंच तुझ्या पाठोपाठ. '

मी फादर गेरासिमच्या घरीं गेलों. तो आणि त्याची बायको मला बघतांच बाहेर धांवत आली. मी इथें आल्याचें सावेलिचनें त्यांना अगोदरच सांगितलें होतें.—' कसं काय, प्योत्र आंद्रेइच ? देवाच्या दयेनं पुन्हा आपली भेट होत आहे. तुझं कसं काय चाललं आहे ? तुझी रोज आठवण होत होती आम्हांला. तूं गेल्या-नंतर मरीया इवानोवनाला फारच छळ सोसावा लागला. पण काय रे, पुगाचेवशी तुझी दोस्ती कशी जमली ? त्यानं तुला फांसावर कसं लटकावलं नाहीं ? निदान एवढ्यासाठींच आम्ही त्या बदमाशाचें आभार तरी मानूं !'—'पुरे कर तुझी बडबड.' —फादर गेरासिम आपल्या बायकोवर ओरडला.—' तुला माहित आहे, तें सारं ओकून टाकण्याचीं कांहीं गरज नाहीं. वळवळणाऱ्या जिभेनं कधींच कुणाचं भलं केलं नाहीं. प्योत्र आंद्रेइच, असा आंत ये ना ? फार दिवस झाले आपल्याला भेटून. नाहीं ? '

गेरासिमच्या बायकोनें माझ्या जेवणाची तयारी केली. घरांत जें अन्न होतें, तें तिनें मला दिलें. माझें जेवण चालूं असतांना तिची सारखी बडबडहि चालू होतीच. श्वाब्रिननें त्यांच्या घरांतून मरीया इवानोवनाला कसें जबरदस्तीनें ओढून नेलें, निरोप घेतांना ती किती रडली, पलाशाच्या मदतीनें तिनें त्यांच्याशीं कसा संबंध ठेवला, ( पलाशा महा वस्ताद होती. तिनें सार्जंटला नुसतें बोटावर नाचवलें ) मला पत्र लिहिण्यासाठीं तिनें मरीया इवानोवनाचें मन कसें वळवलें वगैरे वगैरे अनेक गोष्टी तिनें मला सविस्तर सांगितल्या. मीहि माझी हकीगत तिला थोडक्यांत सांगितली. पुगाचेवला आपली लबाडी कळली आहे, हें त्यांना समजल्यावर दोघांनीहि आपल्या अंगावर क्रूसाची खूण केली.—' देव आमचं रक्षण करो. '— अकुलिना पांफिलोवना म्हणाली.—' बाकी श्वाब्रिनची मला मोठी गंमत वाटते. ' —गेरासिमच्या बायकोचें हें वाक्य संपतें न संपतें तोंच मरीया इवानोवना दार उघडून आंत आली. तिच्या निस्तेज मुखावर स्मित होतें. तिचा वेष साधाच होता. पण तोच तिला खुलून दिसत होता.

मी तिचा हात माझ्या हातांत घेतला आणि बराच वेळ माझ्या तोंडातून शब्दच फुटेना. आमचीं दोघांचीं अंतःकरणें इतकीं भरून आलीं होतीं कीं आमच्या मुखांतून एक शब्द देखील बाहेर पडूं शकला नाहीं. फादर गेरासिम आणि त्याची बायको यांनीं परिस्थिति ओळखून तेथून काढतां पाय घेतला. आतां तिथें आम्हां दोघांखेरीज दुसरें कुणीच नव्हतें. बाहेरच्या जगाचा आम्हांला विसर पडला आणि मनाचें समाधान होईपर्यंत आम्हीं खूप खूप बोललों. किल्ला शत्रूच्या हातीं पडल्यानंतर

घडलेल्या साऱ्या गोष्टी मरीया इवानोवनानें मला सांगितल्या. तिला कशा भयंकर परिस्थितींतून जावें लागलें, श्वाब्रिननें तिचा कसा छळ केला, वगैरे सविस्तर हकीगत तिनें सांगितली. गतकाळांतील सुखद आठवणी आम्ही पुन्हां एकदां जागविल्या...आम्ही दोघेहि रडलों...शेवटीं मी माझा बेत तिला सांगितला. तिला पुगाचेवऱ्या राज्यांत श्वाब्रिन्च्या अंमलाखालीं सोडून जाणें शक्यच नव्हतें. ओरेनबुर्गला जाण्याचाहि प्रश्न नव्हता. कारण तिथें शत्रुसैन्याचा वेढा पडलेला होता. तिचा म्हणण्यासारखा एकहि आप्त जगांत नव्हता. म्हणून तिनें माझ्या आईबापांकडे जावें असें मी सुचविलें. माझी ही सूचना प्रथम तिला रुचली नाहीं. कारण माझ्या वडिलांच्या मनांत तिच्याविषयीं राग होता व त्याची तिला भीति वाटत होती. मी तिची समजूत घातली आणि अशीहि खात्री पटवून दिली कीं देशासाठीं मरण पत्करणाऱ्या धीरोदात्त योद्धयाच्या मुलीला आपल्या घरीं आश्रय देण्यांत माझ्या वडिलांना धन्यताच वाटेल. शेवटीं मी म्हणालों,—'हें बघ माशा, आतां मी तुला आपली बायको समजतों. कांहीं विलक्षण योगायोगानं आपल्याला एकत्र आणलं आहे. आणि आतां जगांतील कोणतीच शक्ति आपली ताटातूट करूं शकत नाहीं.'—माझें बोलणें तिनें न लाजतां मुरडतां किंवा नापसंती व्यक्त न करतां भाबडेपणानें ऐकून घेतलें. तिचें दैव माझ्या दैवाशीं निगडित झालें आहे, हें तिनें ओळखलें होतें. पण माझ्या आईबापांच्या संमतीशिवाय ती माझ्याशीं लग्न करावयास तयार नव्हती व तिनें मला तसें पुन्हां एकदां बोलून दाखविलें. याबाबतींत तिचें मन वळविण्याचा नाद मी सोडून दिला. आम्ही गाढ प्रेमानें एकमेकांचीं चुंबनें घेतलीं—आणि अशा रीतीनें आम्ही एकमुखानें एकच निर्णय घेतला.

एका तासाभरांत सार्जंटनें पुगाचेवच्या सहीचा परवाना माझ्या हातीं दिला. पुगाचेवची सही म्हणजे वाकड्यातिकड्या रेघोट्याच होत्या. त्यानें मला भेटीस बोलावलें असल्याचेंहि सार्जंटनें सांगितलें. मी गेलों तेव्हां पुगाचेव प्रवासाच्या तयारीत होता. त्या भयानक प्राण्याचा, त्या क्रूर नरराक्षसाचा निरोप घेतांना माझ्या मनांत ज्या भावना निर्माण झाल्या, त्यांचें वर्णन करणें कठीण आहे. त्यानें मला दया दाखविली होती. मग मी सत्याची कबूली कां देऊं नये? माझ्या मनांत त्याच्याविषयीं सहानुभूतीची जोरदार भावना उचंबळून आली. परिस्थिति आवाक्या-बाहेर जाण्यापूर्वींच त्याला त्याच्या नेतृत्वाखालील गुन्हेगारांपासून ओढून बाजूला करावें आणि फांशीपासून त्याचा बचाव करावा, अशी उत्कट इच्छा त्यावेळीं माझ्या मनांत निर्माण झाली होती. श्वाब्रिन आणि इतर लोक आमच्याभोंवतीं गर्दी करून उभे होते, त्यामुळें माझ्या अंतःकरणांतील भावना व्यक्त करण्याची संधि मला मिळाली नाहीं.

आम्ही दोस्तांप्रमाणें एकमेकांचा निरोप घेतला. अकुलिना पांफिलोवना गर्दींत एका बाजूला उभी होती. तिला पाहून पुगाचेवनें अर्थपूर्णरीत्या डोळा

मिचकावला. मग तो गाडीवर चढला आणि बेर्दाकडे गाडी हांकण्यास त्यानें गाडीवानाला सांगितलें. घोडे निघाले तेव्हां त्यानें गाडींतून हात बाहेर काढला व माझ्याकडे पाहून तो ओरडला,—'बरं आहे. येतों आतां. कदाचित् आपण पुन्हां भेटूं.'—आमची भेट झाली, पण कशा विचित्र परिस्थितींत !

पुगाचेव निघून गेला. मी भोंवतालच्या प्रदेशावर नजर टाकली. बर्फाच्या पांढऱ्या चादरीवरून त्याची गाडी झपाट्यानें जात होती. लोक पांगले. श्वाब्रिन कुठें तरी गडप झाला होता. मी फादर गेरासिमच्या घरीं गेलों. आमच्या प्रवासाची सर्व तयारी झाली होती. आतां वेळ घालविण्यांत अर्थ नव्हता. कमांडंटच्या जुन्या घसरगाडींत आमचें सारें सामान भरलें होतें. क्षणभरानें घोडे जुंपण्यांत आलें; मरीया इवानोवना आपल्या आईबापांच्या थडग्यांचें शेवटचें दर्शन घेण्यासाठीं गेली होती. त्यांना चर्चच्या मागें पुरण्यांत आलें होतें. मीहि तिच्याबरोबर जाणार होतों पण–मी एकटीच जातें–असें सांगून ती निघून गेली. थोड्या वेळानें ती परत आली. तेव्हां ती मुळूमुळू रडत होती. गाडी तयार होती. फादर गेरासिम आणि त्याची बायको आम्हांला निरोप देण्यासाठीं बाहेर येऊन उभीं राहिलीं. गाडीमध्यें आम्हीं तिघेजण होतों—मरीया इवानोवना, मी आणि पलाशा. सावेलिच गाडीवानाजवळ बसला होता.—'बरं आहे, मरीया इवानोवना, बेटी, ये आतां. प्योत्र आंद्रेइच, ये आतां.'—अकुलिना पांफिलोवना आम्हांला निरोप देतांना म्हणाली,—'तुमचा प्रवास सुखाचा होवो अन् देव तुम्हांला सुखी ठेवो!'—आमची गाडी चालूं झाली. कमांडंटच्या घराच्या खिडकींत श्वाब्रिन उभा होता. त्याचा चेहरा रागानें लाल झालेला दिसत होता. पराभूत झालेल्या शत्रूकडे विजयोन्मादानें बघण्याची माझी इच्छा नव्हती. म्हणून मी तोंड फिरविलें. शेवटीं आम्ही किल्ल्याच्या फाटकांतून बाहेर पडलों आणि बेलोगोर्स्क किल्ल्याचा कायमचा निरोप घेतला.

---

# प्रकरण तेरावें

## अटक



'कर्तव्याला माझ्या जागुन, तुरुंगांत तुज डांबितसें
नको तुझा रे राग मजवरी, अनाठायिं तो जाण असे.'
'तुरुंगांत रे जाण्यासाठीं विरोध माझा मुळीं नसे.
म्हणणें माझें ऐकून घ्यावें, हेंच मागणें मागतसें.'

—क्न्याझ्निन

सुदैवानें हात दिल्यामुळें माझी प्रेयसी अनपेक्षितपणें मला मिळाली होती-त्या दिवशीं सकाळीं तिला दुःखदायक परिस्थितींत पाहून माझ्या मनांत केवढी भयंकर चिंता दाटलेली होती. पण आतां ती माझ्याजवळ होती. मी एखादें स्वप्न तर पाहत नाहीं ना, असें मला राहून राहून वाटत होतें. मरीया इवानोवना विचारमग्न स्थितींत कधीं माझ्याकडे पाही तर कधीं रस्त्याकडे. तिच्या मनांतील विचार सैरा-वैरा धांवत होते आणि त्यांना एकत्र करण्याचा तिचा प्रयत्न चालू होता, असें दिसत होतें. कुणींच बोलत नव्हतें. आमचीं अंतःकरणें अतिशय थकून गेलीं होतीं. वेळ कसा जात होता, तें सुद्धां कळत नव्हतें. दोन तासांनंतर आम्ही एका जवळच्या किल्ल्यांत येऊन पोंचलों. तो किल्लाहि पुगाचेवच्या ताब्यांत होता. आम्ही येथें घोडे बदलले. नव्या दमाचे घोडे आम्हांला झटपट मिळाले. एक म्हातारा दाढीवाला कझाक किल्ल्याचा कमांडंट होता. पुगाचेवनें त्याला नुकतीच या जागेवर बढती दिली होती. म्हातारा आमच्याशीं अगदीं अदबीनें वागला. आमच्या बडबड्या गाडीवानाचा हा सारा प्रताप होता. त्याच्या बडबडीमुळेंच आम्ही म्हणजे कोणी पुगाचेवच्या दरबारांतील मातब्बर असामी आहोंत, अशी त्या किल्ल्यांतील सर्वांची समजूत झाली असल्याचें माझ्या लक्षांत आलें.

आम्ही आमचा प्रवास पुन्हां सुरू केला. अंधार पडूं लागला तेव्हां आम्ही एका लहान शहराजवळ आलों. म्हाताऱ्या कमांडंटच्या सांगण्याप्रमाणें, पुगाचेवच्या सैन्यांत सामील होण्यासाठीं कूच करीत असलेल्या एका मोठ्या बटालियननें येथें तळ ठोकला होता. पहारेकऱ्यांनीं आम्हांला अडवून विचारलें,—'कोण आहे?'—गाडीवान रुबाबांत म्हणाला,—'झारचा मित्र आणि त्याची बायको.'—आणि क्षणार्धांत घोडेस्वारांनी आम्हांला घेरलें. तोंडानें त्यांची शिवीगाळ चालली होती.

आंकडेबाज मिशांचा एक सार्जेट मेजर ओरडला,—'सैतानाच्या दोस्ता, बाहेर ये असा. तुला आणि तुझ्या बायकोलाहि कळेल आतां कसं काय तें!'

मी गाडींतून खालीं उतरलों व कॅप्टनला भेटण्याची मागणी केली. गाडींतून एक ऑफिसर उतरला आहे हें पाहून शिपायांनी शिवीगाळ बंद केली. सार्जेट मेजर मला मेजरकडे घेऊन चालला. सावेलिच माझ्याबरोबर होताच. तो सारखा पुटपुटत होता,—'म्हणे झारचा दोस्त! खरं आहे! आगींतून निघालों आणि फुफाट्यांत पडलों. अरे देवा, आतां काय होईल तें कळत नाहीं.'—आम्ही पुढें जात होतों आणि गाडी आमच्यामागून येत होती.

पांच मिनिटांनंतर आम्ही एका झोंपडीजवळ आलों. झोंपडींत दिव्यांचा लखलखाट होता. सार्जेट मेजरनें मला पहारेकऱ्यांच्या स्वाधीन केलें व आपण वर्दी देण्यासाठीं आंत गेला. थोड्या वेळानें बाहेर येऊन त्यानें सांगितलें कीं माझी भेट घेण्यास मेजर साहेबांना सवड नाहीं. माझी जेलमध्यें रवानगी करण्याचा आणि माझ्या बायकोला मेजरकडे घेऊन जाण्याचाहि हुकुम असल्याचें त्यानें सांगितलें.

'ही काय भानगड आहे?'—मी संतापानें ओरडलों.—'त्याला वेड लागलं आहे कीं काय?'

'तें मी सांगू शकत नाहीं, साहेब.'—सार्जेट मेजर म्हणाला.—'मला मेजर साहेबांनीं सांगितलं आहे कीं तुमची जेलमध्यें रवानगी कर आणि बाईसाहेबांना माझ्याकडे घेऊन ये. बस. एवढंच माहित आहे मला.'

मी झोंपडीकडे धांवलों. पहारेकऱ्यांनीं मला अडविलें नाहीं. मी सरळ आंत घुसलों. एका खोलींत घोडेस्वार पलटणीचें पांच सहा अधिकारी पत्त्यांचा जुगार खेळत होतें. मेजरच्या हातांत बॅंक होती. आणि काय आश्चर्य? हा मेजर म्हणजे सिंबर्स्कच्या खाणावळींत बिलियर्डवर माझे पैसे जिंकणारा इवान इवानोविच झूरिन होता, हें मी तात्काळ ओळखिलें.

'इवान इवानिच, अरे, तूंच ना?'—मी ओरडलों.

'कोण? प्योत्र आंद्रेइच? तूं इकडे कसा? कुठून आलास? खेळणार का एक हात?'

'नको रे बाबा. आधीं मला माझी उतरण्याची जागा दाखव.'

'जागा? इथेंच राहा कीं!'

'तें शक्य नाहीं. मी कांहीं एकटा नाहीं.'

'मग तुझ्या दोस्तालाहि आण.'

'दोस्त नाहीं. एक बाई आहे.'

'काय ? बाई ? कुठून आणलीस तूं ? '—असें म्हणून झूरिननें अशा अभिप्रायानें शीळ घातली कीं सर्वजण मोठमोठ्यानें हंसूं लागले. मी अगदीं गोंधळून गेलों.

'ठीक आहे. '—झूरिन म्हणाला,—' कुणी कां असेना, तुला एक खोली देऊं झालं. पण हें कांहीं बरं नाहीं...आपण मागच्यासारखी गंमत केली असती. पण तें जमणं आतां शक्य दिसत नाहीं. अरे पण, पुगाचेवच्या त्या मैत्रिणीला तूं आंत कां आणीत नाहींस ? कांहीं त्रास तर देत नाहीं ना ती ? तिला सांग कीं मी फार चांगला माणूस आहे. मला भिण्याचं कांहींच कारण नाहीं. ती ऐकत नसेल, तर दे दोन गुद्दे ठेवून ! '

' काय बडबडतो आहेस तूं ? '—मी झूरिनला म्हणालों,—' अन् पुगाचेवची मैत्रीण कुठून काढलीस तूं ? कॅप्टन मिरोनोवची मुलगी आहे ती. मी तिला बंदीतून सोडवून आणलं आहे आणि आतां तिला माझ्या वडिलांकडे नेऊन सोडीत आहे.'

' काय ? मला आतां जी वर्दी देण्यांत आली, ती तुझ्यासंबंधींच वाटतं ? पण ही भानगड आहे तरी काय ? '

' नंतर सांगेन मी तुला. पण आधीं त्या मुलीचं भय दूर केलं पाहिजे. तुझ्या शिपायांनी घाबरवून सोडलंय तिला. '

झूरिननें भराभर हुकुम सोडले. तो स्वतः मरीया इवानोवनाची माफी मागावयास बाहेर गेला. तिला शहरांतील चांगल्या जागेंत नेऊन ठेव, म्हणून त्यानें सार्जेंट मेजरला हुकुम दिला. मला त्यानें आपल्या खोलींतच ठेवून घेतलें.

आमचें जेवण झाल्यावर आही दोघेच खोलींत होतों, तेव्हां झूरिनला मी माझी सारी हकीगत सांगितली. माझें बोलणें तो लक्षपूर्वक ऐकत होता. माझी हकीगत संपल्यावर मान हलवीत तो म्हणाला,—' हें तर सारं ठीकं झालं. पण मला एक मात्र पसंत नाहीं—तुला लग्न करायचं तें कशासाठीं ? मी फसवूं इच्छीत नाहीं. पण माझ्यावर विश्वास ठेव—लग्न म्हणजे निव्वळ मूर्खपणा आहे. बायकापोरांचं लटांबर हवंच कशाला ? विसरून जा सगळं ! माझं ऐक. तूं त्या मुलीला नकार दे अन् हो मोकळा ! सिंबर्स्कचा रस्ता मी आतां साफ केला आहे. त्या रस्त्यावर शत्रूंपासून मुलींचं धोका नाहीं. तिला एकटीलाच तुझ्या घरीं पाठवून दे अन् तूं माझ्याजवळ राहा. ओरेनबुर्गला जाण्यांत आतां अर्थ नाहीं. तूं बंडखोरांच्या हातांत सांपडशील. आणि मग तुझी सुटका होणें शक्यच नाहीं. प्रेमाचं वेड हळूं हळूं तुझ्या डोक्यांतून निघून जाईल. आणि सारं कांहीं ठाकठीक होईल. '

झूरिनचा सल्ला मला पसंत पडला नाहीं. तथापि महाराणीच्या सेवेंत हजर होऊन सैन्यांतील आपली जागा घेण्याचें मी ठरविलें. झूरिनच्या सल्ल्याप्रमाणें

मरीया इवानोवनाला माझ्या घरीं पाठविण्याचें व स्वतः सैन्यांत दाखल होण्याचेंहि मी ठरविलें.

माझा बिछाना तयार करण्यासाठीं सावेलिच आला, तेव्हां उद्यां सकाळीं मरीया इवानोवनाला घेऊन घरचा रस्ता धरण्यास मी त्याला सांगितलें. त्यानें प्रथम विरोध दर्शविला,—'काय म्हणतां, धनी ? तुम्हांला सोडून मी जाऊं ? तुमची सरबराई कोण करील इथं ? अन् तुमचे आईबाप काय म्हणतील मला ?'

सावेलिचचा हट्टी स्वभाव माझ्या परिचयाचा होता. म्हणून प्रेमानें व गोड बोलून त्याचें मन वळविण्याचा मी विचार केला.—'आर्खिप सावेलिच, तूं मित्र आहेस ना माझा ?'— मीं म्हणालों,—'मग माझी एवढी विनंति मान्य कर. माझ्यावर एवढा उपकार कर. मला इथें नोकराची गरज लागणार नाहीं. आणि मरीया इवानोवनाबरोबर तूं गेला नाहींस तर इकडे माझा जीव लागणार नाहीं. तिची सेवा करणं म्हणजे माझी सेवा करण्यासारखंच आहे. कारण परिस्थिति निवळतांच तिच्याशीं लग्न करण्याचा मी निर्धार केला आहे.'

माझें बोलणें ऐकून सावेलिच आश्चर्यचकित झाला.—'लग्न करणार काय ?' —तो म्हणाला.—'मुलाच्या डोक्यांत लग्नाचे विचार, अन् तिकडे थोरले धनी काय म्हणतील ? आई साहेबांना काय वाटेल ?'

'त्यांची दोघांचीहि आमच्या लग्नाला संमति मिळेल.'—त्याची खात्री करून देण्यासाठीं मी म्हणालों.—'मरीया इवानोवना कोण आहे, हें त्यांना समजल्यावर त्यांची नक्कीच संमति मिळेल. माझी सगळी मदार तुझ्यावर आहे. माझ्या आईबापांचा तुझ्यावर विश्वास आहे अन् तूं आमच्यासाठीं नक्कीच शब्द टाकशील अशी मला खात्री आहे. काय, बोल ना ?'

म्हाताऱ्याचें मन द्रवलें.—'प्योत्र आंद्रेइच, धनी,'—तो म्हणाला,—'तुमचं अजून लग्नाचं वय झालं नाहीं. पण मरीया इवानोवना इतकी चांगली मुलगी आहे कीं अशी संधि दडवणं म्हणजे मूर्खपणा ठरेल. तुम्ही म्हणतां तसंच होऊं द्या मग. मी तिच्याबरोबर जातों आणि तुमच्या आईबापांना सांगतों कीं तिच्यासारखी मुलगी मिळत आहे तेव्हां हुंडा न मिळाला तरी चालेल.'

मी सावेलिचचे आभार मानले व त्या रात्रीपुरतें झूरिनच्या खोलींत झोंपावयास गेलों. मी पुष्कळच उल्हसित झालों होतों व माझी बडबड सारखी चालू होती. झूरिन माझें बोलणें लक्षपूर्वक ऐकत होता. पण पुढें त्याचे हुंकार अनियमित व्हायला लागले. आणि शेवटीं तर तो चक्क घोरूं लागला, मी बोलणें थांबविलें व त्याचेंच अनुकरण केलें.

दुसरे दिवशीं सकाळीं मी मरीया इवानोवनाची भेट घेतली व माझा बेत तिला सांगितला. माझा बेत सयुक्तिक असल्याचें तिनें एकदम मान्य केलें. झूरिनची तुकडी त्याच दिवशीं शहरांतून कूच करणार होती, तेव्हां उशीर करून भागण्यासारखें

नव्हतें. मरीया इवानोवनाला सावेलिचवर सोंपवून माझ्या वडिलांसाठीं तिच्याजवळ मी एक पत्र लिहून दिलें. आणि तिचा निरोप घेतला. निरोप घेतेवेळीं तिच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले.—' प्योत्र आंद्रेइच,'—ती हलक्या आवाजांत म्हणाली, —' आपली पुन्हां भेट होईल कीं नाहीं, तें देवाला माहित. पण एक मात्र मी सांगतें कीं मला तुझा जन्मभर विसर पडणार नाहीं. मरणाच्या अखेरच्या क्षणापर्यंत तुझीच मूर्ति माझ्या हृदयांत राहील. '—मी कांहींच बोललों नाहीं. आमच्या अवतींभवतीं पुष्कळच लोक होते. तेव्हां परक्यांसमोर आपल्या भावनांचें प्रदर्शन करणें मला योग्य वाटलें नाहीं.

ती गेल्यावर मी विषण्ण मनानें खोलीवर आलों. माझें मन रमविण्याचा झूरिननें खूपच प्रयत्न केला. मलाहि विरंगुळा हवा होता. सारा दिवस आम्ही मजेंत घालविला आणि सायंकाळीं आमच्या मोहिमेवर निघालों.

ते फेब्रुवारी महिन्याचे अखेरचे दिवस होते. हिंवाळ्यामुळें लष्करी हालचाली गुंतागुंतीच्या झाल्या होत्या. पण आतां हिंवाळा संपत आला होता. आणि आमचे सेनापती संयुक्तपणें आणि एकाच वेळीं बंडखोरांवर हल्ला चढविण्याच्या तयारीत होते. ओरेनबुर्गचा वेढा अजून उठला नव्हता. पण आमच्या सैन्याच्या तुकड्या सारख्या येऊन थडकत होत्या व सर्व बाजूनीं त्यांनीं शत्रुसैन्याला घेरलें होतें. बंड करून उठलेल्या खेड्यांत आमचें सैन्य दिसतांक्षणीं शांतता प्रस्थापित होत असे. आम्हांला पाहून शत्रुसैन्यानें जिकडेतिकडे पळ काढला. लढाईचा यशस्वी शेवट अगदीं जवळ आहे अशीं चिन्हें दिसत होतीं.

प्रिन्स गोलित्सिननें थोड्याच अवधींत पुगाचेवला तातिश्चेवच्या किल्ल्यांतून पिटाळून लावलें, शत्रूच्या सैन्याची पांगापांग केली, आणि ओरेनबुर्ग मुक्त करून बंडखोरांना शेवटचा तडाखा दिला, असें दिसत होतें. त्याचवेळीं बष्किरांच्या एका टोळक्याला पिटाळून लावण्याचा झूरिनच्या तुकडीला हुकूम आला होता. पण त्यांची आमची गांठ पडण्यापूर्वींच त्या टोळक्यानें पोबारा केला होता. वसंत ऋतूचें आगमन झालें आणि आम्ही एका तातार झोपडींत अडकून पडलों. बर्फ वितळल्यामुळें नद्यांना पूर आले. रस्त्यांचें दळणवळण अशक्य होऊन बसलें. त्या बदमाष आणि रानटी लोकांविरुद्ध चालू असलेली कंटाळवाणी व क्षुल्लक लढाई लवकर संपेल, असा विचार करीत आम्ही आमच्या निरुद्योगीपणांत समाधान मानीत होतों.

पण पुगाचेव मात्र हातीं लागला नव्हता. सैबेरियांतील लोखंडाच्या खाणींजवळ तो पुन्हां प्रगट झाला. त्यानें नव्या टोळ्यांची जमवाजमव केली. आणि पुन्हां आपलीं दुष्कृत्यें सुरू केलीं. त्याच्या विजयाच्या बातम्या पुन्हां येऊन थडकूं लागल्या. सैबेरियांतील किल्ले त्यानें उध्वस्त केल्याच्या अफवा आमच्या कानीं आल्या. त्यानें कझान काबीज केल्याची व मॉस्कोकडे मोर्चा वळविल्याचीहि बातमी आली. बंडखोरांची ताकद कमी लेखून सुखांत झोंपा काढणारे आमचे सेनापती

खडबडून जागे झाले. झुरिनला वोल्गा नदी पार करून जाण्याचा हुकुम मिळाल. ×

आमची मोहीम आणि लढाईचा शेवट यांचें विस्तारानें वर्णन करण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. पण एवढेंच सांगतों कीं लढाईच्या धामधुमींत लोकांना अतिशय हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या. बंडखोरांनीं अगोदरच खेडीं उध्वस्त केलीं होतीं. आणि त्याच खेड्यांतून कूच करीत असतांना लोकांजवळ उरलें सुरलेलें अन्नधान्यहि आम्ही हिरावून घेत होतों. राज्यव्यवस्था कुठं नांवालासुद्धां अस्तित्वांत नव्हती. जमिनीचे मालक पळून जाऊन जंगलांत लपून बसले होते. दरोडेखोरांच्या टोळ्यांनीं धुमाकूळ घातला होता. विखुरलेल्या फौजी तुकड्यांनीं आपल्या इच्छेप्रमाणें शिक्षा ठोठावण्याचें आणि माफी देण्याचें सत्र सुरू केलें होतें. लढाईच्या खाईत सांपडलेल्या विस्तीर्ण प्रदेशांतील लोकांची हलाखीची स्थिति होती. देव करो अन् रशियन बंडाळीच्या क्रूर मूर्खपणाचें दर्शन तुम्हांला न घडो. *

पुगाचेव जीव घेऊन पळत होता. आणि इवान इवानोविच मिचेलसन त्याचा पाठलाग करीत होता. अखेरीस त्याचा पुरता धुव्वा उडाल्याचीहि बातमी आली. शेवटीं तोतया झारला अटक झाल्याची खबरहि झुरिनला मिळाली आणि त्याचबरोबर आगेकूच थांबविण्याचा हुकुम त्याच्या हातीं पडला. लढाई संपली होती. आतां मला घरीं जाणें शक्य होतें. मी घरीं जाऊन आईबापांना कडकडून मिठी मारीन आणि मरीया इवानोवनाचीहि भेट घेईन, या विचारानें मला परमानंद झाला होता. पण या सबंध काळांत मरीया इवानोवनानें मला एका शब्दानें देखील आपली हकीगत कळवली नव्हती. मी एखाद्या मुलासारखा नाचत होतों. मला पाहून खांदे उडवीत झुरिन हंसला आणि म्हणाला,—'तुझं लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं. कर लग्न अन् मर लेका खुशाल!'

---

× येथून पुढें 'वगळलेलें प्रकरण' सुरू होतें. पुश्किननें स्वतःच तें वगळलें होतें व त्याच्या हस्तलिखिताच्या पहिल्या आराखड्यांत तें मिळालें. हें प्रकरण शेवटीं दिलें आहे.—अनु०

* ग्रिनेवचे हे उद्गार पुश्किनच्या राजकीय विचारांशीं मुळींच जुळत नाहींत. शेतकऱ्यांचा अंदाधुंद उठाव पुश्किनला मान्य नव्हता. पण पुगाचेवच्या हालचाली 'अकलशून्य' होत्या असें त्यांचें मत नव्हतं. 'पुगाचेवचा इतिहास' नांवाचें पुश्किननें एक पुस्तक लिहिलें असून त्या पुस्तकाला जोडलेल्या प्रस्तावनेंत (ही प्रस्तावना प्रसिद्धीसाठीं लिहिण्यांत आली नव्हती) पुश्किन लिहितो,—'सर्वसामान्य जनता पुगाचेवच्या बाजूला होती...पुगाचेव आणि त्याच्या साथीदारांनीं जे उपाय योजिले होते, त्यांचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास प्रत्येकाला असें दिसून येईल कीं बंडखोरांनीं आपलें ध्येय साध्य करण्यासाठीं योजिलेले उपाय त्या काळाच्या मानानें सर्वांत जास्त उचित होते.'—अनु०

पण एका विचित्र भावनेनें माझ्या आनंदांत विष कालविलें होतें. ज्याचे हात असंख्य निरपराध लोकांच्या रक्तानें बरबटलेले होते, त्या बदमाषाविषयींचे विचार माझ्या मनांतून कांहीं केल्या जात नव्हते. तो फांसावर लटकणार हेंहि निश्चित दिसत होते.—‘ एमेल्या ! एमेल्या ! ’—दुःभरानें मी एक उसासा टाकला. —‘ एखाद्या संगिनीशीं तूं कां टक्कर घेतली नाहींस ? बंदुकीची एखादी गोळी तूं आपल्या छातीवर कां झेलली नाहींस ? हें केलं असतं तर तुझ्यासाठींच तें चांगलं झालं असतं. ! ’—असे विचार मी टाळूं शकत नव्हतों. माझ्या आयुष्यांतील अत्यंत आणीबाणीच्या क्षणाला पुगाचेवनें माझ्यावर दया केली होती, आणि श्वाब्रिनसारख्या दुष्ट माणसाच्या हातून माझ्या वधूची मुक्तता केली होती. म्हणून या घटनांचे विचार ज्या क्षणाला माझ्या मनांत येत, त्याच क्षणाला पुगाचेवची आठवणहि माझ्या मनांत जागीं होत असे.

झूरिननें माझी रजा मंजूर केली. आतां फक्त थोड्या दिवसांचाच प्रश्न होता —मी घरीं जाणार होतों, माझ्या प्रियतमेला भेटणार होतों...आणि अचानकपणें माझ्या डोक्यावर जणुं वीज कोसळली.

निघण्याच्या दिवशीं मी माझ्या सामानाची बांधाबांध करीत असतांनाच झूरिन माझ्या झोंपडींत आला. त्याच्या हातांत एक कागद होता आणि त्याची मुद्रा अतिशय व्यग्र दिसत होती. माझ्या काळजांत चर्र झालें. कसल्या तरी अदृश्य भयानें माझ्या मनाचा ताबा घेतला. झूरिननें माझ्या ऑर्डरलीला बाहेर पाठविलें आणि तो म्हणाला, – ‘तुला कांहीं तरी सांगायचं आहे.’—‘ काय आहे ?’—म्हणून मी चमकून विचारलें.—‘ तशी कांहीं चांगली बातमी नाहीं. – ’ माझ्या हातांत कागद देत तो म्हणाला,—‘ हें वाच. आतांच जासूद देऊन गेला.’—मी वाचूं लागलों. सर्व लष्करी अधिकाऱ्यांना उद्देशून तो एक गुप्त हुकुमनामा काढण्यांत आला होता. त्यांत लिहिलें होतें कीं मी जिथें असेन तिथें मला अटक करावी आणि पुगाचेव प्रकरणाची चौकशी करणाऱ्या कमिशनपुढें कझानला मला पहारेकऱ्यांच्या बंदोबस्तांत हजर करावें.

तो कागद माझ्या हातांतून गळून पडला.—‘ आतां कांहीं इलाज नाहीं. ’ —झूरिन म्हणाला.—‘या हुकुमाची अंमलबजावणी करणें मला भाग आहे. पुगाचेवबरोबर तूं मित्रत्वानें केलेला प्रवास सरकारच्या कानीं गेला असावा. सर्व कांहीं ठीक होईल आणि कमिशनसमोर तूं आपली रास्त बाजू मांडूं शकशील, अशी मला आशा आहे. धीर सोडूं नकोस. आतां तुला ताबडतोब निघायला हवं. ’—माझी सदसद्विवेक बुद्धि निर्मळ होती. आगामी खटल्याची मला भीति नव्हती. पण गोड पुनर्मीलनाचा योग कांहीं महिने तरी लांबणीवर पडत होता, त्याचेंच मला दुःख होतें. गाडी तयार होती. झूरिननें मला प्रेमानें निरोप दिला. मी गाडींत बसलों. नंग्या तलवारी घेऊन दोन घोडेस्वार माझ्याबरोबर निघाले व अशा रीतीनें माझा प्रवास सुरू झाला.

---

# प्रकरण चवदावें

## खटला



अफवा वणव्यासारख्या पसरतात.

—म्हण

परवानगी न घेतां ओरेनबुर्ग सोडून जाणें हा फक्त एकच माझा अपराध असल्याची माझी खात्री झाली होती. पण या गैरहजेरीचें समर्थन करणें मुळींच कठीण नव्हते. शत्रूंशी चकमकी करण्यास बंदी तर नव्हतीच, उलट अशा चकमकींना जोरदार प्रोत्साहन दिलें जात असे. फाजील उत्साह दाखविल्याबद्दल माझ्यावर दोष ठेवतां आला असता. पण शिस्तीच्या विरुद्ध वर्तन केल्याचा आरोप मात्र करतां आला नसता. पुगाचेवशीं माझें संबंध सलगीचे होते. आणि अनेक साक्षीदारांनीं त्या संबंधीं निवेदन दिलें असतें. या संबंधांच्या बाबतींत कांहीं नाहीं म्हटलें तरी संशयाला पुष्कळच जागा होती. कझानला माझी उलट तपासणी होणार होती. तिच्याविषयीचेच विचार सबंध प्रवासांत माझ्या मनांत घोळत होते. उत्तरें कशीं द्यावयाचीं, याविषयींहि मी विचार केला आणि शेवटी खरें काय तें कोर्टासमोर सांगून टाकण्याचा निर्णय मी घेतला. माझ्यापुढें हाच एक सोपा व खात्रीलायक असा मार्ग होता.

मी कझानला पोचलों. शहर उध्वस्त व जाळून बेचिराख करण्यांत आलें होतें. रस्त्यांच्या दोन्हीं बाजूना जळालेल्या वस्तूंच्या राखेचे व कोळशाचे ढीग पडलेले होते. मधूनच जळालेल्या भिंती दिसत होत्या. पण छत किंवा खिडक्यांची दारें नांवाला सुद्धां दिसत नव्हतीं. पुगाचेवनें आपल्यामागें या अशा खुणा ठेवल्या होत्या. जळून राख झालेल्या घरांच्या अवशेषांत किल्ला मात्र सुरक्षित होता. त्या किल्ल्यांत मला नेण्यांत आलें. घोडेस्वारानीं मला पहारेकऱ्यांच्या स्वाधीन केलें. पहारेकऱ्यांनीं लोहाराला बोलावून माझ्या पायांत बेड्या ठोकल्या. नंतर जेलमधील एका अंधार कोठडींत माझी रवानगी करण्यांत आली. कोठडी फारच लहान होती. एका भिंतीला एक लहान खिडकी असून तिच्यांत लोखंडी गज ठोकलेले होते.

सुरवात अशी झाली होती. आणि अशा सुरवातीचा शेवट चांगला होईल ही आशा करण्यास जागा नव्हती. तरीपण मी निराश झालों नव्हतों. असह्य दुःखाचे वेळी दुःख परिहारासाठीं ज्या गोष्टीचा आश्रय घेतात, तिचाच मीहि आश्रय घेतला. मी देवाची प्रार्थना करूं लागलों, आणि प्रथमच शुद्ध पण व्यथित अंतःकरणानें केलेल्या प्रार्थनेची गोडी माझ्या प्रत्ययास आली. पुढें काय होणार आहे, याची चिंता न करतां मी शांतपणें झोपीं गेलों.

दुसरे दिवशीं सकाळीं जेलरनें मला उठविलें आणि कमिशन पुढें जायचें आहे, म्हणून सांगितलें. कमांडंटच्या घरांत कमिशनचे लोक बसले होते. दोन सैनिकांच्या पहाऱ्यांत मी त्या घराजवळ पोंचलों. सैनिक बाहेर उभे राहिले व मी एकटाच आंत गेलों.

मी एका प्रशस्त दिवाणखान्यांत प्रवेश केला. तेथें एका टेबलाजवळ दोन व्यक्ती बसलेल्या होत्या. टेबलावर कागद इकडेतिकडे पसरलेले दिसले. त्या व्यक्तींपैकीं एकजण म्हातारा जनरल होता. त्याची मुद्रा निर्विकार व निष्ठुर दिसत होती. दुसरा गार्डांचा कॅप्टन होता. कॅप्टन अठ्ठावीस वर्षांचा असावा. हा माणूस उमदा दिसला. त्याच्या हालचाली चपळ होत्या आणि त्याची वर्तणूक मोकळेपणाची होती. त्यांचा सेक्रेटरी बाजूच्या खिडकीजवळ बसला होता. त्याच्या पुढ्यांत टेबल होते. पिसांची लेखणी त्यानें आपल्या कानावर खोवली होती. माझी जबानी उतरून घेण्याच्या तयारीनें टेबलावरील कागदावर तो झुकलेला दिसला. माझी उलट-तपासणी सुरू झाली. मला माझें नांव विचारण्यांत आलें. मी आंद्रे पेत्रोविच ग्रिनेवचा मुलगाच कां, म्हणून जनरलनें विचारलें. मी 'होय' म्हणून उत्तर देतांच तो कठोरपणानें म्हणाला,—'आंद्रे पेत्रोविच ग्रिनेवसारख्या चांगल्या माणसाचा मुलगा असा नालायक निघावा, ही खरोखरच फार खेदाची गोष्ट आहे.'—मी शांतपणानें उत्तर दिलें कीं माझ्यावर कांहींहि आरोप असले तरी खरें काय तें सांगून त्या आरोपांतून मी मुक्त होईन. माझा आत्मविश्वास पाहून म्हाताऱ्याला बरें वाटलें नाहीं, असें दिसलें.—'बराच चलाख दिसतोस कीं तूं.'—तो तिरस्कारानें म्हणाला.—'पण तुझ्यापेक्षांहि चलाख माणसं आम्हीं पाहिलीं आहेत.'

त्यानंतर कॅप्टननें मला प्रश्न केला,—'पुगाचेवची नोकरी तूं कशी व केव्हां धरलीस आणि त्याच्या सांगण्यावरून कोणकोणतीं कामं केलीस?'

'मी एक लष्करी अधिकारी आणि सभ्य गृहस्थ आहे. तेव्हां माझ्यासारखा माणूस पुगाचेवची नोकरी पत्करील किंवा त्याच्या सांगण्यावरून कांहीं कामं करील असं आपणांस वाटतं तरी कसं?'—मी रागारागानें उत्तर दिलें.

कॅप्टननें पुढें विचारलें,—'तोतया झारनें सर्व अधिकाऱ्यांची निर्दयपणें कत्तल केली, आणि फक्त एका अधिकाऱ्याला, सभ्य गृहस्थाला जिवदान दिलं, हें कसं? याच अधिकाऱ्यानें व सभ्य गृहस्थानें बंडखोरांबरोबर खेळीमेळीनें

मेजवानी झोडली, आणि प्रमुख गुन्हेगाराकडून कातड्याचा कोट, एक घोडा आणि पन्नास कोपेक्स हे नजराणे स्वीकारले, हें कसं ? आणि ही विचित्र दोस्ती कशी निर्माण झाली ? कोणत्या आधारावर ? देशद्रोह किंवा कमींतकमी नीच भ्याडपणा यांखेरीज दुसरा कोणता आधार असूं शकतो ? '

कॅप्टनच्या शब्दांनीं माझ्या हृदयाला दुःखाच्या डागण्या दिल्या. मी तावातावानें आपलें समर्थन करूं लागलो. ओरेनबुर्गला जात असतांना वाटेंत बर्फाच्या वादळांत मी कसा सांपडलों व त्यावेळीं पुगाचेवची व माझी पहिली ओळख कशी झाली, बेलोगोर्स्कचा किल्ला त्याच्या हातांत पडल्यानंतर त्यानें मला असें ओळखलें आणि क्षमा केली, वगैरे सर्व हकीगत मी सांगितली. मी म्हणालों कीं पुगाचेवकडून कातड्याचा कोट व घोडा स्वीकारतांना मी आढेओढे घेतले नाहींत, हें खरें आहे; पण शेवटच्या क्षणापर्यंत बेलोगोर्स्क किल्ल्याच्या बचावासाठीं मी लढत होतों, हेंहि खरें आहे. ओरेनबुर्गला प्राणघातक वेढा पडला असतांना मी शौर्यानें लढलों; त्याबद्दल तेथील जनरलची साक्ष घ्यावी, असें मी शेवटीं सांगितलें.

त्यावर कठोर मुद्रेच्या माणसानें टेबलावर पडलेलें एक पत्र उचललें आणि त्यांतील मजकूर वाचावयास आरंभ केला :

' एन्साइन ग्रिनेवबाबत चौकशीचें आपलें पत्र मिळालें. सध्यांच्या बंडाळींत तो सामील होता आणि लष्करी कायदेकानू व राजनिष्ठेच्या शपथेस न जुमानतां सदरहू एन्साइननें पुगाचेवशीं संबंध जोडला होता, असा त्याच्यावर वहीम आहे. त्याबाबत पुढील हकीगत कळविण्याची परवानगी घेत आहे: सदरहू एन्साइन ग्रिनेव ओरेनबुर्गच्या लष्करी छावणींत १७७३ मध्यें ऑक्टोबर महिन्याच्या आरंभीं दाखल झाला व चालू सालांत २४ फेब्रुवारीपर्यंत तो इथेंच होता. त्यादिवशीं तो गायब झाला. तेव्हांपासून माझ्या हाताखालील सैन्यांत तो कधींच दिसला नाहीं. गांवांतून पळ काढलेल्या लोकांकडून समजलें कीं तो पुगाचेवबरोबर एका खेड्यांत होता. तिथून पुगाचेवबरोबरच तो बेलोगोर्स्कला गेला. पूर्वी तो तिथेंच लष्करांत नोकरीवर होता. त्याच्या वर्तनाविषयीं मी असें...' येथें जनरलनें वाचणें बंद केलें व मला करड्या आवाजांत विचारलें,—' बोल, आतां तुला तुझ्या बचावांत काय म्हणायचं आहे ? '

अगोदर ठरविल्याप्रमाणें मी माझा बचाव पुढें मांडणार होतों. मरीया इवानोवनाशीं माझे संबंध आणि इतर सर्व गोष्टी स्पष्टपणानें सांगण्याचें मी ठरविलें होतें. पण माझ्या मनानें एकाएकीं माघार घेतली. कसल्या तरी अनिवार्य भयानें माझ्या मनाचा ठाव घेतला. एकदम माझ्या ध्यानांत आलें कीं, मरीया इवानोवनाचा या संबंधांत मी निर्देश केला, तर कमिशन तिला लगेच तपासणीसाठीं बोलवील. बदमाष लोकांनीं अगोदरच खोट्यानाट्या घाणेरड्या अफवा पसरविल्या

होत्या. या अफवांशीं तिचा संबंध जोडला जाईल आणि तिला उलट तपासणीच्या वेळीं नाहीं नाहीं त्या प्रश्नांचीं उत्तरें द्यावीं लागतील—हा विचारसुद्धां मला असह्य झाला. माझ्या मनांत एकच गोंधळ माजला आणि बोलतां बोलतां मी लटपटूं लागलों.

ह्या वेळपर्यंत न्यायाधीश माझें निवेदन शांतपणें ऐकून घेत होते. पण माझी लटपट पाहून माझ्याविषयीचे त्यांचे पूर्वदूषित ग्रह पुन्हां चाळवले. गार्डोचा कॅप्टन म्हणाला कीं या खटल्यांतील प्रमुख बातमीदाराला कोर्टासमोर उभे करण्यांत यावें. जनरलनें लगेच 'कालच्या बदमाषाला' कोर्टांत हजर करण्याचा हुकुम दिला. माझ्यावर आरोप करणारा हा इसम आहे तरी कोण, या जिज्ञासेनें मी दाराकडे पाहूं लागलों. थोड्या वेळानें बेड्यांचा खळखळ आवाज ऐकूं आला. दरवाजा उघडला गेला आणि श्वाब्रिन आंत आला. त्याच्यांत झालेला बदल पाहून मला आश्चर्य वाटलें. तो बराच रोडावला होता व निस्तेज दिसत होता. त्याचे काळेभोर केस पिकलेले दिसत होते. त्याची दाढी विस्कळित दिसत होती. त्यानें खोल आवाजांत माझ्यावरील आरोपांची उजळणी केली. त्याच्या म्हणण्याप्रमाणें मी पुगाचेवचा हस्तक होतों व त्यानेंच मला बातम्या काढण्यासाठीं ओरेनबुर्गला पाठविलें होतें; शहरांत जें काय चाललें होतें त्याची लेखी माहिती पुगाचेवला पाठविण्यासाठीं मी दररोज चकमकींत भाग घेत होतों; शेवटीं मी जाहीरपणें तोतया झारच्या सैन्यांत दाखल झालों; त्याच्याबरोबर मी किल्ल्याकिल्ल्यांतून हिंडत होतों; जे अधिकारी देशद्रोह करून पुगाचेवला मिळाले होते, त्यांच्या अधिकाराच्या जागा पटकावण्यासाठीं व पुगाचेवकडून बक्षिसें मिळविण्यासाठीं मी त्याचे कान फुंकून त्या अधिकाऱ्यांचा नायनाट करण्याचा प्रयत्न करीत होतों. मी श्वाब्रिनचें निवेदन शांतपणें ऐकून घेतलें. त्यानें मरीया इवानोवनाच्या नांवाचा एकदां सुद्धां उल्लेख केला नाहीं, या एकाच गोष्टीचें मला समाधान वाटलें. जिनें आपल्याला तिरस्कारानें झिडकारलें, तिच्या नुसत्या विचारानेंच कदाचित् त्याच्या खोट्या अहंकाराला धक्का पोंचत असावा; कदाचित् ज्या भावनेनें मी तिच्या नांवाचा उल्लेख केला नाहीं, त्याच भावनेचा अंश अद्यापहि त्याच्या मनांत जागा असावा. कारण काय असेल तें असो, पण बेलेगोर्स्कच्या कमांडंटच्या मुलीचें नांव मात्र कमिशनच्या समोर उच्चारलें गेलें नाहीं. त्यामुळें माझ्या मनांतील निश्चय आणखी पक्का झाला, आणि श्वाब्रिनचे आरोप खोडून काढण्यासाठीं कांहीं तुला सांगावयाचें आहे काय, असें जेव्हां न्यायाधिशांनीं मला विचारलें, तेव्हां—मी आपल्या पूर्वीच्याच निवेदनाला चिटकून आहे, मला अधिक कांहीं सांगावयाचें नाहीं—असें मी उत्तर दिलें. नंतर जनरलनें आम्हां दोघांनाहि बाहेर घेऊन जाण्याचा हुकुम दिला. आम्ही बरोबरच बाहेर पडलों. मी श्वाब्रिनकडे निर्विकार नजरेनें पाहिलें, पण त्याच्याशीं एक अक्षर देखील बोललों नाहीं. तो तुच्छतेनें हंसला व बेड्या वर धरून माझ्यापुढें

निघाला. मला जेलमध्यें नेण्यांत आलें आणि पुन्हां केव्हांच उलटतपासणीसाठीं बोलावलें नाहीं.

आतां वाचकांना मी ज्या घटनांचें निवेदन करणार आहे, त्या मी प्रत्यक्ष पाहिल्या नाहींत. पण त्या इतके वेळां माझ्या कानांवर आल्या आहेत कीं त्यांतील बारीकसारीक तपशीलसुद्धां माझ्या स्मरणांत आहे. मला असें वाटतें कीं या घटना घडत असतांना जणुं अदृश्य रूपानेंच मी तेथें हजर होतों.

माझ्या आईबापांनी मरीया इवानोवनाचें फार प्रेमळपणानें स्वागत केलें. गेल्या शतकांतील लोक याच प्रेमळपणासाठीं व आदरातिथ्यासाठीं प्रसिद्धी पावले होते. ही गरीब पोरकी मुलगी आपल्या आश्रयाला आली, ती जणुं देवानेंच आपल्या-कडे पाठविली, अशी त्यांची भावना होती. लवकरच त्यांना तिचा लळा लागला. कारण ज्याला तिची ओळख पटत असे, त्याला तिच्याविषयीं प्रेम वाटणार नाहीं, हें असंभवच होतें. तिच्याशीं लग्न करण्याचा माझा विचार मूर्खपणाचा होता, अशी माझ्या वडिलांची समजूत होती. पण आतां त्यांचें मत बदललें होतें. आणि आपल्या पेत्रुशाचें कॅप्टनच्या मुलीशींच लग्न व्हावें, अशी माझ्या आईची मनोमन इच्छा होती.

मला अटक झाल्याची बातमी घरीं पोचलीं, तेव्हां माझ्या कुटुंबांतील मंडळीचा एकच गोंधळ उडाला. पुगाचेवशी माझा जो कांहीं चमत्कारिक संबंध आला होता, त्याची हकीगत मरीया इवानोवनानें माझ्या आईबापांना भोळेपणानें सांगून टाकली. ती हकीगत ऐकत असतां त्यांना संताप चढण्याऐवजी गंमत वाटत असे व त्यांना मनापासून हंसूं लोटें. झारचें सिंहासन उलथून पाडणें आणि जमीनदार-शाहीचा नायनाट करणें, या उद्देशानें उभारलेल्या बंडाळींशीं माझा कांहीं संबंध असेल अशी पुसट कल्पनाहि माझ्या वडिलांच्या मनाला कधीं शिवली नाहीं. त्यांनीं सावेलिचला अनेक उलट सुलट प्रश्न विचारले. माझ्या म्हाताऱ्या शिक्षकानें कांहीं लपवाछपवी न करतां वस्तुस्थिति सांगून टाकली. पुगाचेवच्या पंगतीचा मी लाभ घेतला आणि त्यानें मला नजराणे दिले, याची सावेलिचनें कबूली दिली. पण आपणास देशद्रोह कुठेंच दिसला नाहीं, असें त्यानें शपथेवर सांगितलें. सावेलिचनें जें काय सांगितलें होतें, त्यामुळें माझ्या आईबापांच्या मनांतील भीति दूर झाली होती आणि मोठ्या उत्सुकतेनें ते अनुकूल बातमीची वाट पाहत होते. मरीया इवानोवना काळजींत चूर होती. पण ती कमालीची विनयशील व समजूतदार असल्यामुळें ती कांहींच बोलत नव्हती.

असेच कांहीं आठवडे लोटले...आणि एके दिवशीं पिटर्सबर्गहून माझ्या वडिलांना आमचे आप्त प्रिन्स ब...यांचें पत्र आलें. पत्र अर्थात माझ्यासंबंधीं होतें. पहिल्या औपचारिक मजकुरानंतर त्यांनीं लिहिलें होतें कीं, बंडखोरांच्या योजनांत तुमच्या मुलानें भाग घेतला होता, ही गोष्ट दुर्दैवानें निःसंशय सिद्ध झाली

आहे; या गुन्ह्याला योग्य तीच शिक्षा मिळावयास पाहिजे होती; पण महाराणीनें तुमची सेवा व उतार वय लक्षांत घेऊन तुमच्या अपराधी मुलाला क्षमा केली आहे; त्यामुळें वधस्तंभावरील त्याचें लांच्छनास्पद मरण टळलें असून त्याऐवजीं त्याला सैबेरियांतील दूरच्या प्रदेशांत तहाहयात हद्दपारीचा शिक्षा देण्याचा निर्णय घेण्यांत आला आहे.

या अनपेक्षित आघातानें माझ्या वडिलांचें धैर्य पार खचलें. त्यांचा नेहमींचा करारीपणा लोप पावला आणि त्यांनीं मूकपणें आपल्या दुःखाला वाट करून दिली. त्यांचा राग अनावर झाला होता आणि त्या भरांत ते म्हणत,—'काय हे? माझा मुलगा म्हणे बंडखोरांना सामील! देवा, हें पाहण्यासाठींच कां तूं जिवंत ठेवलंस मला? म्हणे, महाराणीसाहेबांनीं त्याची फांशीची शिक्षा रद्द केली! पण त्यामुळें त्याचा गुन्हा थोडाच कमी होणार आहे? वधस्तंभाला मी भीत नाहीं—माझ्या एका पूर्वजानें आपल्या तत्त्वांसाठीं आपला प्राण दिला. वोलिन्स्की आणि ख्रुश्चेव-बरोबर माझा बाप फांसावर लटकला. पण एका सभ्य गृहस्थानें राजनिष्ठेची शपथ पाळूं नयें, हरामखोर, खुनी आणि भटक्या बंडखोरांना सामील व्हावें, ही किती नामुष्कीची गोष्ट आहे! या कुलांगार कारट्यानं माझ्या साऱ्या कुळाला काळोखी फांसली आहे!'—माझ्या वडिलांची ही दशा पाहून माझी आई त्यांच्यासमोर अश्रू ढाळण्यास धजत नसे. साऱ्याच अफवा खऱ्या नसतात, माणसांची मतें खात्रीलायक नसतात, वगैरे सांगून ती त्यांना धीर देण्याचा प्रयत्न करी. पण कशानेंहि माझ्या वडिलांचें सांत्वन होत नसे.

मरीया इवानोवनाला सर्वांत अधिक दुःख सहन करावें लागलें. माझ्यावरील दोषारोपांचें निरसन करणें मला सहज शक्य होतें, याची तिला खात्री होती. पण तसें मी कां करूं शकलों नाहीं, हें तिनें जाणलें होतें. माझ्या दुर्दैवाला आपणच कारणीभूत आहोंत, अशीहि तिनें कल्पना करून घेतली होती. आपले अश्रू आणि दुःख ती इतरांच्या नजरेस पडूं देत नव्हती. माझी मुक्तता कशी करावी, या एकाच विचारांत ती दिवस रात्र गढलेली दिसे.

एके दिवशीं माझे वडील खुर्चीवर बसून कोर्ट कॅलेंडरची पानें चाळीत होते. पण त्यांचे विचार मात्र भलतीकडेच भटकत होते. हा ग्रंथ पाहतांच त्यांना नेहमीं जो आनंद होत असे, तो त्यांच्या मुखावर तेव्हां दिसत नव्हता. एका जुन्या रणगीताच्या चालीवर ते हळूं हळूं शीळ घालीत होते. आई लोंकरीचें जाकीट विणीत बसली होती. तिचे अश्रू तिच्या हातांतील जाकिटावर सारखे पडत होते. मरीया इवानोवना आईजवळ बसून कसलें तरी शिवण टिपण करीत होती. ती एकदम म्हणाली कीं —मला पीटर्सबर्गला जायचं आहे; आणि माझ्या प्रवासासाठीं गाडी जोडून देण्याची व्यवस्था करावी.—तें ऐकून माझ्या आईला फार दुःख झालें.—'पीटर्सबर्गला तूं कशाला जातेस?'—आईनें विचारलें.—'आम्हांला सोडून जाण्याचा तुझाहि

विचार नाहीं ना ?'—मरीया इवानोवनानें सांगितलें कीं माझें सर्व भवितव्य या एका प्रवासावर अवलंबून आहे; ज्यानें राजनिष्ठेपायीं स्वतःचे प्राण वेचले, त्या कॅप्टनची मुलगी म्हणून मी तेथील वजनदार लोकांची मदत मागणार आहे.

माझ्या वडिलांनीं खालीं मान घातली. आपल्या मुलाच्या कल्पित गुन्ह्याची आठवण देणारें कांहींहि घडलें कीं त्यांच्या मनाला वेदना होत; आपल्याला कुणी शिव्याशाप देत आहे, असें त्यांना वाटे.—'तुला जायला हवं तर तूं खुशाल जा.' —एक उसासा टाकून ते म्हणाले.—'तुझ्या सुखाच्या मार्गांत आड यायची आमची कांहीं इच्छा नाहीं. एका देशद्रोह्याऐवजीं देवानं तुला चांगला नवरा द्यावा, हेंच आमचं मागणं आहे.'—असें म्हणून ते उठले आणि बाहेर निघून गेले. नंतर मरीया इवानोवना आणि आई या दोघीच खोलींत होत्या. मरीया इवानोवनानें आपला बेत अंशतः आईच्या कानावर घातला. आईनें अश्रू ढाळीत तिला हृदयाशीं कवटाळलें आणि तिचा कार्यभाग यशस्वी व्हावा म्हणून देवाची प्रार्थना केली. प्रवासाची तयारी करण्यांत कांहीं दिवस लोटले. मग इमानदार पलाशा व विश्वासू सावेलिच यांना बरोबर घेऊन मरीया इवानोवना निघाली. सावेलिचला जबरदस्तीनें माझ्यापासून दूर करण्यांत आलें होतें. म्हणून माझ्या वाग्दत्त वधूची सेवा करण्यांत तो समाधान मानीत होता.

मरीया इवानोवना सोफियाला सुखरूप पोंचली. त्या वेळीं महाराणीचा दरबार झारस्कोये सेलोमध्यें भरत असतो, ही बातमी ऐकून तिनें तिथेंच राहण्यासाठीं जागा शोधण्याचा निश्चय केला. चौकीच्या एका कोपऱ्यांत पार्टिशनमागें तिला जागा देण्यांत आली. चौकीदाराची बायको लगेच तिला बोलावयास आली. दरबारांतील शेकोटींत कोळसे भरणारा नोकर या बाईचा मामा होता. तिनें दरबारांतील जीवनाचीं अनेक रहस्यें मरीया इवानोवनाला सांगितलीं. महाराणी केव्हां उठते, केव्हां कॉफी घेते, फिरायला केव्हां जाते, त्या वेळीं तिच्याबरोबर कोण कोण मानकरी असतात, परवांचे दिवशीं जेवतांना ती काय बोलली होती, संध्याकाळीं तिला कोण कोण भेटलें, थोडक्यांत म्हणजे अन्ना व्लास्येवनाचें भाषण इतिहासाच्या एका पानापेक्षां कमी महत्त्वाचें नव्हतें. आणि पुढच्या पिढीला त्याचा बहुमोल उपयोग झाला असता. मरीया इवानोवना तिचें भाषण लक्षपूर्वक ऐकत होती. नंतर त्या दोघी बागेंत फिरावयास गेल्या. अन्ना व्लास्येवनानें तेथील प्रत्येक रस्त्याचा व पुलाचा इतिहास तिला ऐकवला. फिरून त्या दोघी चौकीवर परत आल्या तेव्हां त्यांची चांगलीच गट्टी जमली होती.

दुसऱ्या दिवशीं मरीया इवानोवना सकाळीं लवकर उठली आणि पोशाख करून बागेंत फिरावयास गेली. सकाळचा देखावा रमणीय होता. लिंबाच्या झाडांचे शेंडे कोंवळ्या उन्हांत चमकत होते. शरद् ऋतूच्या थंडगार हवेमुळें झाडांचीं पानें पिवळीं पडलीं होतीं. विस्तीर्ण सरोवरांतील निश्चल जलराशी सोनेरी उन्हांत चमकत

होत्या. हंस नुकतेच जागे झाले होते. आणि सरोवराच्या कांठावरील झुडपांआड पाण्याच्या नितळ पृष्ठभागावरून फिरत होते. मरीया इवानोवना फिरत फिरत एका सुंदर कुरणाजवळ आली. या कुरणाच्या मधोमध एक स्तंभ उभारण्यांत आला होता. काउंट अलेक्झांद्रोविच रूम्यान्तसेव या सेनापतीनें नुकतेच लागोपाठ विजय मिळविले होते. म्हणून त्या विजयांच्या सन्मानार्थ हा स्तंभ उभारण्यांत आला होता. मरीया इवानोवना कुरणाजवळ पोंचते न पोंचते तोंच इंग्रज जातीचा एक छोटा पांढरा कुत्रा तिच्या अंगावर धांवून आला व जोरजोरानें भुंकूं लागला. भीतीनें ती जागच्या जागीं थबकून उभी राहिली. तेवढ्यांत कोणा स्त्रीचा मधुर आवाज तिच्या कानीं आला,— 'भिऊं नका. तो चावत नाहीं.'—मरीया इवानोवनानें आवाजाच्या दिशेला पाहिलें, तर स्तंभाच्या समोर एका बांकावर एक स्त्री बसलेली तिला दिसली. मरीया इवानोवना बांकाच्या दुसऱ्या टोंकाला बसली. ती स्त्री तिच्याकडे सारखी पाहत होती. मरीया इवानोवनानें पण चोरून दृष्टिक्षेप टाकून त्या स्त्रीचें आपाद मस्तक निरीक्षण केलें. तिनें अंगांत पांढरा झगा घातला होता. तिच्या डोक्यावर रात्रीची टोपी होती. आणि झग्यावर एक उबदार जाकीट तिनें घातलें होतें. ती स्त्री चाळीशीच्या आसपास असावी. तिचा चेहरा रुबाबदार व शांत दिसत होता. तिच्या निळ्या डोळ्यांत आणि अस्पष्ट स्मितांत अवर्णनीय आकर्षण होतें. तिनेंच प्रथम संभाषणाला सुरवात केली.

'तूं जवळच कुठं राहतेस होय ?'—तिनें विचारलें.

'नाहीं, बाईसाहेब. मी कालच इथं आलें आहे.'

'तुझ्या बरोबर कोण आलं आहे ?'

'कुणी नाहीं. मी एकटीच आलें आहे.'

'एकटीच ? तूं तर अजून लहान दिसतेस.'

'मला आई नाहीं कीं बाप नाहीं.'

'तूं कांहीं कामासाठीं आलीस वाटतं. खरं ना ?'

'होय, बाईसाहेब. महाराणीकडे एक अर्ज सादर करायचा आहे.'

'तूं पोरकी आहेस. तुझ्यावर कांहीं अन्याय झाला असेल व त्याची तक्रार घेऊन तूं आली असशील.'

'नाहीं, बाईसाहेब, मी न्याय मागण्यासाठीं आलें नाहीं. तर दयेची भीक मागण्यासाठीं आलें आहे.'

'तूं कोण आहेस, तें मला समजलं नाहीं.'

'मी कॅप्टन मिरोनोवची मुलगी.'

'कॅप्टन मिरोनोव ? ओरेनबुर्ग परगण्यांतील एका किल्ल्याचा माजी कमांडर ?'

' होय, बाईसाहेब. '

त्या स्त्रीचें हृदय द्रवल्यासारखें दिसलें.—'अरेरे! मुली,'—तिच्या आवाजांत प्रेमळपणा व्यक्त होत होता.—' मी तुझ्या खाजगी प्रश्नांत ढवळाढवळ केली असेल, तर क्षमा कर मला. पण दरबारशीं माझा संबंध येतो. तुझं काय म्हणणं आहे, तें मला सांग. कदाचिन् मी तुला मदत करूं शकेन. '

मरीया इवानोवना उभी राहिली. आणि तिनें त्या स्त्रीचे आदरपूर्वक आभार मानले. त्या अनोळखी स्त्रीच्या हालचालीच अशा होत्या कीं तिची सहानुभूति मिळवावी आणि तिच्यावर विश्वासानें भार टाकावा, असें वाटत होतें. मरीया इवानोवनानें घडी केलेला एक कागद आपल्या खिशांतून बाहेर काढला व तो त्या स्त्रीच्या स्वाधीन केला. तिनें त्या कागदांतील मजकूर मनांतल्या मनांत वाचावयास आरंभ केला.

प्रथम तिनें मजकूर लक्षपूर्वक व सहानुभूतीच्या भावनेनें वाचला. पण लवकरच तिच्या चेहऱ्यावरचे भाव बदलूं लागले. मरीया इवानोवना तिच्याकडे लक्षपूर्वक पाहत होती. थोड्या वेळापूर्वीं त्या स्त्रीची मुद्रा प्रसन्न व शांत दिसत होती. पण कांहीं मजकूर वाचल्यानंतर तिच्या चेहऱ्यावर कठोरपणाचे भाव उमटलेले पाहून मरीया इवानोवना भयभीत झाली.

' ग्रिनेवसाठीं तूं रदबदली करीत आहेस ? '—त्या स्त्रीनें विचारलें.—'त्याला महाराणी कधीं क्षमा करणार नाहीं. अज्ञानानें किंवा कांहीं मोहाला बळी पडून तो तोतया झारला मिळाला, असं मुळींच नाहीं. एका दुराचारी आणि घातक बदमाषासारखं त्याचं हें कृत्य आहे.'

' नाहीं. तें खरं नाहीं.' – मरीया इवानोवना दुःखवेगानें म्हणाली.

' खरं नाहीं ? '—रागानें लाल होऊन त्या स्त्रीनें विचारलें.

' नाहीं. मुळींच खरं नाहीं. मी शपथेवर सांगतें कीं तें खरं नाहीं. मला सर्व कांहीं माहित आहे आणि मी तुम्हांला सारं सांगतें. त्यानं माझ्यासाठीं तें सारं कांहीं सहन केलं. खटल्यांत माझं नांव गोवलं जाऊं नये म्हणून तो स्तब्ध राहिला असावा. नाहींतर स्वतःचा बचाव त्याला सहज करतां आला असता.'—असें म्हणून वाचकांना माहित असलेली तिची कर्मकहाणी तिनें भडभडा सांगून टाकली.

त्या स्त्रीनें सारें कांहीं लक्षपूर्वक ऐकून घेतलें. मरीया इवानोवनाची हकीगत संपल्यानंतर तिनें विचारलें,—' कुठं राहतेस तूं ? '—आणि अन्ना व्लास्येवनाचें नांव ऐकून ती हंसत म्हणाली,—' माझ्या ओळखीची आहे ती. ठीक आहे. आतां माझी जायची वेळ झाली आहे. आपली भेट झाल्याचं कुणाजवळ बोलूं नकोस. तुझ्या अर्जाचं उत्तर तुला लवकरच मिळेल. त्यासाठीं तुला जास्त वाट पाहवी लागणार नाहीं. '

असें म्हणून ती एका आच्छादित पाय वाटेनें चालावयास लागली. आणि मरीया इवानोवना घरीं परतली तेव्हां तिचें अंतःकरण भावी सुखाच्या आशेनें भरून गेलें होतें.

इतक्या पहाटे थंडी वाऱ्यांत फिरावयास गेल्याबद्दल अन्ना व्लास्येवनानें तिची हजेरी घेतली. तरुण मुलींना अशी हवा चांगली नाहीं, असें तिनें सांगितलें. तिनें सामोवार आणला व चहा पीत पीत दरबारची एक गोष्ट ती सांगत होती. तेवढ्यांत एक दरबारी गाडी पोर्चमध्यें येऊन उभी राहिली. एक हुजऱ्या घरांत आला आणि त्यानें सांगितलें कीं मरीया मिरोनोवाला महाराणीसाहेबांनीं मुलाखतीसाठीं बोलावलें आहे.

अन्ना व्लास्येवनाच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं. तिची एकच धांदल उडाली होती.—‘ महाराणीनें तुला बोलावलं आहे. ’—ती म्हणाली. —‘ पण तिला तुझी खबर कळली कशी ? अन् तिच्या समोर तूं कसं जाशील ? दरबारांत कसं वागावं हें तुला माहित नसेलच...मी येऊं कां तुझ्याबरोबर ? मी तुला कांहीं सूचना तरी देईन. आणि अशा प्रवासाच्या पोशाखांत तूं तिथं जाणार होय ? दाईकडून तिच्या पिवळा झगा मागून आणूं कां ? ’—पण हुजऱ्यानें सांगितलें कीं मरीया इवानोवनानें एकटीनेंच व आहे त्या पोशाखांत यावें, अशी महाराणीसाहेबांची आज्ञा आहे. आतां कांहीं इलाज नव्हता. मरीया इवानोवना गाडींत बसली आणि गाडी निघेपर्यंत अन्ना व्लास्येवना तिला मधून मधून सूचना व आशीर्वाद देत होती.

आतां आमच्या भवितव्याचा निर्णय लागणार आहे, याची मरीया इवानोवनाला कल्पना आली. तिचें अंतःकरण धडधडूं लागलें. नंतर आंतली सारी हालचाल थंडावली आहे, असेंहि तिला वाटलें. थोड्या वेळांत गाडी राजवाड्यासमोर उभी राहिली. पायऱ्या चढतांना तिचा थरकांप होत होता. दरवाजे उघडले जात होते. दरबारी हुजऱ्या तिला वाट दाखवीत होता. अनेक शोभिवंत दिवाणखान्यांतून ती पुढें जात होती. शेवटीं एका बंद दाराजवळ ती उभी राहिली. तिला तेथें थांबावयास सांगून हुजऱ्या वर्दी देण्यासाठीं आंत गेला. आतां ती एकटीच तिथें उभी होती.

महाराणीला समोरासमोर भेटण्याचा विचार देखील तिला इतका भयप्रद वाटला कीं तिचे पाय लटपटूं लागले. थोड्या वेळानें बंद दरवाजा उघडला गेला आणि ऐश्वर्यशाली राजमहालांत तिनें प्रवेश केला.

महाराणी एका आरशासमोर बसली होती. तिच्या भोंवतालीं चार दोन दरबारी मानकरी होते. त्यांनी मरीया इवानोवनाला सन्मानपूर्वक वाट करून दिली. महाराणीनें प्रेमळ आवाजांत तिला हांक मारली. मरीया इवानोवनानें तिच्याकडे पाहिलें, तर थोड्या वेळांपूर्वीं बागेंत जी स्त्री तिच्याशीं मोकळेपणानें बोलली होती, ती स्त्री म्हणजेच महाराणी होय, हें मरीया इवानोवनानें ओळखलें. महाराणीनें तिला जवळ बोलावलें आणि ती हंसत हंसत म्हणाली,—‘ मी माझं वचन खरं केलं आहे आणि तुझा दयेचा अर्ज मंजूर केला आहे. तूं ज्याच्याशीं लग्न करायचं ठरवलं आहेस, तो निरपराध असल्याची माझी खात्री झाली आहे. हें पत्र घे अन् तुझ्या भावी सासऱ्याच्या हातीं दे.’

मरीया इवानोवनानें तें पत्र थरथरत्या हातानें स्वीकारलें आणि तिनें महाराणीच्या पायांवर लोळण घेतली. महाराणीनें तिला उचललें व तिचें चुंबन घेतलें. नंतर ती म्हणाली,—'मुली, तूं श्रीमंत नाहीस, हें मी जाणतें. आणि कॅप्टन मिरोनोवच्या मुलीचं ऋण मला अजून फेडायचं आहे. भविष्याची चिंता करूं नकोस. यापुढें तुझा सारा भार मी उचलला आहे.'

त्या गरीब अनाथ मुलीची प्रेमळपणानें विचारपूस करून महाराणीनें तिला निरोप दिला. मरीया इवानोवना त्याच दरबारी गाडींतून घरीं आली. अन्ना व्लास्येवना तिची आतुरतेनें वाट पाहत होती. मरीया इवानोवना गाडींतून उतरताक्षणीं तिनें तिच्यावर असंख्य प्रश्नांचा भडिमार केला. त्या प्रश्नांचीं कशींबशीं उत्तरें देऊन मरीया इवानोवनानें आपली सुटका करून घेतली. दरबारांत जें काय घडलें, त्यांतील फारच थोडें तिला आठवत होते, म्हणून अन्ना व्लास्येवना असंतुष्ट दिसली. पण ती खेडवळ व लाजाळू मुलगी आहे, अशी आपल्या मनाची समजूत काढून अन्ना व्लास्येवनानें तिला उदार अंतःकरणानें क्षमा केली. मग पीटर्सबर्ग पाहण्यासाठीं एक क्षण सुद्धां न थांबतां मरीया इवानोवना त्याच दिवशी आपल्या भावी सासऱ्याच्या घरीं परत गेली.*

* * *

* 'कॅप्टनची मुलगी' या पुस्तकांत दुसऱ्या कॅथेरिनचें जें चित्र पुश्किननें रेखाटलें आहे, त्यांतील माहिती सरकारी कागदपत्रांतून घेण्यांत आली असली तरी, त्यांत उपरोधाचा अतिसूक्ष्म अदृश्य प्रवाह आहे. तो समजून घेण्यासाठीं या रशियन महाराणीचें पुश्किननें जें खरें चित्र रेखाटलें आहे, त्याची वाचकांना मदत घ्यावी लागेल. पुश्किनच्या टिपणांत या महाराणीविषयींचा पुढील मजकूर सांपडला असून तो त्यावेळीं प्रकाशनासाठीं लिहिण्यांत आला नव्हता :

'मानवी दौर्बल्याचें ज्ञान आणि त्याचा फायदा घेण्याचें चातुर्य; यालाच मुत्सद्देगिरी हें नांव द्यावयाचें असेल तर कॅथेरिन भावी पिढीच्या गौरवास पात्र आहे...पण एक वेळ अशी येईल कीं तिच्या कारकीर्दींत सार्वजनिक नीतिमत्तेवर जो परिणाम झाला, त्याचें इतिहास मूल्यमापन करील. त्यावेळीं सज्जनपणाच्या व सहिष्णुतेच्या बुरख्याआड दडलेलें तिच्या जुलमी राजवटीचें कटु सत्य चव्हाट्यावर येईल. आणि तिच्या हस्तकांनीं रयतेची केलेली पिळणूक, तिच्या प्रियकरांनीं सरकारी खजिन्याची केलेली लूट, तिच्या राजवटीच्या अर्थव्यवस्थेंतील महत्त्वाच्या चुका, अयोग्य कायदेकानू, आणि त्या वेळच्या विचारवंतांशीं तिची किळसवाणी विदूषकी थाटाची वर्तणूक, या गोष्टींहि उजेडांत येतील. आणि मग तिच्या कारकीर्दीला फसलेला वाल्तेअरदेखील रशियांतील शिव्याशापांपासून तिच्या तेजस्वी स्मृतीचें रक्षण करूं शकणार नाहीं'—अनु०

प्योत्र आंद्रेविच ग्रिनेवचें हस्तलिखित येथेंच संपतें. त्याच्या घराण्याची कूळकथा असें सांगते कीं महाराणीच्या हुकुमावरून त्याची १७७४ सालच्या शेवटीं सुटका झाली. पुगाचेवला फांशीं देण्यांत आलें, त्यावेळीं ग्रिनेव तेथें हजर होता. पुगाचेवनें आपल्या नजरेनें त्याला त्या गर्दीतून हुडकून काढलें आणि आपली मान हलविली. क्षणभरानें मारेकऱ्यांनीं पुगाचेवचें डोकें उडविलें व रक्ताळलेलें मुंडकें उंच धरून लोकांना दाखविलें. त्यानंतर कांहीं दिवसांनीं प्योत्र आंद्रे विच ग्रिनेवनें मरीया इवानोवनाशीं विवाह केला. सिंबर्स्क परगण्यांत आजहि त्याचे वंशज आनंदानें राहत आहेत. क्ष. गांवापासून तीस वेर्स्तच्या अंतरावर दहा जमीनदारांच्या मालकीचें एक खेडें आहे. त्या खेड्यांतील बंगल्याच्या एका विभागांत दुसऱ्या कॅथेरिनच्या हस्ताक्षरांतील एक पत्र फ्रेम करून टांगलेलें आहे. हें पत्र आंद्रे पेत्रोविच ग्रिनेवला उद्देशून लिहिलें असून त्यांत त्याच्या मुलाच्या सुटकेची बातमी कळविली आहे आणि कॅप्टन मिरोनोवच्या मुलीच्या सद्‌वर्तनाची स्तुति केली आहे. प्योत्र आंद्रेविच ग्रिनेवचें हें हस्तलिखित त्याच्या एका नातवानें आमच्या हवाली केलें. आम्ही त्याच्या आजोबाच्या काळांतील इतिहासासंबंधीं कांहीं लिखाण करीत आहोंत, हें त्या नातवाला माहित होतें. स्वतंत्र ग्रंथरूपानें हें हस्तलिखित प्रकाशित करण्यास ग्रिनेवच्या वंशजांनीं आम्हांला परवानगी दिली. प्रत्येक प्रकरणाच्या आरंभी योग्य अशी आवतरणें घालून आणि कांहीं नांवें बदलण्याचें स्वातंत्र्य घेऊन आम्ही तें हस्तलिखित ग्रंथरूपानें प्रसिद्ध केलें आहे.

**ऑक्टोबर १९, १८३६**

**संपादक**

---

# परिशिष्ट

## *वगळलेलें प्रकरण**

आम्ही आतां वोल्गा नदीच्या तीरावर येऊन पोंचलों होतों. आमच्या तुकडीनें क्ष. खेड्यांत प्रवेश केला आणि रात्रींपुरता तिथेंच तळ ठोकला. गांवकऱ्यांनी मला माहिती दिली कीं पलीकडच्या कांठावरील सर्व खेड्यांत बंडाचा वणवा पेटला असून पुगाचेवचे टोळीवाले सर्वत्र लूटमार करीत आहेत. या बातमीनें मी हैराण झालों. दुसऱ्या दिवशीं सकाळीं नदी ओलांडून जाण्याचा आमचा बेत ठरला होता.

मी अतिशय अस्वस्थ झालों होतों. नदीच्या दुसऱ्या कांठापासून तीस वेर्स्तच्या अंतरावर माझ्या वडिलांची इस्टेट होती. पलीकडे जाण्यासाठीं पडाव मिळेल कां, म्हणून मी चौकशी केली. त्या खेड्यांतील सर्व शेतकरीच कोळी होते व तेथें पडावांना तोटा नव्हता. मी ग्रिनेवला भेटलों आणि माझा मनसुबा त्याच्या कानावर घातला.

'नीट काळजी घे.'—मला सावधगिरीची सूचना देण्यासाठीं तो म्हणाला, —'तूं एकट्यानें जाणें योग्य नाहीं. त्यांत धोका आहे. सकाळपर्यंत वाट पहा. उद्यां पहिल्या पडावांतच आपण पलीकडे जाऊं. आणि गरज भासल्यास पन्नास घोडेस्वारांना तुझ्या वडिलांच्या घरीं पाठवून देऊं.'

पण मी हट्टास पेटलों होतों. पडाव तयारच होता. दोन कोळ्यांना बरोबर घेऊन मी लगेच निघालों. त्यांनीं जोरांत वल्हीं मारावयास सुरवात केली. आभाळ स्वच्छ होतें. आणि चांदणें सुरेख पडलें होतें. रात्र शांत होती. नदीचें पाणी संथपणें वहात होतें. एका तालांत वर खालीं होत होत पडाव नदीच्या गडद पाण्यावरून पुढें जात होता. मी विचारांत गढून गेलों.

अर्धा तास गेला. आम्ही नदीच्या मध्यावर पोंचलों. आणि तेवढ्यांत त्या दोघा कोळ्यांची कांहींतरी कुजबुज सुरू झाली.

---

* 'कॅप्टनची मुलगी' या पुस्तकाच्या प्रसिद्धीसाठीं तयार केलेल्या शेवटच्या हस्तलिखितांत हें प्रकरण घालण्यांत आलें नव्हतें. सेन्सॉरबाबतच्या अडचणींचा विचार करून तें वगळण्यांत आलें होतें व फक्त हस्तलिखिताच्या स्वरूपांत तें जपून ठेवण्यांत आलें होतें. म्हणून पुश्किननें स्वतःच या प्रकरणाला 'वगळलेलें प्रकरण' हें नांव दिलें. मूळ हस्तलिखितांत ग्रिनेवला 'बुलानिन' व झ्रूरिनला 'ग्रिनेव' म्हणण्यांत आलें होते. नंतर हीं आडनांवें बदलण्यांत आलीं. पण हे बदल येथें करण्यांत आलेले नाहींत व आडनांवें मूळ हस्तलिखिताप्रमाणेंच ठेवण्यांत आलीं आहेत.—अनु०

'काय झालं रे ?'—मी झोपेंतून जागे झाल्यासारखें विचारलें.

'काय आहे तें समजत नाहीं.'—त्या दोघांनीं उत्तर दिलें. ते दोघेहि एकाच दिशेकडे पाहत होते.

त्या दिशेनें मी पण बघावयास लागलों. कांहीं तरी वरच्या बाजूनें खालीं वाहत येत होतें. एक विलक्षण वस्तु आमच्या जवळ जवळ येत होती. हातांतील वल्हीं टाकून थोडा वेळ स्वस्थ बसण्यास मी त्या कोळयांना सांगितलें.

चंद्र ढगाआड लपला होता. ती वाहत येणारी वस्तु जास्तच काळी दिसूं लागली. ती आतां अगदीं आमच्या जवळ आली होती. पण तरीसुद्धां ती काय असावी, हें समजत नव्हतें.

'काय असावं तें ?'—कोळी म्हणाले.—'पडाव म्हणावा तर डोलकाठी दिसत नाहीं आणि शीडहि नाहीं.'—तेवढ्यांत चंद्र बाहेर आला आणि त्या चांदण्यांत एक भयंकर दृश्य दिसलें. तो एक तराफा होता आणि त्यावरील आडव्या दांडीवर तीन प्रेतें लटकत होतीं. फांसावर लटकलेलीं तीं माणसें कोण आहेत, तें जाणून घेण्याची माझ्या मनांत तीव्र जिज्ञासा उत्पन्न झाली.

बोटीच्या गळानें तो तराफा थांबविण्यास मी माझ्या माणसांना सांगितलें. नंतर आमचा पडाव तराफ्याजवळ नेण्यांत आला. मी तराफ्यावर उडी मारली. माझी उडी त्या दोन उभ्या खांबाच्या मधोमध पडली. मी प्रेतांकडे पाहिलें तर एक प्रेत एका चुवाश म्हाताऱ्याचें होतें. दुसरें एका वीस वर्षांच्या तगड्या जवान रशियन शेतकऱ्याचें होतें. तिसरें प्रेत पाहिल्यावर मला जोराचा धक्का बसला. आणि अतिभयानें माझ्या तोंडांतून एक किंकाळी फुटली. तें प्रेत आमच्या वान्याचें होतें. कसल्यातरी मोहाला बळी पडून तो पुगाचेवला सामील झाला होता. आडव्या दांडीला त्यांच्या डोक्यांवर फळयाचा एक एक तुकडा ठोकला होता व त्यावर 'चोर आणि बंडखोर' हे शब्द मोठ्या अक्षरांत लिहिले होते. कोळयांनीं गळ लावून तो तराफा धरून ठेवला होता व पडावांत माझी परत येण्याची ते शांतपणें वाट पाहत होते. मी पडावांत आलों. तराफा धारेबरोबर वाहत चालला. बराच वेळपर्यंत तो एखाद्या काळ्या ठिपक्यासारखा दिसत होता. शेवटी तो अजिबात दिसेनासा झाला. आणि माझा पडाव पलीकडच्या कांठाला लागला...

कोळयांना मी सढळ हातानें बक्षिस दिलें. त्यांच्यापैकीं एकजण तरीच्या जवळ असलेल्या एका खेड्यांतील बंडखोरांच्या म्होरक्याकडे मला घेऊन जाण्यास तयार झाला. मी त्याच्या मागोमाग एका झोंपडींत गेलों. मला घोडे हवेंत, हें जेव्हां म्होरक्याली समजलें, तेव्हां माझी दामटी वळण्याच्या तयारींत तो दिसला. पण त्या कोळयानें हलक्या आवाजांत त्याला कांहीं तरी सांगितलें. तेव्हां त्याच्या चेहऱ्यावरील कठोरपणा पार नाहींसा झाला व तो माझी खुशामत करूं लागला. थोड्यांच वेळांत

तीन घोडे जुंपलेली एक गाडी बाहेर येऊन उभी राहिली. मी गाडींत बसलों आणि माझ्या वडिलांच्या खेड्याकडे चलण्यास गाडीवानाला सांगितलें.

हमरस्त्यावरून आमची गाडी भरधांव निघाली. खेड्यामागून खेडीं मागें पडूं लागलीं. रस्त्यावरच कुणीतरी थांबवील, याचीच काय ती मला भीति होती. थोड्या वेळापूर्वी मी वोल्गावर तो तराफा पाहिला होता. त्यावरून बंडखोरांच्या अस्तित्वाची साक्ष पटत होती. पण त्याचबरोबर आमच्या अधिकाऱ्यांकडून बंडखोरांचा जोरदार प्रतिकार होत आहे, याची साक्षहि तो तराफाच पटवीत होता. तशी जरूरच पडली असती, तर माझ्या एका खिशांत पुगाचेवचा परवाना होता आणि दुसऱ्या खिशांत ग्रिनेवचा हुकुम होता. पण वाटेंत कुणीच भेटलें नाहीं. पहांटे पहांटे माझ्या खेड्याच्या अलीकडे असलेली नदी व फर वृक्षांची दाट झाडीं दिसूं लागली. गाडीवानानें चाबकाचे फटके मारून घोडे पळविले आणि पंधरा मिनिटांच्या आंत मी क्ष. खेड्यांत येऊन पोंचलों.

आमचें घर खेड्याच्या दुसऱ्या टोंकाला होतें. घोडे वेगानें धांवत होते. पण गाडीवानानें लगाम खेचून ऐन रस्त्यांतच एकदम गाडी थांबविली.—'काय झालं रे ?'—मी त्रासून विचारलें.

'ही चौकी आहे, सरकार.'—तो म्हणाला. घोड्यांना आवरणें त्याला कठीण जात होतें.

पाहिलें, तर खरोखरच समोर एक तात्पुरती अडवण दिसत होती. एक शेतकरी पहारा देत उभा होता. त्याच्या हातांत काठी होती. तो गाडीजवळ आला आणि डोक्यावरची टोपी काढून त्यानें अदबीनें परवाना विचारला.

'याचा अर्थ काय ?'—मी विचारलें.—'ही अडवण कशासाठीं ? कुणाचं रक्षण करीत आहेस तूं ?'

'असं कसं म्हणतां, महाराज ? आम्ही बंड केलं आहे.'—त्या शेतकऱ्यानें मानेवरचे केस खाजवीत उत्तर दिलें. त्याचें उत्तर ऐकून माझें हृदय भयानें एकदम खचलें.

'आणि तुझे धनी कुठं आहेत ?'—मीं विचारलें.

'धनी ? कोठारांत आहेत.'—तो म्हणाला,

'काय ? कोठारांत ?'

'होय. आंद्रुश्कानं त्यांच्या हातापायांत बेड्या ठोकल्या आहेत अन् त्यांना तो झारपुढें उभं करणार आहे.'

'काय, झारपुढें ? चल, उचल तो वासा. मूर्ख कुठला ! असा बघतोस काय खुळ्या सारखा ?'

तो शेतकरी आढेओढे घेऊं लागला. तें पाहून मी गाडींतून खालीं उडी मारली, त्याचा कानशिलावर एक सणसणीत ठोसा हाणला ( आतां मला त्याचें वाईट वाटतें ) आणि रस्ता अडविणारा तो वासा बाजूला फेकून दिला. शेतकरी माझ्याकडे नुसता आ वासून पाहतच राहिला. मग मी पुन्हां गाडींत चढलों आणि गाडीवानाला त्या मोठ्या घराकडे गाडी न्यावयास सांगितलें. तें कोठार आमच्या घराच्या आवारांत होतें. आणि त्याच्या दाराला कुलूप ठोकलें होतें. दारासमोर दोन शेतकरी हातांत लाठ्या घेऊन पहारा देत होते. माझी गाडी त्यांच्या पुढ्यांत जाऊन उभी राहिली. मी गाडींतून खाली उडी मारली व त्या शेतकऱ्यांजवळ जाऊन त्यांना हुकमी आवाजांत सांगितलें,—' उघडा तें दार ! '

माझ्या हालचालींत किंवा अविर्भावांत कांहीं तरी भयंकर असलें पाहिजे. कारण हातांतील सोटे तेथेंच टाकून त्या दोघांनींहि तेथून पळ काढला. मी कुलूप तोडण्याचा प्रयत्न केला. पण तें जमलें नाहीं. तेव्हां दरवाजा फोडण्याची खटपट केली. पण तेंहि शक्य झालें नाहीं. कारण दरवाजाच्या फळया ओक लाकडाच्या होत्या. तेवढ्यांत एक जवान शेतकरी एका झोपडींतून बाहेर आला आणि हा गोंधळ माजविण्याचें कारण काय, म्हणून त्यानें उद्धटपणानें मला विचारलें.

' आंद्रुश्का कुठं आहे ?'—मी ओरडून त्याला विचारलें.—' बोलाव त्याला. '

' हें पहा, माझं नांव आंद्रुश्का नाहीं. '—कंबरेवर हात ठेवून मोठ्या ऐटींत त्यानें उत्तर दिलें.—' आंद्रेइ आफानास्येविच म्हणतात मला. बोला, काय काम आहे ? '

त्याला उत्तर देण्याच्या भानगडींत न पडतां मी सरळ त्याची मानगूट पकडली व ओढीतच त्याला दाराजवळ आणून कुलूप उघडावयास सांगितलें. थोडा वेळ तो अडून बसला. पण धाकदपटशाचा त्याच्यावरहि परिणाम होऊन त्यानें किल्ली काढून दरवाजा उघडला. मी पळतच आंत गेलों आणि छतांतील एका बारीक फटींतून आंत येणाऱ्या अंधुक उजेडांत मला माझे आईबाप एका काळोख भरल्या कोपऱ्यांत बसलेले दिसले. त्यांचे हात काढण्यांनीं बांधले होते व पायांत लाकडी खोडे अडकविण्यांत आले होते. एक शब्दहि न उच्चारतां मी त्यांना कडकडून मिठी मारली. ते आश्चर्यचकित होऊन माझ्याकडे पाहत होते. कारण लष्करांतील तीन वर्षांच्या नोकरीमुळें मी फार बदलून गेलों होतों व प्रथम त्यांनीं मला ओळखलेंच नाहीं. आई तर नुसती आ वासून माझ्याकडे पाहूं लागली आणि रडूं लागली.

तेवढ्यांत माझ्या परिचयाचा मधुर आवाज माझ्या कानीं आला.

' प्योत्र आंद्रेइच, आलास वाटतं तूं ? '

तो आवाज ऐकून मी गोंधळून गेलों आणि दचकून मागें वळून पाहिलें, तर दुसऱ्या कोपऱ्यांत मरीया इवानोवना मला दिसली. तिचेहि हात बांधलेले होते व पायांत खोडा होता.

माझी तलवार बाहेर काढून मी घाईघाईनें काढण्यांच्या गांठी तोडल्या व सर्वांना मोकळें केलें.

लगेच मला छातीशीं घट्ट आवळून धरून वडील आनंदानें म्हणाले,— 'आलास, पेत्रुशा ! फार आनंद झाला मला. तुझी भेट व्हावी, म्हणून देवानंच आम्हांला जिवंत ठेवलं...'

'पेत्रुशा, माझ्या लाडक्या,' —आई. आनंदातिशानें म्हणाली,—'देवानंच पाठवलं बाबा तुला ! कशी आहे तुझी तब्येत ?'

त्या सर्वांची बंदीवासांतून मुक्तता करण्यासाठीं त्यांना घेऊन मीं दाराजवळ आलों. पण दाराला बाहेरून पुन्हां कुलूप लावण्यांत आलें होतें.

'आंद्रुश्का, '—मी ओरडून हांक मारली,—' उघड दार लवकर !'

'नाहीं. मी नाहीं उघडणार. '—बाहेरून तो ओरडून सांगत होता.— 'तुम्हीहि आतां तिथेंच राहा. इथं येऊन तुम्ही हंगामा केला अन् झारच्या अधिकाऱ्याला इजा पोंचविली. आतां भोगा त्याचीं फळं.'

बाहेर निसटण्यासाठीं कुठें रस्ता मिळतो कीं काय, याचा कोठारांत मी शोध घेऊं लागलों.

'त्याचा कांहीं एक उपयोग नाहीं. '—माझे वडील म्हणाले,—'चोरांसाठीं माझ्या कोठारांत वाटा नाहींत.'

माझ्या येण्यानें थोडी आनंदित झालेली माझी आई पुन्हां दुःख करूं लागली. सर्व कुटुंबाबरोबर आतां माझाहि घात होणार असें तिला वाटत होतें. माझी मनःस्थिति मात्र वेगळी होती. आपल्या प्रियजनांची भेट झाल्यापासून माझें मन बरेंच स्थिर व शांत झालें होतें. माझ्याजवळ एक तलवार व दोन पिस्तुलें होतीं. त्यामुळें कोठाराला वेढा पडला तरी मी बराच वेळपर्यंत शत्रूचा मुकाबला केला असता. शिवाय संध्याकाळपर्यंत ग्रिनेव येथें येईल आणि आमची सुटका करील, अशीहि मला खात्री होती. हें सारें सांगून माझ्या आईबापांना मी दिलासा दिला. आमची सर्वांची पुन्हा भेट झाली होती आणि त्याच्याच आनंदांत ते गढून गेले होते.

'हें बघ, प्योत्र,'—माझे वडील म्हणाले,—'तूं आतांपर्यंत पुष्कळ खोड्या केल्या आणि मीहि तुला पुष्कळच रागावत असे. पण आतां मागील गोष्टी उकरून काढण्यांत अर्थ नाहीं. मला वाटतं, तुला तुझ्या चुका समजून आल्या आहेत व तूं

आपलं वर्तन सुधारलं आहेस. लष्करांत तूं नेकीनं वागलास, हें मला समजलं आहे. मला तुझा अभिमान वाटतो. म्हातारपणीं तूं मला संतोष दिलास. आणि आतां तुझ्यामुळें माझी सुटका झाली, तर उरलेलं आयुष्य मी दुप्पट आनंदानें काढीन.'

माझ्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. वडिलांचा हात हातांत घेऊन मी त्यांचें चुंबन घेतलें. मी मरीया इवानोवनाकडे पाहिलें, तर माझ्या भेटीमुळें तिला इतका आनंद झाला होता कीं तिच्या चेहऱ्यावर संतोष आणि समाधान विलसत असलेलें दिसलें.

दुपारच्या सुमारास बाहेरचा विलक्षण आरडाओरडा आमच्या कानीं आला.

'याचा अर्थ काय ?'—माझ्या वडिलांनीं विचारलें,—'तुझा कर्नल तर आला नाहीं ना ?'

'तें शक्य नाहीं.'—मी उत्तर दिलें.—'संध्याकाळपूर्वी तो इथें येणें शक्यच नाहीं.'

आरडाओरडा सारखा वाढत होता. भयसूचक घंटा खणखणूं लागल्या. आमच्या घराच्या आवारांत घोड्यांच्या टापांचे आवाज येऊं लागले. तेवढ्यांत भिंतींतील एका अरुंद फटीजवळ सावेलिचचें पांढरें डोकें दिसलें. माझा दुर्दैवी शिक्षक दुःखभरानें ओरडत होता :

'आंद्रे पेत्रोविच ! अवदोत्या वासिल्येवना ! प्योत्र आंद्रेइच ! मरीया इवानोवना ! फार वाईट बातमी आहे बघा ! ते बदमाष लोक गांवांत आले आहेत. अन् त्यांचा म्होरक्या कोण आहे, माहित आहे ? श्वाब्रिन, अलेक्सेइ इवानिच. देव त्याचं तळपट करो !'

श्वाब्रिनचें नांव ऐकतांच एकांत एक हात गुंतवून मरीया इवानोवना जागच्याजागीं निश्चल उभी राहिली.

'हें बघ, सावेलिच !'—मी मोठ्यानें ओरडलों.—'कुणाला तरी घोड्यावरून तरीला पाठव. तिथें आपल्या घोडेस्वाराची रेजिमेंट आहे. त्यांना सांग कीं आम्ही संकटांत असल्याची कर्नल ग्रिनेवला बातमी कळवा म्हणून.'

'पण कुणाला पाठवूं, धनी ? सर्व लोक बंडखोरांना मिळाले आहेत, गांवांतील सर्व घोडे त्यांनीं आपल्या ताब्यांत घेतले आहेत. अरे देवा ! ते तर आतां आवारांत आले. इकडेच मोर्चा वळवला आहे त्यांनीं.'

दाराबाहेर एकच हलकल्लोळ ऐकूं आला. आई आणि मरीया इवानोवना यांना खूण करून त्यांना मी एका कोपऱ्यांत उभे राहवयास सांगितलें. तलवार उपसून मी दाराजवळ भिंतीला टेकून उभा राहिलों. माझ्या वडिलांनीं दोन्ही

पिस्तुलें घेतलीं व त्यांचे घोडे चढवून ते माझ्या बाजूला उभे राहिले. कुलूप उघडलें जात असल्याचा आवाज आला, दरवाजा उघडला गेला आणि आंद्रुश्कानें आपलें डोकें आंत घातलें. मी तात्काळ त्याच्या डोक्यावर वार केला आणि तो दरवाजांत खालीं कोसळला. त्याचवेळीं उघड्या दारांतून माझ्या वडिलांनीं पिस्तुल झाडलें. शिव्याशाप घालीत शत्रूनें माघार घेतली. माझ्या तलवारीच्या वारानें घायाळ झालेल्या माणसाला मी आंत ओढून घेतलें व दरवाजा आंतून बंद करून घेतला.

आवारांत सशस्त्र माणसांची खूपच गर्दी झाली होती. त्यांच्या घोळक्यांत श्वाब्रिन उभा होता, तें मी पाहिलें.

'भिऊं नका.'—मी बायकांना सांगितलें,—'अजून आशा आहे.'—नंतर वडिलांकडे वळून मी म्हणालीं,—'आतां गोळ्या चालवूं नका. आपल्याला पुढें उपयोग होईल त्यांचा.'

माझी आई देवाची प्रार्थना करीत होती. तिच्याजवळ मरीया इवानोवना उभी होती. आतां आम्हां सर्वांच्या पुढें काय वाढून ठेवलें आहे, याची ती शांत चित्तानें वाट पाहत होती. बाहेर धमक्या आणि शिव्याशापांचा वर्षाव चालू होता. मी आपल्या जागेवर उभा होतों. कुणीहि आंत आलें तरी त्याचे तुकडे तुकडे करण्याची माझी तयारी होती. तेवढ्यांत बाहेरचा गोंगाट एकदम थांबला आणि श्वाब्रिननें मला मारलेली हांक माझ्या कानीं आली.

'मी ऐकतों आहे. काय पाहिजे तुला?'

'हें बघ, बुलानिन, मुकाट्यानें शरण ये. आतां प्रतिकार केलास तरी त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. तुझ्या म्हाताऱ्या आईबापांचा विचार कर. हट्टानें तुझा बचाव होणार नाहीं. तुला मी पकडणार, हें नक्की समज.'

'तूं पुढें पाऊल तर टाक, निमकहरामा!'

'स्वतः आंत येण्याचा मूर्खपणा मी करणार नाहीं किंवा माझ्या माणसांचें जीवितहि धोक्यांत घालणार नाहीं. या कोठाराला आग लावून देईन. आणि मग तूं काय करतोस तें पाहूं. ऐकिलं कां हो, बेलोगोर्स्कचे डॉन क्विझोट? आतां जेवायची वेळ झाली आहे. आहेस तिथेंच थोडा वेळ राहा. अन् शांतपणानं विचार कर. बरं आहे, मरीया इवानोवना. तुझी माफी मागण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. अंधारांत आपल्या भटक्या घाडशी सरदाराजवळ बसून तुझा वेळ मजेंत जात असेल. नाहीं?'

दारावर पहारेकरी बसवून शाब्रिन निघून गेला. आम्ही कुणींच कांहीं बोललों नाहीं. प्रत्येकजण आपल्याच विचारांत गढून गेला होता. आणि आपले विचार दुसऱ्यास सांगण्याचें धैर्य कुणांतच नव्हतें. दुष्ट श्वाब्रिन काय काय अत्याचार

करील, त्याचें चित्र मी मनांत रेखाटीत होतों. माझी स्वतःची मला मुळींच काळजी नव्हती. आणि—याची काय कबूलीच द्यायला पाहिजे ?—माझ्या आईबापांपेक्षांहि मरीया इवानोवनाचीच मला जास्त काळजी वाटत होती. शेतकऱ्यांच्या आणि आमच्या घरीं राबणाऱ्या गुलामांच्या मनांत माझ्या आईविषयीं पूज्यभाव होता. आणि माझे वडील वागण्यांत फार कडक होते, तरी ते न्यायी होते आणि आपल्या हाताखालच्या लोकांच्या खऱ्या गरजा काय आहेत, हें त्यांना समजत होते. म्हणून शेतकऱ्यांच्या मनांत त्यांच्याविषयीं आदरभाव होता. कसल्या तरी भ्रमांत सांपडून शेतकऱ्यांनीं बंड केलें होतें, तो एक क्षणिक उन्माद होता, त्यांत रागाचा अंश नव्हता. तेव्हां माझ्या म्हाताऱ्या आईबापांना लोक दया दाखवतील याची मला जवळ जवळ खात्री होती. पण मरीया इवानोवना ? तिचें काय होईल ? तो नीच, कृतघ्न माणूस तिची काय दशा करील, याचा विचार सुद्धां माझ्या मनाला असह्य झाला. तिला पुन्हां त्या क्रूर माणसाच्या हातीं सांपडूं देण्यापेक्षां माझ्या स्वतःच्या हातानें तिला ( देव मला क्षमा करो ! ) ठार करावें, असे विचार माझ्या मनांत तीव्रतेनें घोळत होते.

अशाच स्थितींत आणखी एक तास निघून गेला. गांवांतील गुत्त्यांत दारू ढोसून बेहोष झालेल्या लोकांच्या गाण्याचा आवाज आमच्या कानीं आला. दारावरील पहारेकऱ्यांना आपल्या दोस्तांचा मत्सर वाटत असावा. कारण रागाच्या भरांत ते आम्हांला शिव्याशाप घालीत होते आणि छळ करण्याच्या व ठार मारण्याच्या धमक्या देऊन आमच्या मनांत भीति निर्माण करण्याचा प्रयत्न करीत होते.

श्वाब्रिन केव्हां आपली धमकी अंमलांत आणतो, त्याची आम्ही वाट पाहत होतो. शेवटीं आवारांत पुन्हा गडबड सुरू झाली. आणि श्वाब्रिनचा आवाज पुन्हां ऐकूं आला.

‘ काय, केलांत कां विचार ? तुम्ही स्वतः होऊन शरण येणार कां ? ’

आमच्याकडून त्याला कसलेंच उत्तर मिळालें नाहीं.

थोड्या वेळानंतर श्वाब्रिननें गवत आणण्याचा हुकुम सोडला. आणि कांहीं मिनिटांच्या आंतच सर्व कोठार ज्वालांच्या प्रकाशांत उजळून निघालें. दाराच्या फटींतून धूर आंत येऊं लागला. तेव्हां मरीया इवानोवना माझ्याजवळ आली आणि माझा हात आपल्या हातांत घेऊन हलक्या आवाजांत म्हणाली,

‘ प्योत्र आंद्रेइच, माझ्यासाठीं तुम्ही काय म्हणून जळून खाक व्हावं ? मला बाहेर जाऊं दे. श्वाब्रिन माझं एकेल. ’

‘ तें शक्य नाहीं. ’—मी रागानें ओरडून म्हणालों.—‘ पुढें तुझ्यासाठीं काय वाढून ठेवलं आहे, याची कल्पना आहे तुला ? ’

'आपला स्वतःचा अपमान सहन करण्यासाठीं मी जिवंत राहणार नाहीं.'—तिनें शांतपणानें उत्तर दिलें.—'ऐन संकटाच्या वेळीं तूं माझ्या मदतीसाठीं धांवून आलास आणि माझी सुटका केलीस. तुझ्या आईबापांनी माझ्यासारख्या पोरक्या पोरीला उदार अंतःकरणानं आश्रय दिला. मी मेले तरी हरकत नाहीं. पण कदाचित माझ्या उपकारकर्त्यांचे प्राण मी वाचवूं शकेन. आंद्रे पेत्रोविच, अवदोत्या वासिल्येवना, मला निरोप द्या. तुमचे माझ्यावर फारच उपकार झाले आहेत. मला आशीर्वाद द्या. आणि प्योत्र आंद्रेइच, आतां मला जाऊं दे. याची खात्री असू दे कीं...' तिला पुढें बोलवेना. दोन्हीं हातांनीं आपलें तोंड झांकून घेऊन ती रडूं लागली. माझी तर वेड्यासारखी अवस्था झाली होती. माझी आई देखील रडत होती.

'मरीया इवानोवना, आतां पुन्हां तसं कांहीं बोलूं नकोस.'—माझे वडील म्हणाले—'त्या हरामखोराकडे आम्ही तुला जाऊं देऊं, असं तुला वाटतं तरी कसं? इथंच राहा अन् एक अक्षर सुद्धां बोलूं नकोस. मरण ओढवणारच असेल, तर आपण सर्वच एकत्र मरूं या.'

'ऐका जरा. ते काय म्हणत आहेत?'

'तुम्ही शरण येणार कां?' श्वाब्रिन ओरडला. 'बघा हं. पांच मिनिटांच्या आंतच तुम्ही जिवंत भाजून निघाल.'

'शरण येण्याची गोष्टच सोड. निमकहराम!' माझ्या वडिलांनीं निर्धारानें उत्तर दिलें.

त्यांच्या सुरकुत्या पडलेल्या चेहऱ्यावर निश्चयाचं तेज झळकत होते. पांढऱ्या शुभ्र भुंवयांखालीं दडलेले त्यांचे डोळे अंगार ओकीत होते. माझ्याकडे वळून ते म्हणाले,—'चल, आतां वेळ आली आहे.'

दाराची कडी काढून त्यांनीं दार उघडलें. आगीचे लोळ एकदम आंत घुसले व वरच्या तुळयांना व त्यांच्या फटींत कोंबलेल्या गवताला जाऊन भिडले. माझ्या वडिलांनीं पिस्तुलांतून गोळ्या झाडल्या आणि पेटलेल्या उंबऱ्यावरून बाहेर जातांना त्यांनीं आम्हांला ओरडून सांगितलें;—'चला, सर्वजण माझ्या मागोमाग बाहेर या.'—एका हातानें आईला व दुसऱ्या हातानें मरीया इवानोवनाला धरून मी झपाट्यानें बाहेर आलों. श्वाब्रिन उंबऱ्यांत पडलेला होता. माझ्या वडिलांनीं थरथरत्या हातानें झाडलेली गोळी त्याला लागली होती. आमचा अनपेक्षित हल्ला पाहून ते बदमाष लोक पांगले. पण पुन्हां धीर धरून आमच्याभोंवती गोळा होऊं लागले. मी सर्व बाजूंनीं तलवारीचें वार करूं लागलों. पण तेवढ्यांत कुणीतरी नेम धरून माझ्या छातींत एक वीट हाणली. मी खाली कोसळलों व बेशुद्ध पडलों.

शुद्धीवर आल्यावर मी पाहिलें, तर रक्तानें भिजलेल्या गवतावर श्वाब्रिन बसला होता. आणि आम्ही सर्वजण त्याच्यासमोर उभे होतों.

दोन्ही काखांत आधार देऊन मला उभे करण्यांत आलें होते. शेतकरी, कझाक आणि बाश्किर यांचा जमाव आम्हांला सर्व बाजूंनीं वेढा घालीत होता. श्वाब्रिनचा चेहरा अगदीं निस्तेज पडला होता. आपल्या एका हातानें त्यानें आपली जखम दाबून धरली होती. असह्य वेदना आणि अनावर राग यांचें मिश्रण त्याच्या चेहऱ्यावर दिसत होतें. हळूंच डोकें वर करून त्यानें माझ्याकडे पाहिलें. आणि कमजोर, अस्पष्ट आवाजांत तो म्हणाला,

'याला फांशी द्या ! सर्वांना फांशी द्या...फक्त हिला सोडून...'

आमच्या भोंवतीं जमा झालेले लोक आणखी जवळ आले आणि आम्हांला धरून आरडाओरडा करीत फाटकाकडे ओढीत घेऊन चालले. पण फाटकाजवळ येतात न येतात तोंच एकदम आम्हांला सोडून देऊन त्यांनीं पळ काढला. नंग्या तरवारी हातांत घेतलेल्या घोडेस्वारांच्या तुकडीसह ग्रिनेव फाटकांतून आंत येत होता.

* * *

बंडखोरांनीं दाही दिशांना पळ काढला. आमच्या घोडेस्वारांनीं त्यांचा पाठलाग केला, पुष्कळशा बंडखोरांना कंठस्नान घातलें आणि अनेकांना कैद केलें. ग्रिनेवनें घोड्यावरून खालीं उडी मारली, माझ्या आईबापांना लवून अभिवादन केलें आणि प्रेमभरानें माझा हात दाबला.

'मी अगदीं वेळेवर आलों म्हणायचा.'—तो म्हणाला.—'ही तुझी वधू वाटतं ?'

मरीया इवानोवना लाजेनें चूर झाली. माझ्या वडिलांनीं, जणुं कांहींच घडलें नाहीं, अशी बाह्य वृत्ति धारण केली असली तरी त्यांच्या मनांत खळबळ माजली होती. ते ग्रिनेव जवळ गेले आणि त्यांनीं त्याचे आभार मानले. माझ्या आईनें त्याला कडकडून मिठी मारली. तिचें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून आलें होतें व ती त्याला पुन्हां पुन्हां म्हणत होती,—'देवासारखा धांवून आलास बाबा तूं !'

'चला आतां आमच्या घरीं.'—माझे वडील म्हणाले व स्वतः पुढें निघाले.

आम्ही श्वाब्रिनच्या जवळून जात होतों तेव्हां ग्रिनेवनें त्याला पाहिलें. त्या जखमी माणसाला पाहून तो तेथें थांबला व म्हणाला,—'कोण आहे रे हा ?'

'हाच तो बंडखोरांचा म्होरक्या !'—माझ्या वडिलांनीं उत्तर दिलें. हें बोलत असतांना त्यांच्या शब्दांत जुन्या सैनिकाचा अभिमान न कळत उमटला होता.—'देवानं मदत केली अन् माझ्या थरथरत्या हातांतून निघालेली गोळी याला लागली. माझ्या मुलाचं रक्त सांडलं होतं त्याचा बदला मी घेतला.'

‘ हाच तो श्वाब्रिन ! ’—मी ग्रिनेवला सांगितलें.

‘ श्वाब्रिन ! बरं झालं आमच्या हातीं सापडला. अरे, याला इथून उचला आणि सर्जनला सांगा कीं याच्या जखमा नीट बांध. फार काळजी घे म्हणावं याची. कोणत्याहि परिस्थितींत श्वाब्रिनला कझानच्या गुप्त कमिशनसमोर उभं केलं पाहिजे. प्रमुख गुन्हेगारांत याची गणना होते अन् याची जबानी अतिशय महत्त्वाची ठरण्याचा संभव आहे. ’

श्वाब्रिननें मोठ्या कष्टानें डोळे उघडले. त्याच्या मनांत दुसरे कांहीं विचार नसावेत. कारण शारीरिक वेदनाखेरीज त्याच्या चेहऱ्यावर कसल्याच भावना दिसल्या नाहींत. एका कपड्यावर घालून घोडेस्वार त्याला घेऊन गेले.

आम्ही आमच्या घरांत प्रवेश केला. मी सगळीकडे नजर टाकली. लहानपणाच्या अनेक आठवणी माझ्या मनांत उचंबळून आल्या. घरांत कांहींच बदल झालेला नव्हता. सर्व वस्तू पूर्वींच्याच जागीं होत्या. श्वाब्रिननें आमच्या घराची लुटालूट करूं दिली नाहीं. तो नीचपणाच्या खोल गर्तेत उतरला असला तरी निव्वळ लुटालूट करण्याची घृणा त्याच्या मनांत अजून जागी असावी, असें दिसलें.

आमचे नोकर दिवाणखान्यांत गोळा झाले. त्यांनीं बंडांत भाग घेतला नव्हता. आणि आमची सुटका झाल्याचें पाहून त्यांना मनस्वी आनंद झाला होता. सावेलिचचा आनंद तर गगनांत मावेनासा झाला होंता.—पण येथें एक गोष्ट सांगायची राहूनच गेली.त्याचें असें झालें कीं बंडखोरांनीं हल्ला केल्यानंतर जो गोंधळ माजला त्या गोंधळाचा फायदा घेऊन सावेलिच तबेल्यांत गेला. तेथें श्वाब्रिनचा घोडा बांधलेला होता. सावेलिचनें त्याच्यावर जीन चढविलें आणि कुणाला न कळत तरीच्या दिशेनें घोडा पिटाळला. तोंपर्यंत आमच्या रेजिमेंटनें वोल्गा पार केली होती व शिपाई इकडच्या तीरावर आराम करीत होते. तेथें पोंचतांच सावेलिचनें ग्रिनेवला सारी हकीगत सांगितली. आम्ही प्राणघातक संकटांत आहोंत, हें समजल्याबरोबर ग्रिनेवनें सर्व घोडेस्वारांना भरधांव पिटाळले. आणि ऐन मोक्याच्या वेळीं आमच्या मदतीसाठीं ते देवदूतांसारखे येऊन पोंचले होते.

ग्रिनेवनें आंद्रुश्काचें डोकें गांवांतील गुत्त्याजवळ एका भाल्याच्या टोंकाला खोंचून ठेवण्याचा हुकूम दिला.

बंडखोरांचा पाठलाग करून घोडेस्वार परत आले. त्यांनीं कांहीं बंडखोरांना अटक करून बरोबर आणलें होते. ज्या कोठारांत आम्ही बंडखोरांच्या वेढ्याचा मुकाबला केला होता, तेथेंच सर्व कैद्यांची रवानगी करण्यांत आली.

सर्वजण आपापल्या खोल्यांकडे वळले. माझ्या वृद्ध आईबापांना विश्रांतीची गरज होती. कालची सर्व रात्र मी जागून काढली होती. आणि बिछान्यावर अंग

टाकतांक्षणी मला गाढ झोप लागली. ग्रिनेव आपल्या घोडेस्वारांची व्यवस्था पाहण्यासाठीं गेला.

संध्याकाळीं आम्ही सर्वजण पुन्हां दिवाणखान्यांत जमलों. चहा घेत घेत झाल्या गेल्या घटनांविषयीं आम्हीं उत्साहानें चर्चा करीत होतों. मरीया इवानोवना सर्वांना चहा देत होती. मी तिच्या जवळच बसलों होतें. माझें सारें लक्ष तिच्या-कडेच होतें. एकमेकांविषयींचें आमचें प्रेम आतां घरांतील वडिलधाऱ्या माणसांच्या कौतुकाचा विषय बनलें होतें. ती संध्याकाळ अजूनहि माझ्या स्मरणांत आहे. माझ्या मनांत नुसता आनंद दाटलेला होता. आणि आम्हां मरणाधीन माणसांच्या आयुष्यांत असे क्षण क्वचितच येतात.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सर्व शेतकरी माझ्या वडिलांची क्षमा मागण्यासाठीं आमच्या घरासमोर गोळा झाले. माझे वडील व्हरांड्यांत येऊन उभे राहिले. त्यांना पाहतांच सर्व शेतकरी गुडघे टेकवून खालीं बसले.

'मूर्खांनो,'—माझे वडील म्हणाले,—'बंड करण्याचं हें वेड तुमच्या डोक्यांत कसं शिरलं ?'

'आमची चूक झाली, क्षमा करा, धनी.'—सर्वजण एकाच आवाजांत पुटपुटले.

'चूक झाली, यांत शंका नाहीं. आधीं चूक करतां आणि मग तिच्या परिणामाबद्दल पश्चाताप करतां. देवाच्या दयेनं माझा मुलगा प्योत्र आंद्रेइच घरीं आला आहे. त्या आनंदांत मी तुम्हांला सर्वांना क्षमा करतों. खरं म्हणजे —'

'आमची चूक झाली, क्षमा करा आम्हांला.'

'चूक तर झालीच आहे. देवाच्या दयेनं काय छान हवा पडली आहे ! कुरणांतील गवत कांपून आणण्याची हीच वेळ आहे. मूर्खांनो, गेले तीन दिवस काय करीत होतां तुम्ही ?'—मग लाल केस असलेल्या मुकादमाला उद्देशून ते म्हणाले,—'या सर्वांना गवत कांपणीला पिटाळ. आणि हरामखोरा, लक्षांत ठेव, सेंट इलिया दिनाच्या आंतच गवताच्या गंज्या तयार झाल्या पाहिजेत. जा आतां.'

सर्व शेतकऱ्यांनीं माझ्या वडिलांना पुन्हां लवून प्रणाम केला आणि जसें कांहींच झालें नाहीं, अशा रीतीनें सर्वजण आपल्या धन्याच्या शेतांत कामावर गेले.

श्वाब्रिनची जखम प्राणघातक नव्हती. पहारेकऱ्यांच्या बंदोबस्तांत त्याची कझानला रवानगी करण्यांत आली. त्याला गाडींत बसवीत असतांना मी खिडकीं-तून पाहत होतों. मला पाहतांच त्यानें मान खालीं घातली. मी पण घाईघाईनें

खिडकीपासून बाजूला झालों. माझ्या शत्रूच्या दुर्दैवांत व अपमानांत मला विजयोन्माद होत आहे, हें दाखविण्याची माझी इच्छा नव्हती.

ग्रिनेवला पुढें जायचें होतें. मीहि त्याच्याबरोबरच जाण्याचें ठरविलें. खरें म्हणजे आणखी कांहीं दिवस माझ्या कुटुंबियांच्या सहवासांत राहण्याची माझी इच्छा होती. आमची छावणी तेथून हलणार होती त्याच्या आदल्या दिवशीं मी माझ्या आईबापांजवळ गेलों आणि त्या काळच्या रिवाजाप्रमाणें जमिनीपर्यंत लवून मी त्यांना अभिवादन केलें आणि --मी मरीया इवानोवनाशीं लग्न करणार आहे, तेव्हां तुमचा आशिर्वाद द्या --अशी विनंति केली. त्यांनीं मला वर उठवलें व माझ्या लग्नाला आपली संमति दिली. त्या वेळीं त्यांच्या डोळयांत आनंदाश्रू तरळत होते. नंतर मरीया इवानोवनाचे थरथरते हात हातांत घेऊन आम्हीं दोघेहि त्यांच्याजवळ गेलों. त्यांनीं आम्हांला आशीर्वाद दिला.

त्यावेळीं माझ्या मनांत ज्या भावना उचंबळून आल्या होत्या, त्यांचें वर्णन करण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं. जे कोणी माझ्या अवस्थेंतून गेले असतील त्यांना न सांगतांच या भावना समजतील. आणि जो या अवस्थेंतून अद्याप गेला नसेल, त्याची मला कींव येते. त्याला माझें एवढेंच सांगणें आहे कीं, बाबा रे, वेळ निघून जाण्याच्या आंतच प्रेमांत पड आणि आपल्या आईबापांचे आशीर्वाद माग.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं आमच्या रेजिमेंटच्या प्रयाणाची सर्व सिद्धता झाली होती. आमच्या कुटुंबाचा ग्रिनेवनें निरोप घेतला. लष्करी हालचाली आतां लवकरच थांबतील, अशी आमची सर्वांची खात्री होती. एका महिनाभरांत माझें लग्न होईल अशी आशा मी बाळगून होतों. मरीया इवानोवनानें मला निरोप दिला आणि सर्वांच्यासमोर माझें चुंबन घेतलें. मी घोड्यावर स्वार झालों. सावेलिच पुन्हां माझ्या-बरोबर निघाला. आमच्या रेजिमेंटनें कूच केलें.

मी ज्या घराचा दुसऱ्यांदा निरोप घेत होतों, त्या घराकडे मी पुन्हां पुन्हां वळून पाहत होतों. उदास भवितव्यानें माझ्या मनाचा कबजा घेतला होता. माझ्या दुर्दैवानें अजून माझी पाठ सोडली नाहीं, असें कुणी तरी माझ्या कानांत गुणगुणत असल्यासारखें मला वाटत होतें. अजून एक वादळ माझी वाट पाहत आहे, अशी भावना माझ्या हृदयांत दबा धरून बसलेली होती.

आमची मोहीम आणि पुगाचेवचा पाडाव यांचें मी विस्तारानें वर्णन करीत नाहीं. पुगाचेवनें उध्वस्त केलेल्या खेड्यांतून आम्ही जात होतों, आणि बंडखोरांनीं लुटल्यानंतर त्या दुर्दैवी गांवकऱ्यांजवळ जें कांहीं शिल्लक होतें तें सारें आम्ही हिरावून घेत होतों.

राज्य कोणाचें, हेंच लोकांना कळेनासें झालें होतें. राज्याचें कुठें अस्तित्वच नव्हतें. जमिनीचे मालक जंगलांत लपून बसले होते. आणि खेडे विभागांत दरोडेखोरांचेंच राज्य होतें. पुगाचेव आस्त्राखानच्या दिशेनें पळत होता आणि त्याचा पाठलाग करणारे आमचे लष्करी अधिकारी, निरपराध किंवा गुन्हेगार याची चौकशी न करतां सर्वांनाच शिक्षा ठोठावीत होते. लढाईच्या खाईत सांपडलेल्या लोकांची हलाखीची परिस्थिति होती. देव करो आणि रशियन बंडाळीच्या क्रूर मूर्खपणाचें दर्शन तुम्हांला न घडो ! आपल्या देशांत अशक्य क्रांतीच्या कल्पनेनें जे भारावलेले आहेत, ते एक तर तरुण आहेत आणि आपल्या लोकांची त्यांना कांहीं एक माहिती नाहीं. किंवा ते निष्ठुर अंतःकरणाचे आहेत. इतरांच्या जीविताची त्यांना कांहींच किंमत वाटत नाहीं. आणि स्वतःच्या जीविताचीहि ते पर्वा करीत नाहींत.

•

पुगाचेव जीव घेऊन पळत होता. आणि जनरल मिचेल्सन त्याचा पाठलाग करीत होता. अखेरीस पुगाचेवचा पुरता पाडाव झाल्याची बातमी आली. त्याला अटक केल्याची बातमी ग्रिनेवला त्याच्या जनरलकडून समजली. आणि त्याचबरोबर आगेकूच थांबविण्याचा हुकुमहि त्याच्या हातीं पडला. आतां मला घरीं जाणें शक्य होतें. मला परमानंद झाला होता. पण माझ्या आनंदावर कसल्यातरी विचित्र भविष्याची काळी छाया पसरली.

---